# सो शॅ लि झ म

अथवा

## समाजवादाचा ओ ना मा

---

लेखक

पांडुरंग वासुदेव गाडगीळ

वाङ्मयविशारद

किंमत १ रुपया

# प्रस्तावना

सोशॅलिझम् ऊर्फ समाजवाद या विषयांतील कांहीं मुद्यांचें विवेचन मीं पूर्वी वर्तमानपत्रांतून लेख लिहून केलें होतें. तेच लेख एकत्र करून छापावे असा एकदां माझा विचार होता. पुढें कांहीं मित्रांनी सोशॅलिझम् म्हणजे काय, याचें मराठींत विवेचन करणारी लहानशी संहिता (टेक्स्ट बुक) लिहावी अशी सूचना केली. वर्तमानपत्रांतील तुटक लेखांनीं असें पुस्तक तयार होणें शक्य नव्हतें. शिवाय त्या लेखांतून सोशॅलिझमचें पूर्ण विवेचनहि आलें नव्हतें. ते लेख लिहिल्यानंतर मीं जें नवीन कांहीं वाचलें असेल व माझ्या विचारांत थोडाबहुत पालट झाला असेल त्याचाहि समावेश लेखांच्या संकलनांत करणें अशक्य होतें. म्हणून मीं लेखसंकलनाचा विचार सोडून देऊन या पुस्तकाची सर्वच रचना स्वतंत्रपणें केली आहे.

'सोशॅलिझम्' या अर्थी मराठींत समाजवाद हा आटोपशीर शब्द रूढ होत आहे. पण इंग्रजी शब्दाचा पगडा जनमनावर अद्याप बराच असल्यानें पुस्तकास ' सोशॅलिझम् ' असें मुख्य नांव दिलें आहे. तथापि रूढ होत असलेल्या मराठी नांवाचाहि उपयोग करण्यासाठीं ' समाजवादाचा ओनामा ' हें दुसरें नांव पुस्तकास दिलें आहे.

हें पुस्तक या विषयाची प्राथमिक माहिती देणारें आहे हें नांवावरूनच उघड होतें. तथापि आगगाडीबाहेर पाचोळा भुरूभुरू उडत असतो त्याप्रमाणें आंत बसून भुरूभुरू पानें चाळींत पुस्तक वाचण्याचा प्रयत्न केल्यास पुस्तक समजणार नाहीं. फक्त मराठीच जाणणाऱ्या वाचकासहि विषय समजावा इतका तो सोपा करण्याचा प्रयत्न केला आहेच. तथापि विषयच मूळचा इतका कटीण आहे कीं सोपा करण्याची शिकस्त केली तरी कांहीं मर्यादेपलीकडे तो सोपा होऊंच शकत नाहीं. ज्यांना विषय समजावयास हवा त्यांनीं त्याच्या खनपट्टीस बसून तो अनेकावर मननपूर्वक वाचून

अभ्यासिला पाहिजे. ज्यांना इंग्रजी चांगलें समजतें त्यांनासुद्धां इंग्रजींतील या विषयाची प्राथमिक पुस्तकेंहि सहज समजत नाहींत. आपल्या शाळा–कॉलेजांतील शिक्षणपद्धति सदोष असल्यामुळें असो अथवा दुसऱ्या कोणत्याहि कारणानें असो, अर्थशास्त्र विषयाची परीक्षा देऊन सरकारी विद्यापीठांची पदवी घेतलेल्याना सुद्धां सोशॅलिझमच्या मूलभूत कल्पना काय आहेत याचें आकलन झालेलें नसतें. अर्थात् अशा कठीण विषयाचें अल्पसें ज्ञान होण्यास इंग्रजी जाणणाऱ्यांनाहि हे पुस्तक, मराठींत असल्यामुळें, उपयुक्त वाटेल अशी अपेक्षा आहे.

## सारभूत कल्पना

पुस्तकाचा सारांश प्रस्तावनेंत देणें अशक्य वाटतें. पण ज्या एक दोन महत्त्वाच्या कल्पनांवर पुस्तकाची रचना केली आहे त्या थोडक्यांत सांगतों:

बैल, घोडा अथवा वाफेचें एंजिन या आपल्या संपत्त्युत्पादनाच्या 'शक्ति' आहेत असें आपण मानतों. म्हणजे त्यांसाठी आपण जें धन खर्च करतों तें खर्चतांना आपणांस त्यांची 'शक्ति' मिळाली पाहिजे हें आपलें उद्दिष्ट असतें. त्यांच्या सुखदुःखात्मक भावना, स्वाभिमान वगैरे वृत्ति, यांचा विचार आपण आपल्या मनांत येऊं देत नाही. भांडवलदार मजूराला, म्हणजे माणूस माणसाला असें केवळ एक जड 'शक्ति' मानतो व त्यासाठीं जें धन खर्चितों तें ती 'शक्ति' निर्माण होईल व भांडवलदारास वापरावयास मिळेल या उद्देशानें खर्चितों. तो माणूस आहे त्याला सुखदुःख या भावना आहेत याचा विचार तो करीत नाहीं. यामुळें जगांतील फक्त कामावर असलेल्या मजूरास एकंदरीनें जें वेतन मिळतें तें त्यांच्या चरितार्थास हवे इतकेंच मिळतें व त्या वेतनापासून जगाच्या बाजारांत आलेल्या संपत्तीपैकी त्यांच्या चरितार्थापुरतीच ते खरेदी करूं शकतात. बेकार तर उपाशीच मरतात. आजच्या जगाचे सामान्यतः भांडवलवाला व मजूर असे दोन विभाग झालेले असल्यानें मजूरांनीं खरेदी केल्यावर उरलेली संपत्ति गिऱ्हाइकच नाहीं म्हणून पडून राहते. त्यामुळें नवीन उत्पादन बंद होऊन बेकारी वाढते व बाजारांत माल पडून असतांना त्याशेजारीं माणसें दारिद्र्यानें मरत असतात. पण या माणसाच्या 'शक्ती'ची भांडवलवाल्यास गरज नसते यामुळें जुनें झालेलें एंजिन जसें कोपऱ्यांत पडून गंजून जात असतें त्याप्रमाणें माणसासहि अ–मानुषपणें यंत्रा-

सारखें कोंडग्यांत पडून मरण्याचा प्रसंग येतो. आवश्यक संपत्ति भरपूर असतांहि जेथें माणसास तिचा उपभोग घेऊं दिला जात नाहीं ती मनुष्यसमाज-व्यवस्था नसून अव्यवस्था आहे हें उघड आहे. संपत्तीचें अखेर उद्दिष्ट माणसानें ती भोगणें हेंच आहे. त्यास येणारा अडथळा हा समाजव्यवस्थेतला अडथळा होय.

माणसास शिलक संपत्तीचा प्रस्तुत काळी उपभोग घेतां येण्यास जो अडथळा होतो त्यास उपाय एकच व तो हा की, माणसाची उत्पादनशक्ति यंत्रामुळें व शास्त्रामुळें वाढली आहे, तेव्हां माणूस समुदायाने जें उत्पन्न करील त्यांपैकी भावी उत्पादनास जरूर असा भांडवलाचा ठेवा आणि इतरहि असेंच आवश्यक द्रव्य बाजूस काढून ठेवल्यावर उरलेली सर्व भोग्य संपत्ति मजूरवर्गास उपभोगार्थ खरेदी करतां येईल इतकें वेतन त्यास मिळालें पाहिजे. अर्थातच यामुळें नफापद्धतिच बंद होईल. नफा नसेल तर खाजगी भांडवलवाले उत्पादनच करणार नाहींत. म्हणूनच जमीन, कारखाने, खाणी, आगगाड्या वगैरे संपत्तिसाधनें सार्वजनिक मालकीची केली पाहिजेत हें 'सोशॅलिझम्'चें प्रतिपाद्य आहे.

भांडवलशाहीने माणसाची उत्पादनशक्ति वाढविली याबद्दल समाजवादी भांडवलवाल्यांचे आभारी आहेत. पण उत्पन्न संपत्तीचा भोग समाजानें घेण्यास जर भांडवलशाही आड येत असेल तर तिची अडचण आभारपूर्वकहि दूर करणें समाजवाद्यांचें कर्तव्यच आहे. कारण उत्पादन क्रियेचें ध्येय उपभोग हें आहे, कांही व्यक्तींजवळ धनाचा सांठा कुजत पडावा हें नाहीं.

या पुस्तकांतील दुसरा महत्त्वाचा मुद्दा हिंदी स्वातंत्र्याचा. आजच सोशॅलिझम्ची हुल्लड करून देशांत दुही पाडूं नका, आधीं स्वातंत्र्य मिळवा, मग आपसांत भांडा असा राष्ट्रीय पक्षाचा सोशॅलिस्टांस उपदेश असतो. त्यास उत्तरादाखल शेवटच्या प्रकरणांत असें दाखविलें आहे कीं हिंदी भांडवलवाले, जमिनदार, संस्थानिक व जातिनिष्ठ पुढारी यांच्या हाती संपत्तिसाधनें आहेत तोंवर ते लोकमतास चिरडून टाकून ब्रिटिश भांडवलशाहीस हिंदुस्थानांतच दृढमूल करून ठेवीत आहेत. यामुळें वरील चार वर्गच स्वातंत्र्याचे खरे शत्रू होत. त्यांच्या हातून संपत्तिसाधनें काढून घेण्याच्या चळवळीस जसजसें यश येत

जाईल तसतसे हे चार वर्ग कमजोर होतील. आणि यांच्या बळावरच विदेशी भांडवलशाही आधारली असल्यामुळें तिचाहि जोर वरील चार वर्गांचा जोर कमी झाल्यानेंच होईल. म्हणून स्वातंत्र्याची चळवळ व समाजवाद ऊर्फ सोशॅलिझमची चळवळ या दोनहि एकदमच चालविल्या पाहिजेत व त्यासाठीं सर्व प्रकारच्या आर्थिक लढ्यास राजकीय स्वरूप दिलें पाहिजे.

पुस्तकाची मर्यादा लक्षांत घेऊन कांहीं मुद्यांचें विवेचन संक्षिप्त करावेंच लागलें आहे. पण अधिक अभ्यासाची इच्छा या पुस्तकानें उत्पन्न केल्यास लेखकाचा हेतु सफळ होईल.

६८७ सदाशिव पुणें<br>
ता. ५।१०।३४ } पां. वा. गाडगीळ

---

# अनुक्रमाणिका



# साधन-ग्रंथांची यादी




Capital Vol. I —Karl Marx.

Capital ( 3 Volumes abridged ) and other extracts from Marx —Edited by Max Eastman.

Communist Manifesto of Marx & Engles–Edited by —Ryazanoff.

What Karl Marx really meant —G. D. H. Cole.

Karl Marx —Lenin.

Towards understanding of Karl Marx. —Sidney Hook.

Karl Marx's Capital —A. D. Lindsay.

Evolution of modern Capitalism. —J. A. Hobson.

Economics of Unemployment. —J. A. Hobson.

Coming struggle for Power. —John Strachy.

Recovery —Sir Arthur Salter.

End of Laissez Faire and Communism —J. M. Keynes.

Outline of History —H. G. Wells.

The Living Past— —Marvin.

Liberalism —L. T Hobbhouse.

Imperialism —Lenin.

Imperialism & World Economy —Bukharin.

Intelligent Man's Guide to world crisis—G. D. H. Cole.

मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खं. ६ प्रस्तावना —वि. का. राजवाडे.

राधामाधवविलासचंपू प्रस्तावना. —वि. का. राजवाडे.

राजनीतिशास्त्रप्रवेश. —शं. द. जावडेकर.

Socialism, Critical & Scientific.—J. Ramsay macdonald.

What Russia intends. —Hopper.

Lahore Address; Whither India. —Javaharlal.


वगैरे

# सोशॅलिझम्

अथवा

# समाजवादाचा ओनामा

## प्रकरण १ लें

## श्रमशक्तीचा क्रयविक्रय व वाढावा

जमीन, कारखाने, वाहतुकीची साधनें,—कीं ज्यांचा संपत्ति निर्माण करण्याचे कामी उपयोग होतो—अशीं सर्व संपत्तिसाधनें समाजाच्या मालकीची करावीं व त्यांचा वापर समाजानें आपल्या गरजा भागविण्याच्या दृष्टीने योग्य त्या प्रकारें करावा असें जें मत आहे त्यास स्थूल मानानें समाज-सत्तावाद अथवा समाजवाद ( सोशॅलिझम् ) असें म्हणतात. हें मत व्यवहारांत आणण्याची तीव्र गरज व तें प्रभावी करून दाखविण्याची शक्यताहि या भांडवलप्रधान समाजरचनेंतच उत्पन्न झाली आहे. समाजवादाची ही इष्टता व शक्यता भांडवलशाहींत कशी उत्पन्न झाली हें समजून घेण्यासाठीं आपणांस प्रथम भांडवलशाहीचें स्वरूप समजून घेतलें पाहिजे.

रोख पैसा, जमीन, कच्चा माल, हत्यारें वगैरे संपत्ति निर्मितीचीं साधनें मालकीचीं असून जो मजूरीसाटीं काम करण्यास तयार असणाऱ्या इसमास मजूरी देऊन त्याजकडून आपल्या मालकीच्या वरील प्रकारच्या साधनांनी काम करून घेऊं इच्छितो असा 'भांडवलवाला' आणि स्वतःची श्रम करण्याची शक्ति वापरण्यास देऊन त्याबद्दल मजूरी मिळवूं इच्छिणारा 'मजूर' हे दोन भांडवलशाहीचे मुख्य घटक होत. मजूरानें नोकरी पतकरून भांडवलवाल्याच्या साधनांनीं निर्माण केलेली संपत्ति भांडवलवाल्याच्या मालकीची होते व मजुरास त्यानें केलेल्या श्रमाबद्दल भांडवलवाल्याकडून मजूरी मिळते.

ही मजूरी भांडवलवाला किती देईल? मजूरानें जेवढी संपत्ति निर्माण केली व भांडवलवाल्याच्या हवालीं केली तिच्या किमतीइतकी मजूरी भांडवलवाला मजूरास देईल काय? नाहीं. कारण जमीन, कच्चा माल व हत्यारें हीं भांडवलवाल्याच्या मालकीचीं होतीं. त्यांची झीज अथवा खप हींहि उत्पन्न झालेल्या मालांत मजूराच्या श्रमाप्रमाणेंच अंतर्भूत आहेत. बरें, ही झीज अथवा खप वजा जातां, राहिली ती किंमत मजूरास मजूरीदाखल मिळेल काय? नाहीं. भांडवलदारानें मजूरांच्या कामावर देखरेख केली असेल व त्याचेंहि मोल तो निष्पन्न मालाच्या किमतीतून वजा करील; आणि हें अयोग्य कोण म्हणेल? बरें, भांडवलाची झीज, खप व देखरेखीचें वेतन वजा केल्यावर उरलेली निष्पन्न मालाची किंमत तरी मजूरांस मिळण्यास काय हरकत आहे? खरेंच, तशी कांहीं हरकत दिसत नाहीं. पैसे देऊन माल घेतला काय किंवा अजूनहि खेड्यागांवांत जोंधळे देऊन कोथिंबीर घेतात त्याप्रमाणें ऐनजिनसी देवघेव केली काय, कोणत्याही बाजारव्यवहाराचा संप्रदाय असा असतो–किंवा आहे असें मानलें जातें–कीं जर देवारीं व घेवारीं स्वतंत्र असतील तर अखेर सारख्या किंमतीची वस्तु देऊन सारख्या किंमतीची वस्तु मिळते. कारण दिलें त्याहून अधिकांत अधिक मोबदला घ्यावा ही स्वतंत्र माणसाची सहजप्रवृत्ति असल्यानें कोणासच कमी अथवा अधिक मिळत नाहीं. भांडवलवाला मजूराचे श्रम घेतो व त्यास मजूरी देतो. ही मजूरी वरील बाजारसंप्रदायाप्रमाणें पाहतां श्रमाच्या किंमतीइतकी असावी. म्हणजे उत्पन्न मालाच्या किमतींतून भांडवलाची झीज, खप व देखरेखीचें वेतन वजा जातां उरेल ती किंमत श्रमाच्या मालकीची, असें समजून ती श्रमवाल्यास म्हणजेच मजूरास दिली जावी हें सरळ आहे. पण व्यवहार असा घडत नाहीं. कां नाहीं घडत? याचें कारण असें आहे की, वरील विवेचनांत आपण एक गृहीत म्हणून घेतलेली वस्तुस्थिति असत्य आहे.

## मजूराच्या स्वातंत्र्याचें वास्तव स्वरूप

कसें तें पाहूं. आपण असें धरून चाललों आहों कीं मजूर हा स्वतंत्र असून आपले श्रम भांडवलवाल्यास देऊं करतो व बाजारसंप्रदायाप्रमाणें श्रमाच्या किमतीइतकी मजूरी मागतो. हें चूक आहे. खुर्ची विकणारा दुकानदार ‘खुर्चीची किंमत सात रुपये’ असें गिऱ्हाइकास सांगतो. गिऱ्हाइकास किंमत

न पटल्यास तो ती घेत नाहीं व ती खुर्ची पडून राहते. कारण विकणें किंवा न विकणें याचें दुकानदारास, तसेंच घेणें किंवा न घेणें याचें गिऱ्हाइकास स्वातंत्र्य आहे. खुर्चीवाल्याप्रमाणें मजूरहि आपल्या श्रमाचें दुकान मांडून बाजारांत बसतो ना? नाहीं. कारण त्याचे श्रम त्याच्या शरीरांत अमूर्त असतात. तो भांडवलदाराच्या कारखान्यांत जाऊन जसजसें काम करूं लागतो, तसतसें त्याच्या श्रमाचें मूर्त स्वरूप म्हणजे माल भांडवलवाल्यास मिळत जातो. आणि भांडवलवाल्यास मालाची पोंच झाली म्हणजे मजुरास मजूरी मिळते. पण याचा अर्थ तरी अखेर असाच कीं, बाजारांत श्रम व मजूरी यांची प्रत्यक्ष देवघेव न झाली तरी त्यांच्या देवघेवीचा करार झालाच आणि सारख्या किंमतीच्या वस्तूंच्या देवघेवीचा बाजारसंप्रदाय येथेंहि पाळला गेलाच.

पण अजूनहि आपल्या कल्पनेंत दोष शिल्लक आहे. खुर्चीचा दुकानदार ती विकण्यास अगर न विकण्यास व खुर्चीचें गिऱ्हाईक ती घेण्यास अगर न घेण्यास स्वतंत्र आहे असें आपण वर म्हटलें आहे. श्रम विकण्याचा करार करणारा आणि मजूरी देण्याचा करार करणारा हेहि दोघे असे स्वतंत्र आहेत काय? श्रम विकूं पहाणारा मजूर श्रम न विकेल तर त्यावर कायद्यानें सक्ती होणार नाहीं, म्हणून तो स्वतंत्र आहे हें सकृद्दर्शनी खरें दिसतें. पण खोल विचारांतीं सुद्धां तें तसेंच दिसतें काय? समजा, त्यानें भाव पटला नाहीं म्हणून श्रमविक्रीचा करार केला नाहीं; तर काय होईल? तर काय व्हायचें? त्याला आणि त्याच्या मुलाबाळांना उपाशी मरावें लागेल. शरीरांत श्रम करण्याची जी शक्ति आहे त्यावेगळें अन्नवस्त्र मिळविण्याचें कोणतेंहि साधन त्याजजवळ नाहीं. तीं साधनें भांडवलवाल्याजवळच आहेत. भांडवल-वाल्याची नोकरी पत्करून व त्याच्या भांडवलाचा उपयोग करून जर त्याच्या-साठीं संपत्ति निर्माण केली नाहीं, तर मजूरी मिळणार नाहीं. म्हणून अन्न-वस्त्र मिळणार नाहीं; व म्हणून मजूरास व त्याच्या कच्च्याबच्च्यांस उपाशी मरावें लागेल. श्रम विकण्याचा करार करण्यास अथवा न करण्यास मजूरास कायद्यानें पूर्ण स्वातंत्र्य आहे. पण कायद्यानें दिलेलें हें स्वातंत्र्य अत्यंत हिडीस आहे. या स्वातंत्र्याचा अर्थ असा आहे कीं, मजूरानें वाटल्यास मिळेल त्या दरानें मजूरी पत्करावी किंवा वाटल्यास बाजार सोडून 'सदय आणि शांत' अशा मरणाच्या भेटीस जावें. मजूराचें हें कायदेशीर स्वातंत्र्य, मार्क्स म्हणतो'

"आकाशांत उंच उडणाऱ्या घारीच्या स्वातंत्र्यासारखें आहे." अतिशय उंच अशा आकाशांत तिला अडविणारें कोणीहि नाही. तिनें वाटल्यास पंख पसरून स्वच्छंदानें आकाशांत भराऱ्या माराव्या अथवा वाटल्यास पंख मिटून स्वस्थ रहावें. पंख मिटल्यास गुरुत्वाकर्षणाच्या नियमाप्रमाणें ती आपोआप कोणत्याहि श्रमाशिवाय खाली येईल व कोणाची सक्ति न होतां शिलातलावर आपटून तिच्या शरीराच्या चिंधड्या होतील. आपल्या श्रमाचा विक्रय करण्याच्या बाबतीत मजुरास जें स्वातंत्र्य आहे त्याचें वास्तव स्वरूप हें अशा प्रकारचे आहे.

पण मजुराचे श्रम घेऊन त्यामोबदला मजूरी देण्याचा करार करूं पाहणारा जो भांडवलवाला त्याचें स्वातंत्र्य मात्र अगदीं खरेंखुरें आहे. त्याला त्याचीशी वाटते तेवढी मजूरी मजूरानें न पत्करल्यास तो मजूरास नेमीतच नाही. त्याचें भांडवल स्वस्थ पडून राहतें. पण जड भांडवलास मजूरा-प्रमाणें स्वत: दुसरेच दिवशी मरण्याची भीति नसते. आणि भांडवलाच्या मालकाजवळ कांहीं तरी संचय असून त्यावर तो जगू शकतो, निदान भांडवलाचा लहानसा अंश विकून त्यावर गुजराण करूं शकतो. म्हणून श्रम व मजूरी याच्या करारासंबंधींच्या ओढाताणींत तो मजूरास लवकर टेंकीस आणू शकतो. बाजारांतील देवारी व घेवारी यांना व्यवहारस्वातंत्र्य असतें असे आपण वर म्हटलें व आणखी असेंहि म्हटलें कीं देवघेवीच्या व्यवहारांत अधिकांत अधिक मोबदला मिळविण्याची इच्छा ही स्वाभाविक असून देवारी–घेवारी उभयतांस सारखेंच व्यवहारस्वातंत्र्य असल्यानें अखेर सौदा होतो तेव्हा सारख्याच वस्तूची देवघेव होते. पण आतांच आपण पाहिल्याप्रमाणें श्रमाचा मालक व भांडवलाचा मालक या दोघांना सारखेंच स्वातंत्र्य नाहीं. भांडवलवाला स्वतंत्र आहे तर मजूर मृत्यूच्या दाढेंत आहे. अधिकांत अधिक मोबदला मिळण्याची इच्छा म्हणजे भांडवलवाल्याच्या बाबतीत कमींत कमी मजूरीवर मजूरास राबविण्याची भांडवलवाल्याची इच्छा सहजच यशस्वी होते. कारण अन्नास मोताद असलेल्या मजूरास अधिकांत अधिक मजूरी मिळविण्यासाठी प्रतिपक्षास अडविण्याइतका धीरच राहात नाहीं. मृत्युरूपी खोल दरीच्या कड्यावर तो पोरेंबाळें कमरेस बांधून उभा आहे; मिळेल त्या मजूरीस हाताशी धरून एकेक दिवस मृत्यूस दूर लोटीत आहे

सारांश, देवारी व घेवारी यांस पूर्ण व्यवहारस्वातंत्र्य असेल तर बाजारांत सारख्याच वस्तूंची देवघेव होते, हा जो बाजारसिद्धांत तो श्रम करण्याच्या पात्रतेखेरीज दुसरें संचित धन कांहींच नसलेला मजूर आणि संचित धनवान् भांडवलवाला यांच्या देवघेवीस लागू नाही. कारण येथें विषम पक्षांत व्यवहार आहे. याचा परिणाम असा होतो की, मजूराच्या श्रमाचें आपणांस जेवढें फळ येईल अशी भांडवलवाल्याची अटकळ असते त्यापेक्षां कमी मजूरी तो देऊं करतो व रोजगाराविना अनन्यगतिक असा मजूर कमी मजूरी पतकरूनहि आपल्या श्रमाचें मजूरीहून अधिक असें फल भांडवलवाल्यास अर्पण करण्यास तयार होतो.

## मजूरास मजूरी किती मिळते

मजूरास त्याच्या श्रमाच्या फलाइतकी मजूरी मिळत नाही त्याहून कमी मिळते एवढें आतांपावेतो कळलें. पण कमी म्हणजे तरी किती, हें कळावयाचें आहे. आपण जनावरास अन्नपाणी घालतों. तें घालतांना आपलें ध्येय असें असते की त्या जनावरानें आपली सेवा करण्यास समर्थ असावें व त्याचा वंश कायम राहून आपणास जनावराची सेवा अखंड मिळावी. हिंदुस्थानांतील एखादा संस्थानिक जरी कोंबडीच्या लग्नासाठीं ५०० रुपये खर्च करीत असला तरी सामान्यत: आपण जनावरांना त्यांनी काम करण्यास व वंश वाढविण्यास समर्थ राहावें इतकें व अशा प्रकारचेंच अन्न घालतों या सामान्य नियमास कांहीं बाध येत नाही. जनावरांचे बाबतीत ही जी आपली निवळ स्वार्थी दृष्टि असते तशीच स्वार्थी दृष्टि माणसांनीं एकमेकासंबंधीहि आर्थिक व्यवहारांत वापरावी, प्रत्येक व्यक्ति दक्षतेनें व कायदेशीरपणें आपला आर्थिक स्वार्थ साधील तर अनेक स्वार्थी व्यक्तींचा बनलेला जो समाज त्याचा सामुदायिक स्वार्थ सहजच साधेल असें इंग्रजी अर्थशास्त्रज्ञांचें तत्त्वज्ञान आहे. उच्च कुळांत जन्मल्यानें म्हणा अगर कोणत्याहि कारणानें म्हणा हें स्वार्थ-साधूपणानें तत्त्वज्ञान भांडवलवाल्याचें अंगीं उपजतच असतें. आपला धंदा नेहमीं किफायतीनें चालू राहावा व त्यासाठीं मजूरांची परंपरा निरंतर राहावी हें त्याला इष्ट वाटतें. म्हणून मजूराची कार्यक्षमता नीट राहील व त्यास मुलेंबाळें होऊन तीं पुढें मजूर होण्यास जिवंत राहतील इतकी मजूरी मजूरांस देणें भांडवलवाल्यास अवश्यच असतें.

एकाद्या मजूरास दोन आणे अधिक मिळत असतील तर दुसऱ्या एकास दोन आणे कमी मिळत असतील. पण भांडवलाचा धंदा चालता राहायचा तर जिवंत राहून वंश वाढविण्यास आवश्यक इतकी मजूरी मजूरास मिळणें जरूरच आहे. भांडवलवाला अगदी शास्त्रशुद्ध स्वार्थसाधु असेल तर पोटापुरतें मिळतांच धांवत येणाऱ्या मजूरास त्याहून अधिक कधीच देणार नाहीं. कारण हा धंद्याचा प्रश्न आहे. धर्माचा नव्हे. धर्म करायचा असतो तेव्हां तो पंढरपुरास सहस्त्रभोजनें घालतोच.

## एक शंका व तिचें उत्तर

असो. तेव्हा भांडवलवाला सामान्यतः मजूरास त्याच्या श्रमफलाहून कमी पण त्याच्या चरितार्थास कमीत कमी लागेल इतकी मजूरी देतो असें आपणांस दिसून आलें. पण येथें एक अशी शंका येते की, भांडवलवाला आपल्याकडून स्वार्थबुद्धीनें मजूरास त्याच्या श्रमफलाहून कमी मजूरी देऊं पहात असला तरी अखेर आगाऊ ठरलेली मजूरी देतांना तीहून अधिक श्रमफल आपणास मिळाले नाही असें त्यास आढळत नसेल काय ? मजूरास जगण्यास जेवढी किमान संपत्ति लागते व मजूरीच्या रुपानें परत मिळते तेवढीच तो निर्माण करतो, अधिक नाहीं, असें होत नसेल काय ? प्रश्न अगदी तर्कशुद्ध आहे, पण इतिहाससिद्ध नाही. मनुष्य प्राणी आज हजारो वर्षे या पृथ्वीवर नांदत आला आहे. या सर्व काळांत कांहीनीं श्रम करून चरितार्थाची साधनें निर्मावी व इतरानीं उत्पादनाचे श्रम न करतां त्या साधनांवर ताव मारावा असा क्रम अव्याहत चालत आला आहे. ज्यानें श्रम करून संपत्ति निर्माण करावी त्यानें ती आपल्या चरितार्थापुरतीच निर्माण केली असती, तर आज वाघ, सिंह, लांडगा यांना ज्याप्रमाणें समाजविकास, इतिहास हीं कांही सुद्धां नाहीत. तद्वत मनुष्याचीहि अवस्था झाली असती. वाघ, सिंह यांना सुद्धां आपल्या उत्पादनाचे श्रम न करणाऱ्या मुलाबाळांना अन्न घालण्यासाठी स्वतांच्या चरितार्थास लागतें त्याहून अधिक मिळवावें लागतेंच. माणसासहि मुलेंबाळें अशीच पोसावी लागतात. पण मानवजातीच्या इतिहासांत फार प्राचीन काळापासून आढळून येणारा एक विशेष प्रकार असा आहे कीं आवश्यक संपत्तीच्या उत्पादनाचे श्रम कांहीं माणसांनीं करावे व इतरांनीं या उत्पादकांपासून उत्पन्नसंपत्ति लुबाडून घेऊन त्यावर गुजराण करावी.

उत्पादकांनी जर आपल्यापुरतीच संपत्ति निर्माण केली असती आणि तीच लुटारूंनी लुटली असती तर उत्पादकांचा वर्ग सुरवातीसच नष्ट झाला असता. पण असें झालेलें नाहीं.ज्यांनी संपत्ति निर्माण केली त्यांना ती स्वतां भोगून इतरांस पुरेल इतकी निर्मिता आली व त्यांनी ती आज हजारों वर्षें निर्माण केलीहि आहे. बॅबिलोनचे मनोरे, दिल्ली–आग्र्याची ताजमहाल इत्यादि थडगीं, इजिप्तचे पिरामिड या इमारती ज्या गरीबांच्या पाठीवर कोरडे ओढून त्यांज-कडून बांधविण्यांत आल्या त्या लक्षावधि मजूरांचा संपत्ति निर्मिण्याचे कामीं काय उपयोग झाला ? कांही नाही. त्यांनीं श्रम केल्याची उज्ज्वल साक्ष आज हजारो वर्षेंहि आपल्यासमोर उभी आहे. पण ते संपत्त्युत्पादक श्रम नव्हते हेंहि तितकेंच खरें आहे. त्यांना हे श्रम करण्यासाटीं समर्थपणें जगावें लागलें. त्यासाठी त्यांना अन्न खावें लागलें हें दुसऱ्यांनी निर्माण केलें व या निर्मात्यांना आपला निर्माणक्रम अखंड चालू ठेवण्यासाठी स्वतां खाऊन मग दुसऱ्यास देतां आलें व म्हणून स्वतांच्या गरजेपेक्षां त्यांनी अधिक निर्माण केलें हेंहि ओघानेच सिद्ध होते. अलेक्झांडरपासून उमाजी नाइकापर्यंत जे लहानमोठे लुटारू आज हजारों वर्षे जगास लुटीत आले आहेत त्यांनी कधीच उत्पादनाचे श्रम केले नाहीत. ज्या प्लेटो, ॲरिस्टॉटल यांनी समाजशास्त्रावर ग्रंथ लिहिले त्यांनी उत्पादनश्रम केले नाहीत. मध्ययुगांत युरोपखंडांतील ज्या ख्रिस्ती मिशनऱ्यांनीं निरनिराळ्या दर्जाच्या पापांच्या प्रायश्चित्तांचे लिलाव करून ढिगांचे ढीग सोनें मिळविले त्यांनी संपत्ति निर्मिण्याचे श्रम केले नाहीत. आणि बॅंकेंत अथवा सिक्युरिटींत पैसे गुतवून ऐदीपणानें हवाशीर बंगल्यांत व्याजा-वर विलास करणारे थोर लोकहि संपत्ति निर्मिण्याचे श्रम करीत नाहीत. यांनीं पूर्वी केलेल्या श्रमाची फळे ते आतां उपभोगितात हें म्हणणें तर्कशुद्ध आहे, पण त्यांत हेंच गृहीत धरलें आहे कीं त्यांनी पूर्वी श्रम केले तेव्हां त्याचें फळ त्यांनी त्या वेळीं भोगून पुढील काळांत भोगण्यास शिल्लक उरेल इतकें त्यांना प्राप्त झाले. यावरूनहि व्यक्तीचे श्रम त्या व्यक्तीस भोगून उरेल इतकें फल देतात हेंच सिद्ध होतें.

या सर्व क्लिष्ट युक्तिवादाचें थोडें सिंहावलोकन करूं. ‘देवघेवीच्या व्यवहारांत अधिकांत अधिक मोबदला मिळविण्याची इच्छा देवारी व घेवारी यांस स्वाभाविक असल्यामुळें उभयतांस बाजारांत सारखेंच व्यवहार–स्वातंत्र्य

असल्यास अखेर देवारी व घेवारी सारख्याच किंमतीच्या वस्तूची देवघेव करतात ' हा अर्थशास्त्रज्ञांचा बाजारसिद्धांत गृहीत धरून आपण, मजूर व भांडवलवाला यांचे दरम्यान श्रम व मजूरी यांच्या देवघेवीसंबंधीं जो करार केला जातो त्याचें वरील सिद्धांतानुसार परीक्षण केलें. त्यांत असें आढळून आलें की, करारांतील दोन पक्षांपैकीं प्रत्येकास कायदेशीर व्यवहारस्वातंत्र्य आहे हें खरें. पण देवघेवीचा करार न केल्यास मजूरास खावयास अन्नच नाहीं अशी परिस्थिति असते. उलट भांडवलवाल्यास करार न झाल्यास अशी निकडीची अडचण कांहींच नाहीं. यामुळें अडलेला मजूर व दम धरूं शकणारा भांडवलवाला असे विषम बलाचे पक्ष करारास उभे राहतात. भांडवलवाला मजूराच्या अडलेल्या परिस्थितीचा फायदा घेऊन अधिकांत अधिक मोबदला मिळविण्याच्या स्वाभाविक इच्छेनें कमींत कमी मजूरीवर मजूरास नोकरीस बोलावितो व गरजू मजूर तेवढीहि मजूरी पत्करून श्रम करण्याचा करार करतो. तो करतो त्या श्रमाचें फल भांडवलाची झीज, खप व देखरेखीचा खर्च वजा जातांहि त्यास मिळणाऱ्या मजूरीहून अधिक असते. कारण एकतर भांडवलदारानें जास्तीत जास्त मोबदला मिळावा या अपेक्षेनें मजूरास जगण्यास व वंशवर्धनास जेमतेम पुरेल इतकीच मजूरी ठरविली असते. आणि दुसरें कारण असें की, सामान्यतः मनुष्य संपत्त्युत्पादनाचे जे श्रम करूं शकतो व सामान्यतः करतो त्याचें फल त्याच्या चरितार्थाच्या गरजेहून पुष्कळ अधिक असतें. मजूरास मिळणाऱ्या चरितार्थापुरत्या मजूरीहून जितकें अधिक फल भांडवलदारास मिळतें त्यास वाढावा (सर्प्लस व्हॅल्यू )—नफा म्हणतात. वाढावा अथवा नफा म्हणजे कमी किंमत देऊन अधिक किंमतीची वस्तु मिळाल्यास या वस्तूत दिलेल्या किंमतीहून अधिक असणारा भाग.

## मजूर श्रमशक्तीच विकतो

मजूर हा जेमतेम चरितार्थापुरती मजूरी पत्करून नोकरी पत्करतो असें म्हटलें. पण मजूर भांडवलदारास काय विकतो ? हा प्रश्न उरलाच. 'विकणें, म्हणजे सारख्या किंमतीच्या वस्तूची अदलाबदल करणें. मजूर श्रम म्हणजे आपल्या श्रमाचे मूर्तफल विकीत नाहीं. कारण श्रमफल मालकाकडे जाऊन त्यांतल्या थोडया अंशाइतकीच मजूरी मजूरास मिळते. तो जी मजूरी घेतो ती त्याचा व त्याच्या वंशाचा चरितार्थ चालविण्यास जरूर इतकी असते. हा

चरितार्थ चालवून तो आपली 'श्रम करण्याची शक्ति' टिकवून धरतो व तीच भांडवलदाराच्या नोकरीत वापरतो म्हणजे 'श्रम करण्याची शक्ति' व मजूरी यांचें समीकरण बसलें. यावरून मजूर हा भांडवलदारास श्रम नव्हे तर 'श्रम करण्याची शक्ति' (लेबर पॉवर) विकतो असें दिसतें.

मजूर मालकास (१) श्रम विकीत नाही, तर (२) श्रमशक्ति विकतो, अशी दोन विधानें आपण आतांच केलीं. हें तत्त्व सर्वसमाजवादाचा आधार-स्तंभ असल्यामुळें ते आणखी एकदां नीटपणें ध्यानांत घेऊं. विधान १ लें:- मजूर मालकास श्रमशक्ति विकीत नाही. हें कसें कसें तें पुन्हां पाहूं. मजूरानें काम करून निर्माण केलेल्या मालाचे (१) भांडवल व कच्चा माल यांची झीज व खर्च, (२) देखरेखीचा खर्च व (३) मजूरी हे घटक होत. देखरेख करणारा वेगळा मजूर होता असेंहि आपण समजूं. मार्क्सनें या सर्व निरीक्षक अंमल-दारास (सुपरिंटेंडेंट) विशेष प्रकारचे मजूर (ए स्पेशल काइंड ऑफ् वेज-लेबरर) असे म्हटलें आहे. म्हणून निरीक्षकाचें त्याचें वेतनहि-तें लहानमोठें कसेंहि असो-आपण मजूरी या सदरांत घालून घटक (२) व (३) हे एक करूं. तसेंच घटक (१) यास 'भांडवलाची किमत' असे म्हणूं. म्हणजे उत्पन्न मालाचे (१) भांडवलाची किमत व (२) श्रमाची मजूरी हे दोन घटक होत हें आपणांस समजलें. आतां मजूर जर मालकास श्रम विकतो असें म्हटलें तर उत्पन्न मालांतून भांडवलाची किमत वजा जातां उरेल तो सर्व माल म्हणजे त्या मालाच्या किंमतीइतकी मजूरी मजूरास मिळाली पाहिजे. पण मग, अर्थशास्त्रज्ञ म्हणतात, भांडवलाच्या मालकास यात नफा काय झाला? त्याला फायदा असल्याशिवाय तो आपलें भांडवल मजूरास वापरूं देणार नाहीं; म्हणजे धंदा होणारच नाही. म्हणून भांडवलदार भांडवल व श्रम यांच्या संयोगानें उत्पन्न झालेल्या संपत्तीपैकी भांडवलाची किमत काढून घेऊन भांडवल पुन्हां जसेंच्या तसें करतोच. पण शिवाय आपणास नफा म्हणून मजूराच्या श्रमफलांतीलहि कांहीं वाटा आपण घेऊन उरलेला वाटा मजूरास मजूरीच्या रूपानें देतो. म्हणजे श्रम व भांडवल यांच्या संयोगापासून उत्पन्न झालेल्या संपत्तीपैकीं श्रमाचा पूर्ण हिस्सा मजूरास मिळत नाहीं. याचाच अर्थ मजूर श्रम विकीत नाहीं. माझ्या जवळून दुसऱ्यानें एक बैल घेतला व मला त्याची अर्धीच किमत दिली तर मी 'बैल विकला' असें म्हणतां येत नाहीं.

कारण विकणें म्हणजे सारख्या.स सारखें देणें असें आपण समजत आहों. तसेंच निर्माण झालेल्या संपत्तीपैकी श्रमाच्या हिश्शाची सर्व संपत्ति अथवा तिची किमत मजूरास न मिळाल्यास तो आपले 'श्रम मालकास विकतो ' असें म्हणतां येत नाहीं. याप्रमाणें पहिले विधान सिद्ध झालें. आतां २ रें विधान 'मजूर मालकास श्रमशक्ति विकतो' हें सिद्ध करूं. मालक मजूरास कमींत कमी मजूरी देऊं चाहतो व अडलेला मजूर ती पत्करतो. कमींत कमी म्हणजे किती ? मजूर कार्यक्षम राहिला पाहिजे, त्याला मुलेंबाळें होऊन मजूरांचा झरा अखंड राहिला पाहिजे इतकी. कारखान्यांत एंजिनाची 'शक्ति' अखंड राहावी यासाठीं मालक त्यांत तेल वगैरे घालून ती शक्ति कार्यक्षम ठेवतो. म्हणजे तो तेल वगैरे जळण किती घालतो ? यंत्रशक्ति टिकण्याइतकें. म्हणजे तेल वगैरे जळण सृष्टीला देऊन तो सृष्टीपासून 'यंत्रशक्ति' खरेदी करतो असें म्हणण्यास कांही हरकत नाही. तसेंच मजूरास वर सांगितल्याप्रमाणें कमीत-कमी मजूरी देऊन मालक रोजच्या रोज कारखान्यांत 'यंत्रशक्ति' प्रमाणेंच वापरांत येत असणारी मजूराची 'श्रमशक्ति' खरेदी करतो असें म्हणावें लागतें हा दुसऱ्या विधानाचा खुलासा झाला. भांडवल व श्रम यांच्या संयोगापासून जी संपत्ति निर्माण होते, त्यापैकी भांडवलाची किंमत वजा जातां राहतें तें श्रमाचें फल. यांतून मजूराची मजूरी म्हणजे त्याच्या श्रमशक्तीची किमत मजूरास दिल्यावर उरणारा संपत्तिविभाग तो मजूराकडून भांडवलदारानें मोफत घेतलेला 'वाढावा' म्हणजे 'नफा' म्हणावा. कारण याचें मोल मजूरास मिळालेलें नसतें. श्रमशक्ति हा पदार्थच असा आहे की त्याच्या वापरपासून त्याच्या मूळ मोलाहून अधिक धन निर्माण करण्याचें सामर्थ्य त्याचे ठिकाणीं असतें. हे अधिक धन भांडवलदारास 'वाढावा' या रूपानें मिळतें. वाढावा म्हणजे विकत घेतलेल्या मालावर मोफत मिळालेला अधिक माल. मजूरानें जर एकंदर १२ तास यंत्राशीं काम केलें व पहिल्या ६ तासांतील श्रम भांडवल संयोगजन्य संपत्तीपैकी त्याच्या श्रमाच्या हिश्शाचें फल त्याच्या स्वतःच्या व कुटुंबाच्या चरितार्थापुरतें ( स्वब्सिस्टन्स ) म्हणजे मजूराची श्रमशक्ति टिकविण्याइतकें म्हणजे 'श्रमशक्ती'च्या किमतीइतकें असलें तर मजूर पुढील ६ तासांत राबून मालकासाठीं वाढावा ( सर्प्लस व्हॅल्यू ) उत्पन्न करतो असें समजावें.

# प्रकरण २ रें

# भांडवली उत्पादनाचें प्रचंड स्वरूप

हल्ली जगांत जिकडे तिकडे प्रचंड कारखान्यांतून संपत्ति निर्माण झालेली आपण पाहतों. पण प्रचंड प्रमाणांत संपत्ति निर्माण करण्याचा हा प्रकार अगदी अलीकडील म्हणजे शे–दोनशे वर्षांतील आहे. त्यापूर्वीं लहान लहान कारागीर आपआपल्या खोपटयांतून व शेतकरी मालकीच्या लहान लहान शेतांतून मालकीच्या हत्यारानिशी संपत्ति निर्मीत असत. या सर्वांच्या गरजा थोडया असून खेडयास लागणारा बहुतेक माल तेथेंच निर्माण होई. एकमेकांच्या मालाची कोणत्या तरी प्रकारें देवघेव होऊन वजावाट होत असे. हत्यारें व जमिनी याचे कांही मालक मजूर लावूनहि काम करीत. पण जेथे मालाची निष्पत्ति, तेथेंच त्याचा बाजार व भोगवटयानें संहार होत असल्यानें तळावांतील पाणी वाऱ्यानें हाललें तरी त्यांत फारसा उंचसखलपणा येत नाहीं व येतो तेवढाही फारवेळ टिकत नाही, त्याप्रमाणें खेडयांतील आर्थिक राहणीतहि उंचसखलपणा फारसा आणि फार काळ राहात नसे व सर्व तेथल्या तेथेंच रहात असल्यानें तो मोठासा दुःसहहि होत नसे. सरदारांची खाजगी सैन्यें असून ते आपसांत व राजांशी भांडत; यामुळें प्रजेच्या संपत्तीची नासधूस व लुबाडणूक होत असे. राज्यसंस्था दुर्बल असल्यानें कायद्याचें राज्य बेताचेंच असे. त्यामुळें संपत्तीच्या संचयास व उत्पादनास विशेष हुरूप वाटण्यासारखी परिस्थिति नव्हती आणि संपत्ति निर्माण करण्याची साधनेंहि अगदी ओबडधोबड असल्यानें फार यातायातीनंतरहि संपत्ति निर्माण होई ती थोडीच असे.

युरोपियन इतिहासात ज्याला मध्ययुग म्हणतात त्याच्या शेवटीं म्हणजे सुमारें ४०० वर्षांपूर्वी आशिया व युरोप खंडांत जेथें जेथें समाज थोडा बहुत स्थिर होऊन राहिला होता तेथें या प्रकारची आर्थिक व राजकीय परिस्थिति होती. युरोपांत ही परिस्थिति मोडूं लागल्यापासून आधुनिक युगास सुरुवात झाली असें म्हणतात.

## भांडवलशाहीची अल्प सुरुवात

या वेळीं नौकानयनांत फार मोठी क्रांति होऊन साहसी प्रवाशांनी नवीन

भूप्रदेश शोधून काढले. यामुळें मोठ्या प्रमाणावर आतरराष्ट्रीय दळणवळण वाढण्याची मुहूर्तमेढ या वेळीं रोविली गेली. नवीन सांपडलेल्या अमेरिकेतील सोन्याच्या खाणीतून युरोपांत सोनें येऊं लागल्यामुळें मालाची देवघेव मोठ्या प्रमाणावर करून सोनें मिळवू पाहणारा व्यापारी वर्ग या वेळी प्रथम पुढें आला. युरोपातील राष्ट्रांत पहिल्यानें इंग्लडांत सरदारांचे प्रावल्य मोडून मध्यम म्हणजे व्यापारी वर्गाच्या पाठिंब्यावर पंधराव्या शतकाच्या अखेरीस प्रबळ राज्यसत्ता स्थापित झाली. याचा पहिला मोठा परिणाम असा झाला कीं, सरदाराचें प्रावल्य व दांडगाई बंद होऊन देशांतील सांपत्तिक व्यवसायास स्थैर्य आलें. आणि नवीन जगांतील सुवर्णलाभानें लोभप्रवृत्तीला जी एकदम चालना मिळाली ती सुयंत्र राज्यव्यवस्थेमुळें यापुढें इंग्लंडांत अव्याहत चालूं राहिली.

वर म्हटलें आहे की, स्वतांची जमीन किंवा हत्यारें घेऊन स्वतांच श्रम करून संपत्ति निर्मिण्याचा प्रकार रूढ होता तेव्हा जमीन व हत्यारांच्या मालकानें म्हणजेच भांडवलदारानें मजूरास नोकरीस ठेवून संपत्ति निर्मिण्याचा प्रकारहि रूढ होताच. राजकीय स्वस्थता निर्माण झाल्यावर या प्रकारास अधिक महत्त्व येऊं लागलें. कारण जमीन अगर हत्यार हीं संपत्तिसाधनें नसणाऱ्या मजूरास मिळेल त्या हलक्या मोलानें 'श्रमशक्ति' विकल्याशिवाय जगण्यास दुसरा उपाय नव्हता व त्याच्या अडलेल्या परिस्थितीचा फायदा घेऊन कमीत कमी मजूरीवर जास्तींत जास्त 'वाढावा' म्हणजे नफा मिळविण्यास टपलेल्या साधनवंताचा धनलोभ राजकीय स्वास्थ्यामुळें वारा घातलेल्या आगीप्रमाणें जोरानें उफाळला. ज्याला भांडवलशाही युग म्हणतात त्या हल्लींच्या युगास म्हणजे भांडवली उत्पादन प्रकार ज्यांत विशेष महत्त्वाचा आहे त्या कालखंडास येथून हळू हळूं सुरुवात झाली.

भांडवली उत्पादनप्रकाराचें पहिलें वैशिष्ट्य यावेळींच दिसून आलें. तें हें कीं, एका भांडवलवाल्यानें अनेक मजूर कामास लावून संपत्ति निर्मिण्यास सुरुवात केली. यामुळें काय झालें? एक मजूर नोकरीस ठेविला असतां जेवढा वाढावा भांडवलदारास मिळेल त्याच्या दसपट वाढावा दहा मजूर लावल्यानें मिळेल हें साध्या हिशेबानें कळतें. पण वस्तुस्थिति याहून वेगळी

असते. जमीन, हत्यारे, कच्चा माल व देखरेख ही एका मजूरास लागतात त्याच्या दसपट कांही दहा मजूरांस लागत नाहीत; कमी लागतात. ज्या जागेंत एक मनुष्य काम करतो तेथेंच दोन अथवा तीनहि काम करूं शकतात. दिवाबत्ती लागल्यास तीहि एकास लागेल तीच तिघांसहि पुरूं शकते. एकादें काम करताना आलटून पालटून हत्यारें बदलावी लागतात व ती पाळीपाळीने वापरली तर एका माणसास लागणाऱ्या हत्यारांनी तीन माणसेंहि काम करूं शकतात. एकावर देखरेख करणारा मनुष्य दहा जणांवरहि ती करूं शकतो.

कांही कामें अशी असतात कीं तेथें संख्याबलाचेंच महत्त्व असतें. उदाहरणार्थ ओझें उचलणें एकादी जड वस्तु उचलावयाची म्हणजे एका माणसाने अनेकदा आपली शक्ति वापरून कांहीच उपयोग नाही. अनेकांनी एकदम शक्ति लावल्यानेच तें काम होणारें असतें. येथें एक मनुष्य म्हणजे एकपट शक्ति तर दहा माणसांची दसपट असें म्हणण्यापेक्षा सामुदायिक शक्ति ही एक नवीन संघशक्तिच आहे असें म्हणावें लागेल. कारण एका माणसाने रोज एकदा याप्रमाणें दहा दिवस शक्ति लाविली काय अथवा एकदम दहा माणसांनीं एकाच वेळी लाविली काय, गणितानें दोनहि दशगुणितच आहेत. पण व्यावहारिक परिणामांत फरक पडतो तो असा की पहिल्या प्रकारात वजन जागचें हलणारहि नाहीं. दुसऱ्या प्रकारांत तें उचलले जातें. प्रचंड इमारती-सारखी कांही कामें अशी असतात कीं तेथेंहि संख्याबलाचेंच प्राधान्य असतें. एक मजूर पांच तास काम करून जेवढ्या विटा शिडीवरून गवंड्यास पोंचवील त्याच्या पांचपट नव्हे तर वीसपंचवीस पट विटा पांच मजूर पाच तासांत पोंचवितात हा नेहमींचा अनुभव आहे. सहकार्यानें माणसाची कार्यक्षमताहि वाढते. दोन घोडे जुंपलेल्या गाडीवर चांगला गाडीवान् असल्यास तो ज्याप्रमाणें जलद घोड्याबरोबर हळू चालणाऱ्यास चाबूक मारून पळवितो त्याप्रमाणें देखरेख करणारा मजूर चांगला असल्यास तो चलाख मजूरा-बरोबर इतरांसहि तितक्याच जलदीनें काम करावयास लावतो. आणि मजूरांमजूरांतहि काम करण्यांत चुरस लागून त्या योगानें त्यांची कार्यक्षमता वाढते. अर्थात् सहकार्यामुळें मजूरांच्या संख्येच्या प्रमाणांत भांडवलाचा खर्च कमी लागून तेवढ्याच मजूरींत उत्पादन अधिक होतें. म्हणजे भांडवलदारास मजूरां- कडून वाढावा अधिक मिळतो.

एकदां मोठ्या प्रमाणावर 'सहकार्या'चें तत्त्व अमलांत आलें कीं 'श्रमविभाग करतां येऊं लागतो. एक घड्याळ तयार करावयाचें म्हटलें तर त्यांत इतके वेगवेगळ्या प्रकारचे अवयव असतात कीं, प्रत्येकास हत्यार व कसब वेगवेगळ्या प्रकारचें लागू शकतें. श्रमविभागाचें तत्त्व अमलांत आलें की एकदम अनेक मजूर निरनिराळ्या अवयवाचें काम करून शेवटीं एकाच वेळीं कित्येक घड्याळें तयार होऊं शकतात. एकदां 'श्रमविभागा'नें संपत्ति निर्माण करावयाची म्हटल्यावर एकेक कारागीर एकेक भाग करण्याचें शिकून कारखान्यांत कामास लागू शकतो. यामुळें कारागिराचा शिकण्याचा खर्च कमी होतो आणि वर्षानुवर्षं एकच एक काम करून तो त्यांत अतिशय वाकबगार होतो. यामुळें माल सुबक व पुष्कळ निघूं लागतो. आणि अर्थातच मालकास मजूराकडून मिळणारा वाढावाहि वाढत जातो.

## यांत्रिक उत्पादनाचा उपक्रम

अशा प्रकारें सहकार्य व श्रमविभाग यांचा वाढत्या प्रमाणांत उपयोग होऊन भांडवली उत्पादनपद्धति इंग्लंडांत सोळाव्या व सतराव्या शतकांत हळूहळू प्रसार पावत होती. पण अठराव्या शतकांत उत्पादनाच्या साधनांत सुधारणा होऊन एकदम फार मोठी क्रांति झाली. ही सुधारणा म्हणजे संपत्त्युत्पादनाच्या कामीं यंत्राचा उपयोग होऊं लागला ही होय. यंत्र आणि हत्यार यांत वास्तविक प्रमाणाचाच फरक आहे, प्रकाराचा नाहीं असेंहि तत्त्वतः म्हणतां येईल. पण हत्यार व यंत्र यांचा वेगवेगळा व्यावहारिक परिणाम पाहिला म्हणजे मुळांतील फरक प्रकाराचाच आहे; केवळ प्रमाणाचा नव्हे हें कबूल करावें लागतें. गुळाचा खडा हातावर ठेवला तर तो उंचवटा, आणि त्याच अर्थानें हिमालय हाहि उंचवटाच आहे. पण व्यावहारिक फरक केवढा आहे? गुळाचा खडा डोळे मिटून मटकन मटकावितां येतो; पण हिमालयाच्या दुर्लंघ्यतेनें जगांतील केवढ्याहि प्रचंड शक्तीचा आज हजारों वर्षें पराभव चालविला आहे. प्रमाण फार वाढलें म्हणजे प्रकारच वेगळा होतो तो असा.

यंत्रामध्यें मुख्यतः तीन विभाग असतात. पहिलें शक्तीचें उत्पादक यंत्र. यंत्रापूर्वी माणसानें स्वतांची एकट्याची व समूहाची शक्ति वापरली. बैल, घोडा, खेचर इत्यादि जनावरांची व्यक्तिशः अथवा समुदाय करून त्यांची शक्ति

वापरली. पण ही अर्थात् मर्यादित होती. जिवंत प्राण्याची शक्ति म्हटली कीं ती मर्यादित व तीहि लहरी. वाफेची अथवा विजेची शक्ति हवी तेवढ्या प्रमाणांत जिवंत प्राण्याच्या लक्षावधि पटीनें उत्पन्न करतां येते व तिचे नियंत्रण करून अगदीं बिनचूक हिशेबानें कमीअधिक प्रमाणांत ती वापरतां येते. यंत्राचा दुसरा प्रकार म्हणजे शक्तीचें वाहक यंत्र. याचे पट्टे, दात्याचीं चाकें, घिरटें, विजेच्या तारा वगैरे अनेक प्रकार असतात. यांनी एका ठिकाणची शक्ति दुसऱ्या ठिकाणीं नेतां येतें. यंत्राचा तिसरा प्रकार जें उत्पादक यंत्र त्यास ही शक्ति पोंचवावयाची असते. वाहक यंत्राच्या शक्तीनें एका वेळीं अनेक हत्यारें उत्पादक यंत्रांत बसवून राबवितां येतात. हातीं हत्यार घेऊन काम करावयाचें तर एका हातांत एकच हत्यार घेतां येईल; एकादा विशेष कुशल मनुष्य दोन हातांत दोन हत्यारें घेऊन काम करील; पण येथें त्याची मर्यादा संपली. यंत्रानें दहा–वीस– कितीहि हत्यारें एकदम एक मनुष्य चालवूं शकेल. कितीहि माणसांची अथवा जनावरांची शक्ति एकवटली असतां न होणारीं कामेंहि यंत्राच्या साहाय्यानें होतात. एक टन म्हणजे ११२० पौंड वजनाचा हातोडा उचलून घाव घालण्यास शंभर किंवा हजार माणसांची शक्ति लागेल व ती लावतांच येणार नाहीं. पण असे कित्येक टन वजनाचे हातोडे अगदीं घड्याळ्याच्या ठोक्याप्रमाणें नियमित वेळानें व नियमित शक्तीनें वाटेल तितका वेळ यंत्राचे शक्तीमुळें चालवितां येतात.

याप्रमाणें यंत्रानें माणसाची उत्पादनशक्ति वाढविल्यामुळें यांत्रिक उत्पादन सुरू झाल्यावर पर्वतासारख्या मालाच्या राशी उत्पन्न होऊं लागल्या. यांची वाहतूक करणें खटाऱ्यास अशक्य झाल्यामुळें आगगाडी पुढें आली. एवढा पर्वतप्राय माल खपण्यास स्वदेश अपुरा पडल्यामुळें माल परदेशीं जाणें इष्ट झालें. त्यामुळें आगबोटी निघाल्या. परदेशांत विरोध उत्पन्न झाल्यामुळें तागडीवाल्या व्यापाऱ्यांस राजसत्तेनें पाठिंबा दिला व इंग्रजांसारख्या यंत्र-प्रधान राष्ट्रांचीं साम्राज्यें जगभर पसरलीं. यांत्रिक उत्पादनामुळें समाजाची जुनी घडी मोडली. ही मोडतांना नासधूसहि झाली. या क्रांतीचा माणसाच्या राहणीवर व समाजावरहि परिणाम झाला. यंत्र उत्पन्न झाल्यापासून एका शंभर वर्षांत मानवी जीवनाचें रूप इतकें विलक्षण पालटलें आहे कीं, आज नाना फडणवीस जिवंत होऊन एकदम मुंबईस अवतरल्यास पंचवीस वर्षें

जबरदस्तांशीं यशस्वितेनें झुंज देऊन जगप्रसिद्ध झालेला हा मुत्सद्दी मुंबईचा देखावा पाहून वेडा होईल; इतका विलक्षण पालट एका शंभर वर्षांत झाला आहे.

या जगड्व्याळ भांडवलशाहीचा उगम मजूरापासून भांडवलदारास मिळणाऱ्या वाढाव्याच्या लाभांतून झाला आहे. यंत्राने माणसाची उत्पादनशक्ति वाढली. त्यामुळें यंत्राच्या मालकास मजूरापासून वाढावा अधिक मिळूं लागला. त्यामुळें पुन्हां यंत्रें वाढली व परत वाढावाहि वाढला, तेव्हां पुन्हां यंत्रें वाढलीं. याप्रमाणें वाऱ्यानें आग व आगीनें वारा अशी परस्परांच्या प्रेरणेनें एकमेकांची वाढ होऊन यांत्रिक उत्पादनास व त्यावर आधारलेल्या भांडवलशाहीस आजचें हें जगड्व्याळ स्वरूप प्राप्त झालें आहे.

---

## प्रकरण ३ रें

## ब्रिटिश भांडवलशाहीचा उदय व विकास

जगांत अकस्मात् असें कांहीच निर्माण होत नाहीं. अकस्मात झाल्यासारखा दिसणारा ज्वालामुखीचा क्षोभ, धरणीकंप अथवा मानवी महायुद्ध यांचीं कारणें गुप्तपणें पुष्कळ काळ आपली वाट सावकाशपणें चालत असतात. तसेंच यंत्राचेंहि झालें. आधिभौतिक सृष्टींत प्रत्यक्ष प्रयोग करून माणसानें आपलें सृष्टिज्ञान वाढवावें आणि सृष्टिधर्मास आपल्या लगामी लावावें ही ओरड प्रथम रोजर बेकन व पुढें फ्रॅन्सिस बेकन यांच्या प्रेरणेने सुमारें तीनशें वर्षें चालू होती. न्यूटन, ग्यालिलिओ यांसारख्या शास्त्रज्ञांनी शास्त्रीय शोधहि लाविले. भांडवलवाला व मजूर यांच्या संबंधापासून उत्पन्न होणारा भांडवली धंदाहि थोडाफार चालू होता. छापखान्याचा धंदा हा याचें उत्कृष्ट उदाहरण होय. पंधराव्या शतकाचे शेवटीं नूर्नबर्ग येथें २४ छापखाने असून त्यांत कंपॉझिटर्स, प्रिंटर्स, प्रूफकरेक्टर्स, वगैरे सुमारें १००० कारागीर काम करीत असत. यांत यंत्राचाहि उपयोग केला जाई. चवदाव्या व पंधराव्या शतकांत नूर्नबर्ग व बेसल येथें भांडवली पद्धतीने चालणाऱ्या कागदाच्या गिरण्याहि होत्या. १३४१ त बोलोग्ना

येथें पाण्याच्या शक्तीवर चालणारी सूत कातण्याची गिरणीहि चालत असल्याचें हॉब्सन सांगतो.

पण यंत्राचा मोठ्या प्रमाणावर उपयोग होऊं लागण्यासारखी परिस्थिति सतराव्या शतकापर्यंत उत्पन्न झाली नाहीं. मध्ययुगाच्या सुरवातीस सरदारांचें प्राबल्य मोडल्यानें आर्थिक उत्पादनास अनुकूल अशी स्वस्थता उत्पन्न झाली असें मागें म्हटलें. नवीन जगांतील सोनें युरोपांत आल्यामुळें व्यापार-वाढीस अनुकूलता उत्पन्न झाली असेंहि तेथें म्हटलें आहे. पण वाढाव्याचा लाभ हें भांडवलशाहीचें मुख्य बीज आहे. त्या बीजावाचून कोणत्याहि मशागतीनें भांडवलशाहीचा वृक्ष वाढणें शक्य नव्हतें. हें बीज कोठून मिळालें ?

## वाढावाबीज कोठून मिळालें

मध्ययुगाच्या पूर्वी गांवोगांव धंद्यांचे संघ असत. आपसांत चढाओढ लागूं नये व नवीन माणसास शिरकाव मिळूं नये म्हणून या संघांचे कडक शिस्तीचे, नियम होते व तशाच कडकपणें ते अमलांत येत. बेकारी असली तरी बेताची होती. याचें कारण असें कीं सरदारांचीं सैन्यें असून देशांत लहान मारामाऱ्या व मोठी यादवी नेहमीं चालत असे; लढाई करणें व लढाई नसेल तेव्हां गांवगुंडी करणें हा मोठाच धंदा होता. ही यादवी व्यापारधंद्याच्या वाढीस प्रतिकूल तशीच लोकसंख्येच्या वाढीसहि प्रतिकूल होती. यामुळें श्रम करण्याच्या शक्तीवाचून मालकीचें कांहीं नाहीं असा अडलेला मजूर भांडवल-वाल्यास वाढावा घालण्यास अजून उपलब्ध झाला नव्हता. सरदारांचें प्राबल्य मोडून राजसत्ता दृढतेनें प्रस्थापित झाल्यावर सर्व परिस्थिति एकदम पालटली. बेकार झालेले सरदारांचे सैनिक तरवारी मोडून टाकून भांडवलदाराच्या दारीं काम मागण्यास हजर झाले. सरदार व जमीनदार यांचा लढाईचा व्याप संपल्यावर जवळची पुंजी वापरून व्यापारी व्हावें धंदेवाला व्हावें इकडे त्यांच्या महत्त्वाकांक्षेचा ओघ वळला. इंग्लंड, हॉलंड,जर्मनी, इटाली ह्या देशांतील अगदीं पहिले भांडवलवाले, सरदार व जमिनदार या वर्गांतून पुढें आले. त्यांनीं व त्यावेळीं उदयोन्मुख अशा व्यापारी वर्गानें राजावर वजन पाडून धंद्यांच्या संघांचे नियम शिथिल केले. स्वस्थतेमुळें धनसंचय व व्यापारी मालाची वाहतूक अधिक सुरक्षित झाली आणि दारीं आलेल्या मजूरास कमींत कमी

मजूरीवर कामास लावून संपत्ति निर्मिणें व वाढावा उपटणें हा उद्योग नवीन जन्मास आलेल्या भांडवलदार वर्गानें सुरू केला. यामुळें एका देखरेखीखालीं, एका जागेंत अनेक मजूर काम करूं लागून सहकार्य पद्धति अमलांत आली; त्यामुळें श्रमविभाग सुरू झाला; यामुळें कामगारांचें कसब वाढलें व माल पुष्कळ पुष्कळ निर्माण होऊं लागला. या पुष्कळ होणाऱ्या मालापुढें जुने लहान धंदेवाले बुडाले व बेकारांची संख्या वाढली. त्यामुळें आणखी वाढावाहि वाढला आणि भांडवलवाल्याजवळ भांडवलहि पुष्कळ जमा झालें. सारांश, भरपूर भांडवल, भरपूर मजूर, त्यांना सहकार्यानें व श्रमविभागानें काम करण्याची संवय व वाकबगारी, व्यापारधंद्यास राजकीय स्वस्थता व राजकीय उत्तेजन इतक्या गोष्टी अनुकूल झाल्या तेव्हां मोठ्या प्रमाणांत यांत्रिक उत्पादन शक्य झालें व यांत्रिक शोधास स्फूर्ति मिळाली. इंग्लंडांत भांडवलाचा महापूर येण्यास एक विशेष कारण असें झालें कीं १७६० त प्लासीची लढाई झाल्यानंतर धरण फुटल्याप्रमाणें बंगाल्यांतील अपरंपार संपत्तीचा ओघ कंपनीच्या नोकरांकरवी इंग्लंडांत अखंड वाहूं लागला.

## यांत्रिक क्रांतीचे परिणाम

यांत्रिक क्रांति करणारें पहिलें यंत्र म्हणजे वाफेचें एंजिन हें होय. अठराव्या शतकांत हीं एंजिनें कोळशाच्या खाणींतून पाणी उपसून काढणाऱ्या पंपासाठीं वापरलीं जात. या खाणींतून लोखंड वितळण्यासाठीं 'कोक' काढला जात असे. ग्लासगो येथील एक हत्यारांचा कारागीर जेम्स वॅट यानें या पंपिंग एंजिनांत सुधारणा करून तें यंत्रें चालविण्यायोग्य केलें आणि या एंजिनावर १७८५ सालीं इंग्लंडांत कापसाची गिरणी सुरू झाली. ट्रेव्हिथिक यानें १८०४ मध्यें या एंजिनाच्या साह्यानें पहिलें आगगाडीचें एंजिन तयार केलें. १८२५ सालीं स्टॉक्टन व डार्लिग्टन यांचे दरम्यान पहिली आगगाडी सुरू झाली. रेल्वेची वाढ पुढें इतकी भराभर झाली कीं १८५० चे सुमारास सर्व युरोपभर रेल्वेचें जाळें पसरलें.

आगगाडीच्या उपक्रमापासून पहिली मोठी क्रांति ही झाली कीं पंचवीस हजार मैल घेर असलेल्या पृथ्वीवर आपापल्या लहान क्षेत्रांत कोंडलेला मनुष्य कोंडवाडा फोडून पृथ्वीभर पसरला. रशियावरील प्रसिद्ध स्वारीहून नेपोलियन ३१२ तासांत १४०० मैल अंतर तोडून पारिसला आला. हा नेपोलियनचा

फार मोठा पराक्रम, अशी इतिहासांत त्याची ख्याति आहे. सामान्य माणसास याच्या दुप्पट वेळ लागला असता. रोमन साम्राज्याच्या वेळेपासून नेपोलियन अखेर वाटचालीचा वेग माणसास याहून कधींच वाढवितां आला नाहीं. पण नेपोलियनचा पाडाव झाल्यानंतर दहाच वर्षांनीं म्हणजे १८२५ सालीं कोणाहि प्रवाशास १४०० मैल जाण्यास आगगाडीच्या साहचानें ४९ तास पुरे होऊं लागले. वाफेची शक्ति जहाजांच्या उपयोगी पडूं लागल्यावर जहाजांच्या वाहतुकी-मध्येंहि प्रचंड क्रांति झाली. एकोणिसाव्या शतकापूर्वीं २००० टन वजनाहून अधिक वजनाचें जहाज मुळींच नसे. आज सामान्य वाहतुकीचें जहाजहि ५०००० टन असूं शकतें. यामुळें जहाजें बांधण्याची विद्याहि वाढली. २००० टनांचें जहाज साध्या लोखंडाचेंहि चालत असे. पण ५०००० टनांचे जहाजास रासायनिक मिश्रणानें नवीन धातु बनवावी लागते तेव्हांच तें जहाज टिकाऊ होऊं शकतें. वाफेच्या शक्तीनें जमीन व समुद्र यांवर वाहतूक चालू झाली त्या वेळींच वॉल्स गॅल्व्हनी व फॅरेडे यांच्या शोधांनीं विजेचें तारायंत्र सुरू झालें. १८३५ सालीं विजेचें पहिलें तारायंत्र जमिनीवर सुरू झालें आणि १८५१ त फरान्स व इंग्लंड यांचे दरम्यान समुद्रांतून तार सुरू झाल्यावर थोडयाच काळांत जगभर हें तारांचें जाळें पसरलें. वाफेच्या शक्तीनंतर दुसरी मोठी शक्ति म्हणजे विजेची. हिचा बातमी पोंचविण्याप्रमाणें दिवे लावणें व यंत्रें चालविणें या कामींहि उपयोग होऊं लागला. यापुढें तिसरी मोठी क्रांतिकारक शक्ति म्हणजे स्फोटक तेलांच्या मिश्रणानें उत्पन्न होणारी. यापासून मोटारी व विमानें हीं निर्माण झालीं. पहिलें विमान १८९७ सालीं प्रो. लँग्ले यानें केलें. त्यांतून मनुष्य जाऊं शकत नसे. १९०९ सालीं विमानांत सुधारणा होऊन त्यांत माणसांस बसून जातां येऊं लागलें. वाटचालीच्या वेगांत विमानानें विलक्षणच क्रांति केली. अठराव्या शतकांत लंडनपासून एडिंबरोस जाण्यास आठ तास लागत. आतां तेवढ्या वेळांत अर्धी पृथ्वी-प्रदक्षिणा करतां येईल अशी विमानविशारदांना आकांक्षा वाटूं लागली आहे.

सहकार्य व श्रमविभाग यांनीं आधुनिक युगास म्हणजे भांडवलशाहीच्या युगास आरंभ केला, त्यापूर्वीं या युगास अनुकूल अशा प्रकारची परिस्थिति निर्माण झाली होती असें वर म्हटलें आहे. पण एकदां भांडवलशाही हळू-हळू सुरू झाल्यावर जंगलांतील प्रवासी कोयत्यानें आपली वाट तोडीत पुढें

जातो त्याप्रमाणें भांडवलशाहीला आपली प्रगति जुनी समाजरचना मोडीत मोडीत करावी लागली. अगदीं आरंभीं व्यापारी वर्गाजवळ भांडवल होतें व इंग्लंडांत जमिनीचा धंदा किफायतीचा होता. पण धर्मसत्ता पोपची असून पोपकडे पुष्कळशा जमिनी मालकीनें वहिवाटीस होत्या. या जमिनींचा व्यापाऱ्यांना लोभ सुटल्यामुळें आठव्या हेन्रीच्या कारकीर्दींत पोपच्या सर्व जमिनी व मालमत्ता जप्त झाल्या व त्या या व्यापाऱ्यांना विकण्यांत आल्या. धार्मिक अंधश्रद्धा लोकांत प्रबळ असल्यामुळें माल खपण्यास व व्यापारधंद्याच्या वाढीस सर्व बाजूंनीं प्रतिकूलता होती. पण पोपची सत्ता झुगारून देऊन राजा धर्माधिकारी झाल्यामुळें धर्मदृष्टि निवळूं लागली. इहलोकचें जिणें परलोकाकरितां आहे हें खूळ जाऊन ऐहिक योगक्षेमाचा खटाटोप अवश्य आहे, ज्ञान मिळविण्याचा प्रत्येकास हक्क आहे, व ईश्वराचे दृष्टीनें सर्व लोक सारखे आहेत हें मत प्रबळ झालें. यामुळें ऐहिक उत्कर्षाच्या प्रयत्नास स्फूर्ति मिळाली आणि भांडवलदार वर्गाच्या प्रयत्नास राजाचें पाठबळ असल्यानें सर्व बाजूंनीं इंग्लंडच्या वैभवास चढती कळा लागली. फरान्समध्यें रोमन कॅथोलिक धर्म शिल्लक राहिला तरी पोपची सत्ता नष्ट झालीच. पोपची सत्ता या वेळीं नष्ट होणें हें भौतिक उत्कर्षास किती अपरिहार्य होतें, याचा पुरावा स्पेनचा इतिहास देतो. पोपचा धर्माधिकार स्पेनमधून कमी झाला नाहीं. यामुळें स्पेनमध्यें औद्योगिक क्रांति आजवरहि झालेली नाहीं. प्रॉटेस्टंट धर्माचें रहस्य व्यक्तिस्वातंत्र्य हें आहे. धर्माचे क्षेत्रांत एकदां स्वातंत्र्याची वृत्ति बळावली म्हणजे मनुष्याचें मनच बदलतें. आणि या क्षेत्रांतील स्वातंत्र्यवृत्ति इतर सर्व क्षेत्रांत संचारूं लागते.

## मध्यम वर्गाचें वाढतें बळ

सोळावे शतकभर पोपची सत्ता झुगारून देऊन जो धनिक वर्ग इंग्लंडांत राजाश्रयाखालीं बळावत होता तो सतराव्या शतकांत हळूहळू राजासहि विरोध करूं लागला. पार्लमेंट सभेंत या वेळीं मध्यम म्हणजे धनिक वर्गाचें वर्चस्व होतें. जुना सरदारवर्ग राजाच्या कलानें वागे. पण धनिक वर्गास लहरी राजापासून आपल्या संपत्तीचें रक्षण करणें इष्ट वाटून राजाच्या राज्यसत्तेस पायबंद घालण्याचा खटाटोप या मध्यम वर्गानें सतत शंभर वर्षें केला. पिम्, हॅम्डन, एलियट, ऑलिव्हर क्रॉम्वेल हे पहिल्या चार्लसविरुद्ध लढणारे

पार्लमेंटचे पुढारी मोठमोठे धनवान शेतकरी होते. व्यापारधंद्याच्या वाढीस राजाच्या लहरी कारभारानें अडथळा येतो, राजा कर्जे बुडवितो व प्रजेवर भारी कर बसवून वाईट कामीं खर्च करतो ही यांची मुख्य तक्रार होती. यासाठीं पहिल्या चार्लसशीं पार्लमेंटानें उघड सामना देऊन त्यास फांशीं दिलें, त्याचा दुसरा मुलगा जेम्स यास पुढें पदच्युत केलें व तिसऱ्या वुइल्यमला कर्तव्यबंधनांनीं बांधून राज्यावर बसविलें. तिसऱ्या विल्यमच्या वेळीं इ. स. १६९४ सालीं राजास कर्ज देण्याच्या निमित्तानें धनिक वर्गानें प्रसिद्ध 'बँक ऑफ इंग्लंडची' स्थापना केली. तेव्हांपासून या बॅंक ऑफ इंग्लंडचें, सावकाराचें कुळावर वर्चस्व असतें तसें वर्चस्व इंग्लंडच्या राजावर व सर्व राज्यकारभारावर पडूं लागलें. आज सव्वादोनशें वर्षांनंतरहि हें वर्चस्व कायम आहे. सतराव्या शतकांत धनिक वर्गांत राजकीय महत्त्वाकांक्षा उत्पन्न होण्याचीं कारणें सांगतांना जॉन स्ट्राची म्हणतोः—" या वेळीं व्यापार धंद्यांत मोठ्या क्रांतीची वेळ आली होती. मालाची देवघेव वाढली. धंद्याच्या पोटशाखा बळावल्या. एकंदर पैदासहि यामुळें वाढली. संपत्ति एकएकट्याच्या हातांत पुष्कळ पुष्कळ साचूं लागली. यामुळें लहरी राजांचा बेदरकार कारभार अपुरा व उत्कर्षास विघातक वाटूं लागला. कार्यक्षम असें राज्यकारभाराचें यंत्र, न्यायनिपुण न्यायाधीश, करारांची सक्तीनें व निःपक्षपातानें बजावणी, स्वदेशाबाहेर दरारा बसवून व्यापारवाढीस अनुकूलता उत्पन्न करील आणि स्वदेशांतील असंतुष्ट वर्गास भरडून काढील असें तयार खडें सैन्य या सर्वांची गरज तीव्रतेनें वाटूं लागली. असें समर्थ राज्ययंत्र कोणीं तरी उभें करून चालविणें अवश्य झालें " राजास तें जमेना. तेव्हां धनिक वर्गानें जबरदस्तीनें स्वतां त्यास हातांत हात घालून राज्यकारभाराची धुरा आपल्या हातीं घेतली. (कमिंग स्ट्रगल फॉर पॉवर)

हा धनिक मध्यम वर्ग स्वतांचे हातीं राज्यसत्ता घेण्यास उत्सुक होता. पण याच क्रमानें ती खालच्या वर्गाकडे जावी हें त्यास मान्य नव्हतें. १६४९ त चार्लसचा वध केल्यावर क्रॉम्वेलनें सत्ता धारण केली त्या वेळीं राजाशीं झालेल्या युद्धांत खालच्या वर्गानें आपलें रक्त सांडलें असल्यानें त्यांना साहजिकच महत्त्व आलें. पण हें न खपून मध्यम वर्गानें क्रॉम्वेलच्या मागून दुसऱ्या चार्लसला गादीवर बसविलें व राजसत्तेचा पुनरुद्धार केला. १६८९

मध्यें जेव्हां पार्लमेंटनें जेम्सला पदच्युत केलें तेव्हां लोकमताचें वादळ मुळींच उठविलें नाहीं. जेम्सचा जांवई व हॉलंडचा राजा विल्यम यास बोलावून आणून त्यास पार्लमेंटनें राज्यावर बसविलें व जनतेच्या नांवानें धनिक वर्गानें राज्यकारभार हळूहळू आपल्या हातीं घेतली.

फरान्सच्या राज्यक्रांतीचे वेळीं इंग्लंडनें फरान्सांतल्या क्रांतीस विरोध केला व स्वदेशांतहि लोकमत दडपण्यासाठीं कायदे केले त्याचें इंगित हेंच आहे. १७८९ साली फरान्समध्यें जी क्रांति झाली तीत वास्तविक इंग्लंडच्या मध्यम वर्गास मान्य अशीं पुष्कळ तत्त्वें होती. सरदार, पुरोहित व राजा यांचें प्राबल्य मोडून राज्यव्यवस्था सुरळीत करणें, धार्मिक श्रद्धा नाहींशी करून लोकांना भौतिक उत्कर्षाच्या प्रयत्नास लावणें, कायद्यानें सर्व व्यक्तिमात्रास व्यवसायस्वातंत्र्य देणें व समान लेखणें या गोष्टी इंग्रज मध्यम वर्गानें प्राप्त करून घेतल्या असून फरेंच मध्यम वर्गास क्रांतिसाधनानें साध्य करून घ्यावयाच्या होत्या. पण फरान्समधील स्वातंत्र्याच्या चळवळीची लाट आतां इंग्लंडवर येऊन आदळणें इंग्लिश मध्यम वर्गास गैरसोईचें वाटलें. कारण इंग्लंडांत आतां स्वातंत्र्याची चळवळ होणार ती गरीब, खालच्या वर्गाची व ती होणार मध्यम धनिक वर्गाविरुद्ध. म्हणून इंग्लिश धनिक वर्गानें फरान्सच्या राज्यक्रांतीस प्रथमपासूनच विरोध केला.

फरान्सच्या राज्यक्रांतीच्या आरंभी पुकारण्यांत आलेली प्रजासत्तेची तत्त्वें पुढें धुळीस मिळवून नेपोलियन बादशहा झाला हें खरें; पण पुरोहित व सरदारांची सत्ता नष्ट झाली ती कायमचीच झाली आणि कायद्याचें राज्य, व व्यवहारस्वातंत्र्य जें उदयोन्मुख मध्यम वर्गास हवें होतें तें नेपोलियननें दिलें. नेपोलियननें साऱ्या युरोपभर जो धिंगाणा घातला त्याचा तेथेंहि असा परिणाम झाला कीं साऱ्या युरोपांतील सरदारसत्ता त्यापुढें धुळीस मिळाली. पुढें औद्योगिक उत्कर्षाचें जें युग जर्मनींत सुरू झालें त्याची पूर्वभूमिका नेपोलियनच्या स्वारीनें कांहीं अंशीं तयार करून ठेविली होती. एकोणिसाव्या शतकाच्या आरंभीं युरोपांत सरदारांचे इमले कोसळून धनिक वर्गास महत्त्व आलें. त्या वेळी इंग्लंडांत धनिक वर्गानें एक शतकापूर्वीच राज्यसत्ता काबीज केली असून कानडा व हिंदुस्थान या देशांत साम्राज्यहि वाढविलें होतें. इंग्लंडांत उत्पादक धंद्याचीहि वाढ झाली असून यांत्रिक शोध लागू लागले होते.

या यंत्राचा तात्कालिक वापरहि सुरू झाला. म्हणून एकोणिसाव्या शतकाच्या मध्यापर्यंत इंग्लंड हें सर्व जगांत औद्योगिक उत्कर्षांत अग्रेसर होऊन बसलें.

या औद्योगिक अथवा यांत्रिक क्रांतीनें इंग्लंडच्या अंतर्गत राहणींतहि फार पालट झाला. कुटुंबसंस्था मोडकळीस आली व लहान धंदे साफ बुडाले. जे लहान धंदेवाले बेकार झाले ते कारखानदारांच्या दारीं काम मागण्यास जमा झाले. स्वातंत्र्याची व आधिभौतिक उत्कर्षाची चळवळ युरोपांतहि पसरल्यामुळें ब्रिटिश कारखानदारांस तेथेंहि गिऱ्हाईक मिळालें. कोळसा व लोखंड इंग्लंडांत भरपूर व कापडाच्या धंद्यास हवा, बंदर वगैरेची अनुकूलता; दर्यावर्दीपणांत तर इंग्रज सर्वश्रेष्ठ त्यांतच साम्राज्यहि वाढीस लागलेलें. यामुळें इंग्लंडच्या वैभवास एकोणिसाव्या शतकाच्या दुसऱ्या चतुर्थापासून अगदीं बहर येऊं लागला.

---

## प्रकरण ४ थें

# अर्थशास्त्रज्ञांचीं नीतितत्त्वें

भांडवलशाहीची उत्पादन पद्धति पूर्वीच्या उत्पादनपद्धतीहून वेगळी असते असें मागें म्हटलें आहे. भांडवलशाहीपूर्वीच्या उत्पादनांत जमीन अथवा हत्यार स्वतांच्या मालकीचें असणारा माणूस त्याच्या साहृयानें कष्ट करून पोट भरी. युरोपांतील कांहीं राष्ट्रांत व प्रामुख्यानें अमेरिकेंत गुलामगिरी चालू होती. जमीन अथवा हत्यार गुलामाच्या मालकीचें नसे इतकेंच नव्हे तर त्याच्या देहावरहि त्याची मालकी नसे. तो स्वतां मालकाच्या मालकीचा होता. त्याच्या पाठीवर कोरडे ओढून मालक त्याजपासून संपत्ति निर्माण करून घेई. युरोपांत कांहीं शेतकरी भूदास असून त्यांना पिढ्यानुपिढ्या एकाच मालकाच्या शेतींत राबावें लागे. हे गुलाम नव्हते. त्यांच्या मालकीच्या जमिनी होत्या, पण त्याचा प्रकार असा होता कीं जमिनदारांच्या शेतींत मशागत केली तर त्याच्या बदला भूदासास स्वतांच्या जमिनीवर मालकीहक्क सांगतां येई. यासाठीं आठवड्यांतून

चार दिवस मालकाच्या शेतीवर मालकासाठीं काम व उरलेले दिवस स्वतांच्या शेतावर काम असे भूदासांचे कामाचे दिवस वाटलेले असत. या दोनहि प्रकारांत कमीअधिक गुलामगिरीच होती हें उघड आहे भांडवलवाले उत्पादक म्हणून पुढें आले ते गुलामगिरी अथवा भूदास पद्धति यांचें शत्रुत्व पत्करून व व्यक्तिस्वातंत्र्य व सामाजिक समता यांची आरोळी ठोकूनच पुढें आले. सर्व समाजांतील उच्चनीच भाव काढून टाकला तर उच्च प्रकारच्या कर्तृत्वास प्रेरणा कोठून मिळणार, असा समाजवाद्यांविरुद्ध आज आक्षेप घेतला जातो तसाच आक्षेप व्यक्तिस्वातंत्र्यवाद्यांविरुद्ध त्या वेळीं घेतला जाई. गुलामांना किंवा भूदासांना जर स्वातंत्र्य द्यावयाचें, कामधंदा करावयाची सक्ति करावयाची नाहीं तर समाजांत संपत्त्युत्पादक परिश्रम होणार कसा? हा तो आक्षेप होय.

## कायद्याचें स्वातंत्र्य पण भुकेची गुलामगिरी

भांडवली उत्पादन पद्धतीच्या दृष्टीनें या प्रश्नास विशेष महत्त्व होतें. भांडवलशाहीपूर्वीं एकाद्या शेतकऱ्यानें काम न केल्यास अथवा वाईट केल्यास तो गुलाम असेल तर त्यास चाबकाचें भय असे, भूदास असेल तर सरकारी सक्ति असे. भांडवलशाहींत ही सक्ति कांहीं नव्हती; उलट उत्पादनाचा प्रकार तर असा कीं कोणाहि माणसाच्या चुकीनें सर्वांच्या कामाचें नुकसान होण्याचा संभव असे. श्रमविभागाचें तत्त्व अमलांत आल्यामुळें, समजा, मोटारीच्या कारखान्यांतील एकादा स्क्रू करण्याचें काम ज्या इसमाकडे आहे त्यानें चुकारपणा केला अथवा काम करण्याचें टाळलें तर मोटारी पूर्ण न होऊन शेकडों कामगारांचें काम व्यर्थ जाणें शक्य आहे. पायाच्या बोटास कांटा बोचला तर त्याची तिडीक सर्व शरीरभर पसरते; असें भांडवली उत्पादन सर्व एकजीव असतें. सर्वांनीं काम सक्तीनें केल्यावाचून कामाचा उठाव होतच नाहीं. एक मनुष्यहि सर्वांचें काम नासूं शकतो. असें असतां 'चाहील तसें वागा' असें पुकारून मोकाट सोडलेल्या माणसांना एकजुटीनें मन लावून काम करण्याची स्फूर्ति कशी उत्पन्न करता आली असेल? ही स्फूर्ति पोटाच्या भुकेंतून निर्माण झाली. मनुष्य जेव्हां गुलाम होता तेव्हां त्याच्या पोटाची जबाबदारी कायद्यानेंच मालकावर लादली होती; पण मनुष्य भांडवलवाल्यांच्या इच्छेप्रमाणें एकदां स्वतंत्र झाला कीं तो उपाशी

मेला तरी जबाबदारी त्याची त्याच्यावर. असा स्वतंत्र मनुष्य पोटासाठीं सरळ आपखुषीनें श्रम करील हें उघड दिसतें. पण समजा त्याची लहानशी स्वतांची जमीन असली अथवा स्वतांचा हातमाग, सुतारी, लोहारीचीं हत्यारें त्याच्या मालकीचीं असलीं तर तो भांडवलदाराच्या दारीं काम मागण्यास जाईल कशाला ?

तेव्हां भांडवलवाल्यांच्या दृष्टीनें प्रत्येक मनुष्य दोन प्रकारें स्वतंत्र पाहिजे. एकतर तो गुलाम अथवा भूदास याप्रमाणें दुसऱ्याच्या मालकीचा असतां उपयोगी नाहीं. भांडवलवाल्याची नोकरी राजीखुषीनें पत्करण्यास त्याचा तो स्वतंत्र पाहिजे, तरच भांडवलवाल्यास मजूर मिळू शकतील. हरिश्चंद्रानें साऱ्या राज्याचें दान विश्वामित्रास केलें खरें; पण स्वतांचा देह, तसाच तारामतीचा व रोहिदासाचाहि देह त्यानें दान देऊन टाकला नव्हता. म्हणून काशीस जाऊन भरचव्हाटचावर या तीनहि श्रेष्ठ व्यक्तींना आपल्या बहुमोल देहाचा मालकीनें लिलाव करतां आला व दक्षिणा देतां आली. नाहींतर सर्वस्व देऊन अखेर दक्षिणा न दिल्यामुळें हरिश्चंद्रास नरकास जावें लागतें. तसेंच मजूरांच्या बाजारांत हरिश्चंद्राप्रमाणें स्वतांस विकण्याचें स्वातंत्र्य प्रत्येक माणसास पाहिजे. माणसास दुसरें स्वातंत्र्य हवें तेंहि अगदीं पुण्यश्लोक हरिश्चंद्रासारखेंच. तें असें कीं, हरिश्चंद्राजवळ जसें आपल्या देहाखेरीज दक्षिणा देण्यास कांहीं नव्हतें त्याप्रमाणें मजूर होण्याची स्फूर्ति उत्पन्न होण्यास माणसाजवळ चरितार्थाचें जमीन अथवा असें कांहींहि साधन असतां उपयोगी नाहीं. आपली श्रमशक्ति विकण्यास सिद्ध व्हावें नाहीं तर बायकामुलांसह मरावें असा तो अनन्यगतिक असला पाहिजे. म्हणजे कोणत्याहि प्रकारच्या संपत्तिसाधनाच्या मालकीच्या बंधनापासून तो स्वतंत्र असला पाहिजे. सारांश, कोणतीहि सक्ति न करतां भांडवलदाराच्या दारीं राबू शकेल असा मनुष्य निर्माण होण्यास समाजांत व्यक्तीच्या देहावर स्वतांची सत्ता निर्माण झाली पाहिजे व त्या व्यक्तीचें मालकीचें संपत्तिसाधन नाहीसें झालें पाहिजे. गुलामगिरीच्या नाशाची चळवळ परोपकारी सत्पुरुषांनीं केली. पण मध्यम वर्गानें तिला पाठिंबा दिला व तिला अखेर यश आलें तें माणसास पहिल्या प्रकारचें स्वातंत्र मिळावें म्हणून. दुसरें स्वातंत्र्य मिळालेलीं माणसें निर्माण करण्याचा क्रम इंग्लंडांत सुमारें चारशें वर्षें सतत

चालला होता. सरदारांचीं सैन्यें मोडल्यामुळें हे बेकार सैनिक मजूर झाले असें मागें सांगितलें. पण यादवी थांबून स्वस्थता झाल्यावर शेतीचा धंदा किफायतीचा होऊन पुष्कळ लहान लहान शेतकरी निर्माण झाले. ज्या मध्यम वर्गाजवळ व्यापारधंद्यामुळें अथवा इतर कारणांनीं संचित धन होतें अथवा ज्या जुन्या सरदार, जमिनदारांजवळ पुंजी शिल्लक होती त्यांनी लहान शेतकऱ्यांच्या आर्थिक अडचणींचा गैरफायदा घेऊन सावकारी पद्धतीनें अथवा इतर भल्याबुऱ्या मार्गांनी या लहान शेतकऱ्यांच्या जमिनी गिळंकृत केल्या व त्यांना भांडवलवाल्यांच्या उपयोगासाठीं देशोधडीस लावलें. हे मार्ग खाजगी स्वरूपाचे होते. पण पुढें अठराव्या शतकांत शेतीची सुधारणा करण्याच्या निमित्तानें इंग्लंडांत सरकारनें जमिनीच्या लहान तुकड्यांचें एकीकरण करून मोठ्या जमिनी करण्यासाठी 'एन्क्लोजर' नांवाचे कायदे केले. यामुळें कायदेशीरपणेंच शेतकऱ्यांची जमिनींच्या तुकड्यांतून मजूरांच्या बाजारांत हकालपट्टी झाली. इकडे शेती शास्त्रीय पद्धतीनें केल्यामुळें शेतीस मजूर व इतर सर्व खर्च कमी लागून उत्पन्न वाढलें व वाढलेलें उत्पन्न अंशत: कारखान्यांस भांडवल म्हणून जाऊं लागलें. हरिश्चंद्रानें स्वतांस विकून एकदाच दक्षिणा देऊन टाकिली. पण बाजारांत स्वतांस विकून घेणारा मजूर आपण पहिल्या प्रकरणांत पाहिल्याप्रमाणें रोजच्या रोज स्वतांस विकून 'वाढावा' देऊं लागला. हा वाढावा व किफायतशीर शेतीतून येणारें नवें भांडवल हें गुंतवून हा भांडवली विश्वामित्र रोज नवे हरिश्चंद्र खरेदी करी व याच क्रमानें प्राचीन विश्वामित्राच्या स्वप्नीहि न आलेली प्रतिसृष्टि या भांडवलवाल्यांनी निर्माण केली आहे. असो.

शेतीवरून हुसकलेले शेतकरी सक्तीनें मजूर बनविले गेले. पण पुढें मात्र मजूरांची वाढ अगदीं 'यदृच्छेनें' झाली. शेतीत, कापसाच्या गिरणींत, इमारतींत अथवा दुसऱ्या कोठेंहि एकदां भांडवली पद्धतीचें उत्पादन सुरू झालें की तें प्रचंड प्रमाणावर सुरू होतें. त्यांत यंत्रें, वाकबगार कारागीर, टापटीप, काटकसर, देखरेख, नियमितपणा, हिशेब, पतीचा व्यवहार, यांमुळें कमी खर्चांत पुष्कळ उत्पादन होतें. यंत्राचे साह्यानें उत्पादन पुष्कळ झालें कीं त्याच्या विक्रीची व्यवस्थाहि सुसंघटितपणें स्वतंत्र माणसाकरवीं होत असते. अर्थात् हा कारखान्यांतून होणारा माल

स्वस्त पडतो. याच्याशीं ज्यांनीं हातमागावर कापड विणावें व दारोदार गिऱ्हाइक मागत फिरावें अशा खाजगी लहान धंदेवाल्यांचा व व्यापाऱ्यांचा चढाओढींत निभाव लागत नाही. म्हणून हे धंदेवाले धंदा गुंडाळून भांडवल-वाल्याच्या दारीं नोकरीसाठीं जातात व त्यांना नोकरीस ठेवन भांडवलवाला आपला 'वाढावा' वाढवीत असतो.

## मागणी व पुरवठा या सिद्धांताचें कर्तृत्व

पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्य असलेला माणूस भांडवलदाराच्या कारखान्यांत राब-ण्यास राजीखुषीनें कसा आला या प्रश्नाचा असा खुलासा झाला. भांडवल-शाही उत्पादनांत आणखी एक अडचण दिसते तिचा आतां विचार करूं. भांडवलशाहीपूर्वी साधारण मानानें प्रत्येक खेडें स्वयंपूर्ण असे. त्या खेड्यांतील कुंभारास दरसाल गाडगी, मडकीं, चुली, शेगड्या आपल्या गांवास किती लागतात हें नेहमीं ठाऊक असे. चांभारास, लोहारास, सुतारास, या सर्वांस आपण वर्षांत किती धन निर्माण करायचें व तें कोणाला विकायचें, मोबदला किती घ्यावयाचा हें सगळें अगदी पिढ्यानुपिढ्या पाठ होतें. त्यांचा बाजार त्यांच्या गांवांत, कदाचित् त्यांच्या अंगणांतच होता. भांडवलशाहीत हें सर्व बदललें. घड्याळें, मोटारी, कापड, आगगाडी—तारायंत्र यांचें सामान, गहू, तांदूळ, कापूस या सर्व मालाची बाजारपेठ आतां साऱ्या जगभर झाली. एवढ्या प्रचंड बाजारांत किती माल लागतो आणि सालोसाल मागणी किती कमी अधिक होते हें ठरविण्याचें मोजमाप काय? बरें, माणसास कांहीं एक दोन तीन वस्तु पुरत नाहींत. त्यास शेंकडो वस्तूंची गरज असते. ही गरज सालोसाल निरनिराळ्या वस्तूंचे बाबतींत कमी अधिक होत असते. या जगावरल्या सगळ्या गरजांचें टिपण ठेवून तो सर्व माल बिनचूकपणें निर्माण करण्याचें काम कोण करणार ? माणसाच्या जीवितास अत्यवश्यक अशी अन्नवस्त्रा-सारखी एकादी वस्तु एकादे सालीं कमी निपजली तर जगावर एकदम केवढा अनर्थ कोसळेल ? भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्यांचें यास काय उत्तर आहे ? या संकटावर पूर्ण व्यक्तिस्वातंत्र्याचे तत्त्वांतून जरूर तो उपाय निर्माण होतो असें भांडवली अर्थशास्त्रज्ञांचें उत्तर आहे. बाजार हा भांडवलवाल्यांचा स्वर्ग होय. अनियंत्रित बाजारांत सारख्या वस्तूचा सारख्या किंमतीशीं विनिमय होतोच होतो हा सिद्धांत सांगून भांडवलवाल्यांनीं 'श्रमशक्ति' कशी खरेदी केली हें

मागें सांगितलें. त्याचप्रमाणें बाजारांत मालास जी किंमत ठरते त्यावरून जगास कोठें, काय, किती व कसें हवें हें बिनचूक कळतें असें भांडवली अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. मात्र या बाबतींत सुद्धां बाजारव्यवहारास पूर्ण स्वातंत्र्य पाहिजे. ज्यांना कोणताहि माल खरेदी करावयाचा असतो ते पैशाची पिशवी घेऊन बाजारांत येतात. ज्यांना कोणताहि माल विकावयाचा असतो तेहि आपला माल घेऊन बाजारांत येतात. एकाच मालाचे देवारी व घेवारी अनेक असून त्यांच्यांत चढाओढ लागते व मग घेवाऱ्यांना जितका हवा त्याहून माल कमी असला तर मालाची किंमत वाढते. अशी किंमत वाढली तर त्या प्रकारच्या मालाच्या उत्पादनास तेजी येऊन भांडवलाचा ओघ तिकडे वळतो व माल पुष्कळ निर्माण होतो. इतका कीं घेवाऱ्यांच्या मागणीहून माल अधिक होतो व त्याची किमत कमी होते. लगेच त्याचें उत्पादनहि घटूं लागून भांडवलाचा ओघ दुसरीकडे वळतो. 'मालाच्या किंमती वाढल्या कीं पुरवठ्यापेक्षां मागणी वाढली, व किंमती कमी झाल्या कीं मागणीपेक्षां पुरवठा वाढला' असें समजावें. हा प्रसिद्ध 'मागणी व पुरवठा' यांचा सिद्धांत होय.

## अप्रतिबंध व्यापार व जागतिक कल्याण

याचाच 'अप्रतिबंध व्यापाराचें तत्त्व' हा एक उपसिद्धांत आहे. अप्रतिबंध व्यापारानें जगांतील आर्थिक, राजकीय वगैरे सर्व अडचणी नाहीशा होतील असें भांडवलशाहीच्या आरंभी अर्थशास्त्रज्ञांचें मत होतें. आज हें मत बरेंच मागें पडलें असलें तरी ज्यांना लिबरल पक्षाचे अर्थशास्त्रज्ञ म्हणतां येईल त्यांनीं अप्रतिबंध व्यापाराचा पक्ष अजूनहि सोडला नाहीं. अप्रतिबंध व्यापारानें जगाचे प्रश्न सुटतात याचा अर्थ काय ? वर आपण पाहिलें कीं बाजारांत ज्या मालास किंमत वाढली त्या मालास मागणी वाढली असें म्हणतां येतें. पण याला एक अट आहे ती अशी की बाजारव्यवहारांत कोणताहि अडथळा नसावा. एकाद्या बाजारांत विक्रीस येणाऱ्या कापडावर जर उगीचच भारी जकात बसविली तर विकणाऱ्यास त्या कापडाची किंमत उगीचच वाढवावी लागेल, पण यावरून मागणी वाढली असें मात्र म्हणतां येणार नाहीं. उलट किंमत वाढल्यानें मागणी कमी होण्याचाच संभव फार. मालाच्या वाहतुकीसाठीं, सडका नीट ठेवणें वगैरेपुरती जकात बसविणें योग्य आहे. पण याहून अधिक बसविल्यास तो व्यापारास अडथळाच

होईल. पूर्वी लहान लहान खेडीं आपल्या गरजांच्या बाबतींत स्वयंपूर्ण असत, ही महत्त्वाकांक्षा आजहि बाळगून एकाद्या ग्रामाधिकाऱ्यानें शहरांतून कापड, कंदिल, ग्रामोफोन असल्या मालावर जकात बसविली व त्यास प्रतिबंध उत्पन्न केला तर? अर्थशास्त्रज्ञांच्या मतें असें करणें मूर्खपणाचें व रानटीपणाचें लक्षण आहे. भांडवलशाहीपूर्वी खेडीं स्वयंपूर्ण होतीं तरी त्यांच्या गरजाहि थोड्या होत्या. त्याहि भागविण्यास गांवकऱ्यांना इतके कष्ट व यातायात पडे कीं बहुजनसमाज घाण्यास जुंपलेल्या बैलाप्रमाणें सदा श्रम करण्यांत गुंतलेला असे; त्यास बौद्धिक उन्नति करण्यास व शारीरिक व मानसिक सुखोपभोग घेण्यास फुरसतच नव्हती. शरीरानें मनुष्य असूनहि मनानें तो पशूच होता. लहानशा खेड्यांत पिढ्यानुपिढ्या गेल्यामुळें त्याची दृष्टि संकुचित होती. भांडवलशाही सुरू झाल्यापासून मोठ्या प्रमाणावर सहकार्य, श्रमविभाग व पुढें यंत्रोपयोग यांनीं संपत्ति भरपूर निर्माण होऊं लागली. यामुळें माणसाची फुरसत वाढली. पूर्वीच्या खेड्यांत जो माल जेवढा जसा पिकेल तसा वापरावा लागे. यामुळें एकाद्या गांवांत ज्या मालाचें पीक अतोनात येई तेथें तें न खपून वांया जाई. इतर एकाद्या गांवांत तें कमी आलें तरी येईल तेवढ्यावर भागवावें लागे. पण व्यापारधंदा वाढल्यानें व दळणवळणाच्या सोई वाढल्यानें जो माल जेथें स्वस्त मिळेल तेथें तो घ्यावा आणि जेथें ज्या मालास चांगला भाव येईल तेथें तो नेऊन विकावा अशी सोय झाली. यामुळें गिऱ्हाईक व व्यापारी या उभयतांचाहि फायदा झाला. खेड्यांची कूपमंडूकवृत्ति जाऊन माणसाची दृष्टि विशाल झाली. हा अप्रतिबंध व्यापाराचा परिणाम होय असें अर्थशास्त्रज्ञांचें मत होतें.

हें जसें एका देशासंबंधीं खरें तसेंच तें सर्व देशांसंबंधींहि खरें आहे. एका देशाचा माल दुसऱ्या देशांत विक्रीस जाऊं लागला कीं या बाहेरच्या मालाची आंतल्या मालाशीं चढाओढ होईल हें खरें. पण बाहेरून दूर देशाहून वाहतुकीचा खर्च करून जो माल परदेशीं आला तो जर तद्देशीय मालाचाच बाजारभावांत पराभव करूं लागला तर त्या देशांत तो माल उत्पन्न करण्यास अनुकूलता नाहीं असें समजून त्याची निपज बंद करावी. यांत नुकसान तरी काय? जो माल आपल्या देशांत स्वस्त पिकेल तो आपण दुसऱ्या देशांत नेऊन

विकावा. हिंदुस्थानांत होणारें कापड इंग्लंडाहून येणाऱ्या कापडापेक्षां हिंदी बाजारांत महाग पडतें तर हिंदुस्थाननें कापड करण्याचें बंद करावें. आणि करावें काय ? तर इंग्लंडांत कापूस पिकविणें परवडत नाहीं; तेव्हां हिंदुस्थाननें कापूस पिकवून तो इंग्लंडास पाठवावा व इंग्लंडचें कापड आणावें. असा हा एकंदर युक्तिवाद आहे. यामुळें जगांत कांहीं राष्ट्रें कच्चा माल व दुसरीं कांहीं पक्का मालच काढतील. पण ह्यामुळें सारें जग परस्परावलंबी होईल. याला हे अर्थशास्त्रज्ञ जागतिक श्रमविभाग म्हणतात.

## सोनें व बँका यांची थोरवी

एकंदर साऱ्या जगांत श्रमविभाग होऊन संपत्ति निर्माण होऊं लागल्यावर या प्रचंड प्रमाणावर होणाऱ्या देवघेवीस विनिमय–सामान्य म्हणन 'पैसा' या वस्तूस साहजिकच फार महत्त्व येतें. 'पैसा' हा विनिमयसाधन म्हणून भांडवलशाहीपूर्वींच जन्मास आला आहे. पण विनिमयव्यवहार त्या वेळीं लहान लहान क्षेत्रांतच पुष्कळसा होई. तेथें जोंधळे देऊन भाजी, कापड घ्यावें; काम करून मजूरीदाखल वर्षभर जेवण, चार लंगोट, एक पागोटें, चार धडोतीं घ्यावीं अशी ऐनजिनसी देवघेव चाले. बैलगाड्या, घोड्याच्या गाड्या, होड्या यांनीं फार टिकाऊ व सर्वकडे सारखाच लागणारा म्हणजे मूल्यवान पदार्थ, मसाले वगैरे जिनसांचीच दूरवर देवघेव होई हे जिन्नस अर्थातच थोडे असत. यामुळें विनिमयसामान्य जो 'पैसा' त्यासाठीं लागणारा पदार्थहि थोडा पुरे. फार पूर्वीं गाई, बैल वगैरे जनावरें, स्त्रिया व गुलाम यांचा पैशासारखा उपयोग होई पण अलीकडील काळांत तांबें, चांदी, सोनें वगैरे धातूचें 'नाणें' पाडण्यांत येऊन त्यांचा 'पैशा'सारखा उपयोग होऊं लागला. त्यांतहि सोनें हें विशेषतः सर्वमान्य झालें. आगगाडी, आगबोट व यांत्रिक कारखाने हीं जीं भांडवलशाहीचीं ठळक अंगें त्यांच्या जन्मापूर्वीं दूर अंतरावर थोड्याच होणाऱ्या देवघेवीस 'पैसा' या नात्यानें सोन्यानें चांगलीच मदत केली होती. पण यांत्रिक उत्पादन व वाहतूक सुरू होऊन प्रचंड प्रमाणावर जागतिक श्रमविभाग व जागतिक देवघेव सुरू झाल्यावर हें सोनें कसें पुरें पडणार हा प्रश्नच होता. पण नदीचा प्रवाह आपलें पात्र स्वतां खणीत खणीत समुद्र गांठतो त्याप्रमाणें प्रचंड प्रमाणावर सुरू झालेल्या जागतिक व्यापारानेंहि आपली वाट स्वतां तयार केली.

यांत्रिक युगापूर्वीं दूरवर व्यापार करणाऱ्या व्यापाऱ्यांच्या पेढ्या असत; व ते सोन्याची प्रत्यक्ष वाहतूक शक्य तितकी टाळून हुंड्यांच्या देवघेवीवर मालाची देवघेव करीत. यांत्रिक युगांत प्रचंड प्रमाणांत मालाची देवघव होऊं लागल्यावर हुंड्यांची देवघेव हाच एक स्वतंत्र असा फार मोठा धंदा होऊन बसला व तो करणाऱ्या पेढ्या म्हणजे बँका यांना फार मोठें महत्त्व आलें. सहकार्यानें व श्रमविभागानें संपत्त्युत्पादन आणि पुढें यांत्रिक उत्पादनहि इंग्लंडांतच सुरू झाल्यामुळें, जहाजांचा धंदाहि इंग्लंडचाच मोठा असल्यानें इंग्लंड व्यापारांत व उद्योगधंद्यांत अग्रेसर बनलें. यामुळें देवघेवीच्या हुंड्या विकणारी व खरेदी करणारी फार मोठी पेढी म्हणून 'बँक ऑफ इंग्लंड' हीहि जगांत बँकांच्या व्यवहारांत श्रेष्ठता पावली. या बँकेजवळ सोन्याचा फार मोठा सांठा ठेवून जगावरील कोणत्याहि देशांतून दुसऱ्या कोणत्याहि देशांत माल आला गेला तरीं 'बँक ऑफ इंग्लंड'जवळ त्या त्या धंदेवाल्यांनीं ठेवलेल्या सोन्याची तेथल्या तेथें खातेबुकांत देवघेव नोंदिली कीं किंमतीच्या देवघेवीचा सारा कारभार संपूं लागला. यामुळें बँकेजवळ सोनें भरपूर असणें व तिची पत शहाजोग ठेवणें हेंहि अपरिहार्य झालें. तेव्हां सोनें चोरांच्या भीतीनें पुरून ठेवणें अथवा शोभेसाठीं त्यांचे अलंकार करून अंगावर घालणें हा प्रकार रानटीपणाचा असून बँकेंत सोनें ठेवणें व त्यावर व्याज मिळविणें हें सुधारणेचें प्रमुख लक्षण आहे असें इंग्लिश अर्थशास्त्रज्ञ प्रतिपादूं लागले. सरकारी नोटा काढणें, लोकांच्या ठेवी घेऊन त्यांतून पैशांचे दाखले (चेक्स) देणें, मालाच्या देवघेवीच्या हुंड्या देणें-घेणें, सरकारची ठेव घेऊन सरकारची देवघेव संभाळणें इतकीं कामें बँक या संस्थेकडे आल्यानें सर्व विश्व व्यापून एकांशानें उरलेल्या परमेश्वराची पदवी बँक या संस्थेस प्राप्त झाली आणि साहजिक बँकेंत-त्यांतल्या त्यांत 'बँक ऑफ इंग्लंड'मध्यें सोनें ठेवणें ही गोष्ट ईश्वरास सुवर्ण अर्पण करण्याइतकी कल्याणकारण आहे असें इंग्लिश अर्थशास्त्रज्ञांचें मत झालें. परस्परापासून सुटलेले मणी दोरा जसा एकत्र बांधून ठेवतो त्याप्रमाणें सोनें हें अप्रतिबंध अशा व्यापारांस नियंत्रण घालील आणि माळेंतील मेरूमणि ज्याप्रमाणें दोऱ्याचीं दोन्ही टोकें घट्ट धरून ठेवतो त्याप्रमाणें 'बँक ऑफ इंग्लंड' अखेर देवघेवीचें सोनें आपल्या खजिन्यांत जपून ठेवील असें इंग्लिश अर्थशास्त्रज्ञांनीं जगास पटविलें.

सुवर्णाधिष्ठित अथवा बँकाधिष्ठित असा अप्रतिबंध व्यापार, जगांतील युद्धें थांबवून जागतिक शांतताहि निर्माण करील असें अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. कारण याने युद्धाचें कारणच नाहींसें होईल. एक राष्ट्र दुसऱ्या राष्ट्रावर हल्ला करतें तरी का? धनलोभास्तव; पण भांडवलशाही पद्धतीनें देशांत स्वस्थता राखून अर्थोत्पादन केल्यास व देशादेशांनीं आपापल्या देशांत किफायतीनें होणारा माल निर्माण केल्यास जगाचें जें सांपत्तिक वैभव वाढेल तें शस्त्रास्त्रें निर्माण करून एकमेकांचा रक्तपात केल्यास कधींच निर्माण होणार नाहीं. एकदां भांडवलशाहीच्या उत्पादनाचा प्रसार सर्व ठिकाणीं झाला व त्या योगानें दळणवळण व परस्परावलंबन वाढलें म्हणजे जागतिक बंधुभाव सहजच वाढेल. जगांतील सर्व अर्थोत्पादक व्यवहार एकजीव झाला म्हणजे एका देशाचें नुकसान तें जगाचें नुकसान ही भावना दृढमूल होईल व कुटुंबांतील अंतः-कलहाप्रमाणें जागतिक कलह हाही मूर्खपणाच आहे ही गोष्ट सुसंस्कृत मनांस सहज पटेल, असा हा अप्रतिबंध व्यापाराचा महिमा आहे. या जागतिक वैभवप्राप्तीचे कामीं राज्यकर्त्यांनीं करावयाचें तें एवढेंच कीं व्यापारधंद्यास अडथळा आणणारे चोर, दरवडेखोर यांचा बंदोबस्त करावयाचा, करारांची उत्तम बजावणी करून घ्यावयाची, उत्तम न्यायपद्धति ठेवावयाची आणि बाजारांतील देवारी व घेवारी यांची गम्मत पाहात बाजूस स्वस्थ उभें राहावयाचें. बेंथॅम हा भांडवलशाहीचा एक आद्य पुरस्कर्ता तत्त्वज्ञ म्हणतोः—" सामान्य नियम असा कीं सरकारनें कांहीं करूं नये. डायोजेनिस या बैराग्यानें अलेक्झांडरला सांगितलें कीं 'मला तुझें कांहीं नको. माझें ऊन्ह सोड.' त्याप्रमाणें शेतकरी, व्यापारी, धंदेवाला हे सर्व राज्यकर्त्यास एकच विनंति करतात कीं स्वस्थ राहा. कांहीं करूं नका." आपला स्वार्थ साधावा ही बुद्धिच जगांतील सर्व कर्तृत्वास प्रेरक आहे. या स्वार्थबुद्धींतूनच परार्थबुद्धीचाहि जन्म होतो असें बेंथॅमचे मत आहे. तो म्हणतो, "स्वतां सुखी होण्याचा मार्ग कोणता? इतरांस सुखी करणें हाच. इतर सुखी कशानें होतील? आपण त्यांच्यावर प्रेम करतों असें दाखविल्यानें; पण मनांत नसता असें प्रेम दाखवितां येणार नाहीं. तेव्हां दुसऱ्यावर खरेंच प्रेम करावें म्हणजे झालें." स्वार्थांतून परार्थ काढण्याची बेंथॅमची ही अशी युक्तिपरंपरा आहे.

---

# प्रकरण ५ वें

# आर्थिक नीतितत्त्वांचा बोजवारा

स्वातंत्र्य, समता, बंधुभाव, सांपत्तिक स्वार्थाबद्दलची चढाओढ; सहकार्य, श्रमविभाग, व यांत्रिक साधनें यांनीं संपत्त्युत्पादन; अप्रतिबंध व्यापार, जागतिक परस्परावलंबन व जागतिक ऐक्य; म्हणून युद्धांचा शेवट; अर्थात् जगभर शांति, पुष्टि आणि तुष्टीचें साम्राज्य ; निवळ स्वार्थ हें बीज आणि त्यापासून सर्व जगास गोड सौख्यफल देणारा हा भांडवलशाहीरूपी जागतिक विराटवृक्ष निर्माण होत आहे, असें भांडवलशाहीचे स्तुतिस्तोत्र इंग्लंडांतील भांडवलशाहीच्या आद्य पुरस्कर्त्यां मिल्ल, ॲडॅम स्मिथ, बेंथॅम यासारख्या तत्त्वज्ञांनी आपल्या ग्रंथांतून गायिलें आहे.

## नीतितत्त्वांची फसवणूक

पण भांडवलशाहीचा खरोखर घडलेला इतिहास असेंच बोलतो काय ? वाल्मीकीनें लिहून ठेविलेल्या रामायणाप्रमाणें वागल्यानें प्रभु रामचंद्राचें सर्व आयुष्य कसें हालअपेष्टांत गेलें याची पाश्चात्य भांडवलवाल्यांना माहिती असावी असें त्यांच्या वर्तनावरून वाटतें. न्यायकचेरींतील एकादा ख्रिस्ती साक्षीदार बायबलावर हात ठेवून मग पापाची क्षिति न बाळगतां भराभर खोटें बोलत सुटतो त्याप्रमाणें भांडवलवाल्यांनीं ॲडॅम स्मिथचें नांव घेऊन व त्याचे ग्रंथ ग्रंथालयांत जतन करून ठेवून आपल्या व्यावहारिक चाणाक्षपणास वेळोवेळीं सुचेल त्याप्रमाणें गेलीं सुमारें दीडशें वर्षें आपला कारभार हाणीत आणला आहे. ॲडॅम स्मिथची परंपरा चालविण्याच्या बुद्धीनें गेल्या दीडशें वर्षें ज्या भांडवली अर्थशास्त्रांनीं भांडवशाहीचें समर्थन करण्यासाठीं ग्रंथ लिहिले त्यांची या भांडवलवाल्यांनीं फारच त्रेधा उडविली आहे. लोकमुखांनीं वेगानें धांवणाऱ्या भाषेचा पाठलाग करतांना व्याकरणकाराची जशी तिरपीट उडते अथवा नाठाळ गाईस आडवण्यासाठीं तिचें दावें आपल्या कमरेस बांधून गुराख्याचा पोर मग जसा काटयाकुटयांतून आणि दऱ्याखोऱ्यांतून फरफटत जाऊन रक्तबंबाळ होतो, त्याप्रमाणें या भांडवलवाल्यांनीं आपल्या अवखळ वर्तनानें

आपल्या तत्त्वज्ञान्यांना आपल्या मागून पळतां भुई थोडी केली आहे. आज अनुभव असा आहे कीं स्वातंत्र्य, समता, बंधुभाव, चढाओढ, अप्रतिबंध व्यापार, आंतरराष्ट्रीय सुवर्णमान, जागतिक ऐक्य, जागतिक शांति या भांडवलशाहीच्या महर्षींनीं प्रतिपादिलेल्या प्रत्येक तत्त्वाचा भांडवलवाल्यांनीं निर्दयपणें वध केलेला दिसत आहे. आणि हल्लींच्या तत्त्वज्ञांना, ईश्वराप्रमाणें तत्त्वें हीं अव्यक्त व अमर असून माणसांना विपरीत अनुभव येत असला तरी भांडवलशाहीची निष्कामबुद्धीनें निरंतर उपासना करीत राहिल्यास हीं तत्त्वें साकार होऊन भक्तांस कधीं तरी दर्शन देतीलच असें भाडवलशाहीचें समर्थन करण्याचा प्रसंग आला आहे. प्रो. कीन्स, सॉल्टर यांसारखे तत्त्वज्ञ हें काम सर्व बाजूनें निराशा असतांहि मोठ्या ध्येयनिष्ठेनें व निस्वार्थबुद्धीनें करीत आहेत.

तत्त्वज्ञांनीं भांडवलशाहीचें असें वेळी अवेळीं समर्थन केलें असतांहि त्यांना अपेश देऊन भांडवलवाल्यांनीं आज जगाच्या अन्नांत माती कालविली याचें कारण असें आहे कीं, तत्त्वज्ञांची विचारसरणी मुळांतच चुकीची होती. अग्नि हा दाहक नाहीं असें वेदविद्या चारहि मुखांनीं प्रतिपादन करूं लागली तरी तें जसें सत्य ठरणार नाहीं त्याप्रमाणें अनियंत्रित नागडा स्वार्थ आणि चढाओढ यांपासून अखेर परार्थप्राप्ति व समाजहित होईल ही गोष्ट बेंथॅमसारख्या थोर पुरुषानें सांगितली तरी खरी होऊं शकत नाहीं. विषवृक्षाला अमृताची फळें येतील काय ? दुसरा मनुष्य सुखी झाला असतां आपण सुखी होतों हें तत्त्वज्ञान व्यक्तिमात्रास आजच्या स्थितीत ग्राह्च होईल असें गृहीत धरणें म्हणजे मनुष्यजग हें ज्ञानोबा, तुकोबा आणि बेंथॅम यांचेंच बनलें आहे असें मानण्याइतका भोळेपणा होय. स्मिथ, बेंथॅम या भोळ्या तत्त्वज्ञांनीं स्वार्थाचें हें कोलीत, 'आर्थिक व्यवहाराचें नीतिशास्त्र' अशा सोवळ्या नांवाच्या पांघरुणांतून, समर्थ व दुबळे, स्वार्थी व भोळे, पाताळयंत्री व मूर्ख, साधु व क्रूर अशा मिश्र व्यक्तींनीं भरलेल्या समाजाच्या हातीं दिलें. त्या समाजानें दारूचीं कोठारें भरलीं व उडविलीं आणि साऱ्या दुनियेंतील माणसांच्या जिवाचा खेळ केला. आतां सर्कशीतील पोपट ज्याप्रमाणें चोंचींतील उदबत्तीनें तोफेंतील दारूस बत्ती लावून मग बार होतांच 'हें काय भलतेंच झालें' म्हणून पंख फडफडतो त्याप्रमाणें स्मिथ व बेंथॅम यांचे शिष्य कीन्स व सॉल्टर आजच्या जागतिक अनर्थाकडे पाहून आश्चर्यानें थक्क झाले आहेत. हा सर्व अनर्थ कसा झाला ?

## स्वातंत्र्य व समता यांचें बलिदान

भांडवलशाहीरूपी वृक्षाचें मजूराकडून भांडवलदारास मिळणारा 'वाढावा' हें बीज असून तो 'वाढावा' कसा उत्पन्न होतो याचें विवेचन पहिल्या प्रकरणांत केलें आहे. त्यांतील मुख्य मुद्दा असा कीं मजूरांच्या बाजारांत ज्या वेळीं मजूर मजूरी पत्करतो त्या वेळीं तो अडलेला असल्यानें दम खाऊं शकणारा भांडवलवाला त्याच्या अडलेल्या परिस्थितीचा फायदा घेऊन त्यास कमींत कमी मजूरीवर कामास नेमतो. मजूरास जी मजूरी मिळते तीमुळें त्याची 'श्रमशक्ति' रोजच्या रोज खर्च होत असली तरी त्या मजूरीचें अन्न खाऊन भरून येते. या मजूरीच्या धनाहून भांडवलाची झीज व खप वजा जातांहि पुष्कळ अधिक उरेल इतकें अधिक धन म्हणजे वाढावा —नफा मजूर मालकास देतो. यांत लक्षांत ठेवण्याची घटना अशी कीं बाजारांत देवघेवीसाठीं उभे असणारे पक्ष अनुक्रमानें मजूर व भांडवलदार हे अडलेला व दम खाऊं शकणारा असे विषम असतात. या विषम पक्षांतील सौदा अन्यायाचा होतो. या अन्यायाच्या पायावर भांडवलशाहीची इमारत रचली आहे. येथें आरंभींच स्वातंत्र्य व समता यांचा वध झाला असून किल्ल्याखाली पूर्वीं महारांचें जोडपें बळी देत असत म्हणतात त्याप्रमाणें बेंथॅमचें नांव घेऊन येथें स्वातंत्र्य व समता या दंपतीचें बलिदान केलें आहे. असो; आतां पुढचें पाहूं.

वाढावा अथवा नफा सतत मिळत राहावा ही भांडवलवाल्याची स्वाभाविकपणें इच्छा असते. यासाठीं मजूरानें ज्याप्रमाणें आपली मजूरी खाऊन फस्त करून व ताजेंतवानें होऊन यंत्राचा दांडा हातीं घेण्यास सज्ज होऊन आलें पाहिजे त्याप्रमाणें यंत्रासहि तेलपाणी घालून सज्ज करावें लागतें. खपलेला कापूस वगैरे कच्चा माल पुन्हा भरावा लागतो. तेव्हां सर्व उत्पादन पूर्वीप्रमाणें सुरू होतें. पण 'वाढावा' हा या खर्चापलीकडे असतो असें पूर्वी म्हटलें; त्याचें भांडवलदार काय करतो? त्या वाढाव्याचें आणखी यंत्र, कच्चा माल व मजूर आणून धंदा वाढवितो. हे नवीन मजूर आणखी 'वाढावा' देतात. त्यापासून आणखी यंत्रें, आणखी कच्चा माल व आणखी मजूर उत्पन्न होतात. हा सगळा संच पुन्हा 'वाढावा' देतो आणि या नवीन निर्माण होणाऱ्या संचाबरोबर अगदीं आरंभापासूनचे सर्व संच 'वाढावा' वीत असतात. व पुन पुन्हा नवे नवे संच निर्माण होत असतातच. एकाद्या महायुद्धांत मनुष्य-

संहार भयंकर झाल्यानंतर आजा, मुलगा व नातू यांना प्रत्येकीं अनेक स्त्रियां-पासून एकसमयावच्छेदेकरून मुलें होऊन जशी भराभर लोकसख्या वाढते तशी भांडवलशाहीच्या संपत्तीची वाढ होत असते. बे दुणी चार, चार चोक सोळा, सोळे सोळे छप्पनदोन अशा वेगानें ही संपत्ति वाढत असते. या सर्व गर्दीत मजूर कोठें असतो ? मिळणारा रोज स्वत: खाऊन व मुलाबाळांना खाऊ घालून फस्त करतो. यामुळें तो स्वतां दुसरे दिवशीं मजूरांच्या बाजारांत अथवा पूर्वीच्या मालकाच्या यंत्रावर उभा राहूं शकतो आणि त्याची प्रजा आईबापांची मजूरी खाऊन पुष्ट होत असल्यानें भांडवलवाल्याच्या वाढत्या धंद्यास नवे नवे मजूर अखंड मिळत राहतात. मजूरास जें मिळतें तें त्याच्या चरितार्थापुरतेंच मिळत असल्यानें पुन्हा पुन्हा श्रमशक्ति विकून भांडवलदारास वाढावा देण्याशिवाय त्यास गत्यंतरच नसतें. 'रोमन गुलामाच्या पायांत लोखंडाच्या बेड्या असत. भांडवलशाहीतील मजूर कायद्यानें स्वतंत्र खरा पण त्याच्या पायांत उपासमारीच्या भीतीची अदृश्य बेडी असते.' पहिल्या वाढावाबीजापासून पावसाळ्यांतील ओढ्यांप्रमाणें भराभर वाढणारी संपत्ति अखेर भांडवलदाराच्या मालकीची होते. साखरेचें चित्र जसें साखरमय असतें तशी ही सर्व संपत्ति वाढावामय असते. पण हिचा अल्पांशसुद्धां वाढावा देणाऱ्या मजूराचा नसतो. ज्याचे श्रम त्याची संपत्ति हें अर्थशास्त्रज्ञांचें तत्त्व त्यांच्या पुस्तकांत राहतें. व्यवहारांत श्रम करणारा मजूर वाढाव्यास जन्म देतो. पण यंत्राच्या मालकास तो मोफत मिळतो.

## पिळणुकीच्या विविध पद्धति

संपत्ति उत्पन्न करण्याचे कामीं यंत्राचा उपयोग होऊं लागल्यावर वाढाव्याचा वेग वाढण्यास आणखी मदत झाली. पुरुषाप्रमाणें स्त्रिया व मुलें यांजकडूनहि काम घेतां येऊं लागले. दिवसभर खेळत बसण्यापेक्षां लहान मुलांनी उद्योग केल्यास आईबापांना तेवढीच मदत होणें शक्य झालें व आई-बापांना मदत करतां करतां मूळचा उनाड पोरहि आपल्या शक्तीप्रमाणें अल्पसा वाढावा मालकास देऊं लागला. तसेंच कामाचा वेळ वाढवूनहि वाढावा वाढविण्याची युक्ति भांडवलदारास सुचली. समजा, चार मजूर एका यंत्रावर; याप्रमाणें ८ यंत्रांवर ३२ मजूर रोज आठ तास काम करून कांही माल निर्माण करितात. समजा, त्या यंत्राचे मालकानें आणखी

उत्पादन वाढविण्यासाठीं आणखी चार माणसें नेमलीं तर? तर त्यास आणखी एक यंत्र वाढविलें पाहिजे. पण समजा, त्यानें आहे त्या ३२ मजूरांनाच प्रत्येकीं ८ तासांऐवजीं ९ तास कामावर जुपलें तर? तर परिणाम असा होईल की एक कवडीसुद्धां जास्त खर्च न करतां मालकाचें उत्पन्न वाढेल. मजुरीचा दर त्यामुळें वाढत नाही. कारण मजूरी ठरते ती कामाच्या तासावर नसून अडलेल्या मजूराच्या कामाचे शक्तीस जो खर्च लागेल, चरितार्थास जो खर्च लागेल त्यावर अवलंबून असते. ८ तास सहज काम करणारा मजूर ९ तासहि काम करील तर तेवढ्यानें मजूराचा चरितार्थखर्च कांहीं वाढत नाही. यंत्र पडून राहतें त्या काळांत यंत्रानें भांडवलवाल्यास उत्पन्न देत न राहून जें नुकसान केलें असेल तें एक तासाच्या अधिक राबामुळें तितकेंच कमी होऊन वाढावा वाढतो. यंत्राचे साह्यानें एकच एक काम अनेक दिवस, अनेक महिने, अनेक वर्षे करीत राहिल्यास मजूराची कार्यक्षमता वाढून वाढावा अधिकाधिक वाढत जातो. कायद्यानें अथवा इतर कारणांनीं कामाचे तास कमी करावे लागल्यास यंत्राचा वेग वाढवून, देखरेखीची कदर वाढवून, तसेंच अधिक कुशल मजूर नेमून उत्पादनाचें परिमाण कायम ठेवतां येतें. वाढावा जसजसा वाढत जातो तसतसें भांडवल वाढत जातें. आणि भांडवल एकटेंच संपत्ति वीत नसल्यामुळें त्याच्या संपत्तिनिर्मितीसाठी झगडण्यास मजूरांची गरजहि वाढत असतें. संपत्ति निर्मिण्याचे कामीं मजूरांचें महत्त्व किती आहे हें सांगतांना जॉन बेलर्स यंत्रयुगापूर्वी म्हणजे १६९६ साली लिहितो "एकाद्या धनिकाजवळ १०० एकर जमीन असली, १०० पौंड नाणें असलें, आणि १०० गुरें असलीं पण मजूर मुळीच नसले तर या धनिकाचा स्वतांचा दर्जा मजूराचाच नव्हे काय? मजूर हेच धनिकाची संपत्ति निर्मीत असल्यानें जितके मजूर अधिक तितकी धनिकांची संख्या अधिक वाढते. मजूर हे श्रीमंत वर्ग निर्माण होण्याच्या खाणीच होत" (कॅपिटलमध्यें मार्क्सनें घेतलेला उतारा)

भांडवल असलें म्हणजे संपत्ति निर्माण होते आणि पैसा असला म्हणजे यंत्रें, कच्चा माल इत्यादि भांडवल उभारतां येऊन मजूर त्यास जुंपतां येतात असें प्रत्येक भांडवलदारास वाटत असतें. पण मजूरच नसतील तर हें कांहींतरी शक्य होईल काय? बर्ट्रंड डी मँडेव्हील (१७२८ त) लिहितोः—"मालमत्तेस पूर्ण संरक्षण असेल, तर जगण्यासाठीं पैशाचीहि तितकीशी गरज नाहीं

पण दरिद्री लोक मात्र अवश्य पाहिजेत. कारण त्यांवांचून श्रम कोण करणार? गरीबांनीं श्रम करावयाचे तर त्यांना उपाशी मरूं न देणें भाग आहे. पण त्यांना शिल्लक टाकतां येईल असें कांहीं देऊं नये. निकृष्ट वर्गांतला एकादा माणूस विशेष मेहनत करून व पोटास चिमटा घेऊन स्वतांस आपल्या परिस्थितीं-तून वर नेईल तर त्यास तसें करूं द्यावें. इतकेंच नव्हे; समाजांत काय किंवा कुटुं-बांत काय, प्रत्येकानें काटकसरीनें वागावें हें निःसंशय शहाणपणाचें आहे. पण धनिक राष्ट्रांच्या हिताच्या दृष्टीनें पाहतां बहुतेक गरीब लोकांनीं कधींहि निरुद्योगी तर राहूं नये, पण उद्योगानें मिळेल तें धन सतत खर्चीत राहावें हें इष्ट आहे. रोज बिगारी करून त्यावरच जे जगतात त्यांना उपयुक्त कर्तृ-त्वाची प्रेरणा रोजच्या भुकेकडूनच मिळते. ही त्यांची भूक रोज शमवावी पण त्यांची ददात कायमची कधींच घालवूं नये. तो मूर्खपणा होईल. तेव्हां मजूरांना उद्योगी राखण्याचा मार्ग म्हणजे त्यांना बेताचा पैसा देणें हाच होय. त्याचा स्वभाव व संवयी या दृष्टीनें त्यास जितका पैसा जरूर असेल त्याहून फार कमी दिला तर तो चवताळेल अथवा नाउमेद होईल. बरें, जरूरीहून अधिक दिला तर तो मगरूर आणि उद्धट होईल. यावरून हें उघड होतें की जेथें गुलामगिरी नाहीं अशा स्वतंत्र राष्ट्रांत खरें धन म्हणजे श्रमजीवी गरीबवर्ग हाच होय. कारण गरीब लोक उत्पादनाचें काम तर करतातच. शिवाय सैन्य व आरमार यांसाठी लागणारा माणसांचा पुरवठा या गरीबांतूनच होतो. गरीबां-वाचून श्रीमंतांचे भोग चालू शकणार नाहीत आणि कोणत्याहि देशाच्या मालाला किंमतच येणार नाही. उच्च वर्ग सुखी राहावा आणि अगदीं गरीबी-तहि लोक शांत राहावे यासाठीं बहुसंख्य लोक अशिक्षित आणि दरिद्री राहाणें इष्ट आहे. माणसाच्या गरजा थोड्या असल्या म्हणजे त्या सहज भागवितां येतात. पण ज्ञान वाढलें की माणसाच्या गरजा वाढूं लागतात." (मार्क्सनें घेतलेला उतारा) वरील उताऱ्यांत गरीब लोकांना फाजील पैसा देऊं नये असें सुचविलें आहे. पण जेथें तो थोडा फार अधिक दिल्यासारखा दिसतो तेथें फार तर थोडा अधिक चांगला कपडा वापरतां येईल अथवा एकादा मोठासा सण करता येईल इतकाच मिळतो. पण अधिक पगाराची मर्यादा यंत्रयुगांत ठरून गेलेली आहे. ती अशी की, मजूरांची जागा भरून काढील असें यंत्र निर्माण करण्यास व चालविण्यास जो खर्च येईल त्याहून मजूरांचें वेतन वाढलें कीं कारखानदार

मजूरांना हाकून लावून त्यांचे जागीं यंत्र उभें करतो. इंग्लंडांत १८६० त घोड्यांनीं ओढण्याच्या कालव्यांतील नांवा ढकलण्याच्या कामासाठीं बायका लावीत असत. कारण घोडा अथवा यंत्र यांना अमुक एक खर्च नक्की करावाच लागे. उलट बेकार वर्गातल्या स्त्रिया वाटेल तितक्या कमी वेतनावर मिळत असत.

माणसाच्या मजूरीपेक्षां यंत्राचा खर्च कमी लागत असल्यामुळें यंत्रानें माणसाच्या रोजगारीवर कशी गदा आणली आहे याचें वर्णन करतांना मार्क्स म्हणतोः—"मजुराचें हत्यार हें यंत्र झालें कीं तें लगेच त्याच्याशींच चढाओढ करूं लागते. येथून पुढें जितक्या प्रमाणांत यंत्रें वाढतील तितक्या प्रमाणांत माणसें बेकार होतात. माणसानें चालविण्याच्या हत्याराचे जागीं यंत्र येऊन उभें राहिलें कीं मजूराचा उपयोग कमी होऊं लागतो आणि तसतशी त्याची मजूरीहि उतरूं लागते आणि शेवटीं बेकायदा ठरविण्यांत आलेल्या चलनी नोटा जशा कोठेंहि चालू शकत नाहीत, त्याप्रमाणें मजूरासहि बाजारांत आत्मविक्रय करतां येत नाहीं. यंत्राशीं चढाओढींत ज्याचा हस्तव्यवसाय बुडाला असा लहान धंदेवालाहि मागें हटत हटत मजूरांच्या बाजारांत जाऊन उभा राहतो आणि तेथें आधींच असणाऱ्या मजूरांचा भाव आणखी उरतवितो. अथवा नवीन नवीन निघणाऱ्या कारखान्यांत जाऊन भांडवलाचा व यंत्राचा व्याप वाढवितो. इतिहासांत इंग्रज कोष्टयांच्या विध्वंसाइतकी कोणतीहि कथा अधिक करुणाजनक नाहीं. यंत्राशीं चढाओढींत कित्येक वर्षे यांचा हळूहळू नाश होत होता. कित्येक कुटुंबें उपासमारीनें मेलीं. इतर कांहीं निवळ मीठ—भाकरीवर पुष्कळ वेळ कारखान्यांत राबूं लागलीं. इंग्लंडांतील कापसाच्या गिरण्यांचा याहूनहि फार भयंकर परिणाम हिंदुस्थानावर झाला. इंग्लंडांत जें संकट हळूहळू ओढवलें तें हिंदुस्थानांत एकदमच कोसळलें. हिंदुस्थानचा गव्हर्नर जनरल १८३४—३५ च्या आपल्या अहवालांत लिहितो 'इंग्लंडच्या व्यापारवाढीच्या इतिहासांत हिंदी लोकांच्या हालअपेष्टांस तोडच नाहीं. ब्रिटिश कापडामुळें बेकार झालेल्या कोष्टयांचीं हाडें रानोमाळ पसरलीं आहेत व तीं उन्हांत तापून त्यांनीं हिंदुस्थानचीं मैदानें भाजून निघत आहेत.' " (कॅपिट्ल् खं. २). मजूराचे अंगीं कसब असल्यास त्यास बेकारीचें भय नाहीं असें कांहीं मूर्ख लोकांस वाटतें. पण भांडवल-

वाल्यास काय वाटत असतें पहा. ब्रिटिश फॅक्टरीचा एक इन्स्पेक्टर लिहितो, "एकाद्या कामास विशेष कौशल्य आणि तत्परता लागत असल्यास तें कुशल कारागिरास द्यावेंच लागतें. पण त्यांतील कौशल्याचा भाग उरकणारें यंत्र निर्माण होण्याचा अवकाश कीं लागलीच या कसबी माणसास काढून टाकण्यांत येतें. तेथें लहान मुलाचीहि नेमणूक होऊं शकतें. यंत्र हें माणसापेक्षां केव्हांहि अधिक नियमित असल्यानें तेथें उत्पादनांत कसर अथवा चुकारपणा होऊं शकत नाहीं." (कॅपिटलमधील उतारा). यंत्र हे बेकारी वाढण्याचें फार मोठें कारण असल्यानें यांत्रिक शोधांचे प्रयत्न ही मजूराच्या डोक्यावर टांगलेली तलवारच आहे. संप मोडण्याचें तें फार मोठें साधन आहे. ज्याच्या यांत्रिक शोधांनीं १८५१ मध्यें इंग्लंडांत इंजिनियरांचा संप मोडला तो नॅसमिथ हा संशोधक भांडवलवाला ट्रेड यूनियन कमिशन पुढील एका साक्षीत सांगतो, "आधुनिक यांत्रिक शोधांचें वैशिष्टच हें आहे कीं त्यामुळें आपोआप चालणारीं हत्यारें (म्हणजे यंत्रें) उत्पन्न होतात. या यंत्रावर मोठ्या माणसाप्रमाणें लहान पोरहि काम करूं शकतें. त्यानें करावयाचें तें इतकेंच कीं यंत्रानें सुरेखपणें चालविलेल्या कामावर नजर ठेवावयाची. केवळ आपल्या कसबावर ऐट मिरवणाऱ्या कामकऱ्यांना या यंत्रांनीं निकामी केलें आहे. पूर्वी मी जेथें १५०० माणसें लावीत असें तेथें आतां या शोधामुळें ७५० माणसें पुरतात. यामुळें माझा नफा फारच वाढला आहे." (कॅपिटल मधील उतारा).

यांत्रिक कारखान्याप्रमाणें शेतींत भांडवल पडूं लागलें म्हणजे तेथेंहि शास्त्रीय शोध व यंत्रें यांचा उपयोग होऊन मजूरांची गरज कमी होते. हे खेड्यांतील मजर शहरांत जाऊन बेकारींत आणखी भर घालतात. बेकारी भरपूर असली म्हणजे नवीन धंद्याची वाढ करण्यास भांडवल थोडें लागतें व धंद्याची वाढ भराभर होते. म्हणून समाजांत बेकारी थोडीफार असणें जरूर आहे असें भांडवलवाल्यांचें मत असल्याचें हॉब्सन यानें नमूद केलें आहे. अमेरिकेंतील हेन्री फोर्ड यांच्या मोटारींच्या कारखान्यांत मजूरांना मजूरी इतकी पुष्कळ मिळते कीं मजूरांनीं स्वतांच्या मोटारी ठेविल्या आहेत. पण यांतील मर्म समजून घेतलें पाहिजे. फोर्ड यांनीं यंत्रांची अतिशय सुधारणा केली असून तीं नाजकपणें चालविण्यासाठीं फार कसबी व बुद्धिमान कारागीर लागतात. मजूरांच्या बाजारांतून अशीं माणसें निवडून काढून त्यांस शिक्षणहि देऊन

फोर्ड त्यांस मजूरीहि भरपूर देतात. पण यामुळें त्यांचें थोड्या मजूरांत पुष्कळ उत्पादन होत असून त्यांनीं नफ्याच्या प्रमाणांत पूर्वीपेक्षां मजूरांची संख्या कमी केली आहे. यामुळें कांहीं मजूर श्रीमंत झाले तरी बेकारींत अधिकच भर पडली. यंत्रानें बेकारी वाढते, मजूरांत चढाओढ होते, त्यामुळें कामावर असणारांची मजूरी कमी होते आणि दारिद्र्य व उपासमार वाढण्याचें थांबत नाही. फोर्ड यांना लागतात त्या दर्जाचे कारागीर त्यांना लागणाऱ्या संख्येहून अधिक झाले कीं त्यांच्यावरहि बेकारी व कमी मजूरीचा प्रसंग ओढवणारच. कारण नफा भरपूर मिळविणें हेंच अखेर फोर्ड यांचें ध्येय आहे. जगांतील कामगार सुखी राखणें हें नाहीं.

## भांडवलवाल्यांतील चढाओढ थांबली

मजूराच्या अडलेल्या परिस्थितीचा भांडवलवाला फायदा घेतो म्हणजे भांडवलवाला व मजूर या दोन विषम वर्गांमधील सौद्यांत उभयपक्षीं स्वातंत्र्य सारखेंच राहात नाहीं. म्हणून मजूरानें दिलेल्या वाढाव्यानें भांडवलवाल्याच्या संपत्तीस महापूर येतो व असंख्य मजूरांपासून अधिकांत अधिक वाढावा पिळून घेण्याचें कार्य भांडवलवाला हा सतत चालू ठेवितो वगैरे गोष्टी आपण येथवर पाहिल्या. आतां भांडवलवाले आपसांतील चढाओढींत तरी समता व स्वातंत्र्य कितपत राखतात हें पाहूं. आर्थिक व्यवहारांत चढाओढ हें पवित्र तत्त्व पाळलें जावें असें भांडवलशाही अर्थशास्त्रज्ञांचें मत आहे. पण भांडवलवाला जो धंदा करतो तो अर्थशास्त्रज्ञांच्या तत्त्वसिद्धीसाठीं करीत नसून स्वतांच्या फायद्यासाठीं करतो. या फायद्यास चढाओढीनें अडथळा केल्यास तो फायद्यासाठीं चढाओढीस बळी देईल हें मनुष्यस्वभावास धरूनच आहे. शिवाय बुद्धिमत्ता, भांडवल, नीति–अनीतीची चाड, अनुकूल परिस्थिति या बाबतींत निरनिराळ्या भांडवलवाल्यांत विषमता असल्यानें चढाओढीत अल्पबली हे सहज चिरडले जातात. हा प्रकारहि भांडवलशाहीच्या जन्माइतकाच जुना आहे. अर्थशास्त्रज्ञांना कांहीं वाटो, भांडवलवाल्यांना चढाओढ हें तत्त्व कधींच पवित्र वाटलेलें नाहीं. भांडवलवाल्यांनीं आपसांत चढाओढ केली म्हणजे गिऱ्हाइकास माल स्वस्त पडेल हें अर्थशास्त्रज्ञांना हवें होतें. पण मजूरानें भांडवलाच्या साह्यानें निर्माण केलेला माल गिऱ्हाइकाच्या पदरीं जास्तींत जास्त किंमत घेऊन टाकतां आला तर भांडवलवाल्यास जास्तींत जास्त

नफा मिळणार; तेव्हां भांडवलवाले आपसांत चढाओढ करून नुकसान झाल्यामुळें अक्कल सुचताच आपसांत एकी करून भाव उतरविण्याची चढाओढ थांबवितात अथवा सर्वांचें भांडवल एकत्र करून धंद्याचें प्रमाण वाढवितात. यामुळें भांडवल कमी लागून उत्पन्न वाढतें. बाजारांत प्रतिस्पर्धीच नसल्यानें चढ्या भावानें माल विकतां येतो. चढाओढ थांबविण्याचा हा अगदीं शिष्टसंमत प्रकार होय. कारण यांत निरनिराळ्या भांडवलवाल्याची आपसांत खुषीची देवघेव आहे. गिऱ्हाइकाची लूट होते हा प्रश्न अर्थातच अलाहिदा आहे.

दुसरा प्रकार भांडवलवाल्याच्या लढाऊ वृत्तीस साजणारा आहे. एकादा भरभराटलेला भांडवलदार दुसऱ्या कमी भरभराटलेल्याशीं चढाओढ करून त्यास टेकीस आणतो. आणि त्याच्या अडचणीचा फायदा घेऊन त्यास अगदीं अल्प मोलांत विकत घेतो अथवा दुय्यम हिस्सेदार म्हणून त्यांस आपल्या धंद्यांत सामील करून घेतो. अशा रीतीनें देशांतील भांडवल एकत्र येत असतें. बड्या भांडवलवाल्यास भागीदारी पद्धतीनें लहान लहान रकमा घेऊन धंदा वाढविण्याची कल्पना पटूं लागते. एकाद्या कैलासवासी झालेल्या खटाटोपी धनिकाचा ऐदी वारस, गरीबांस पिळून गबर होणारे डॉक्टर, वकील, एंजीनियर वगैरे मध्यम वर्गातील लोक, यांच्याजवळ थोडथोडी पुजी साचत असते. कोंकणांत ज्याप्रमाणें परड्यांतल्या नारळीस अनायासें नारळ लागतात, अथवा कोणत्याहि प्रयत्नाशिवाय आपल्या दाढीमिशा अर्हनिश वाढत असतात त्याप्रमाणें कनवटीस साचणारी थोडथोडी पुजी परभारें वाढत राहील तर मध्यम वर्गास ते हवेंच असतें. ही पुजी भागीदारी पद्धतीनें भांडवलवाला मिळवितो. असे हे भागीदार १०० रुपये किंवा १० पौंड इतक्या कमी भागीचे असून लक्षावधि असतात. ते जगभर कोठेंहि पसरलेले असतात. या भागीदारांच्या बहुमतानें धंद्याचे नियामक निवडले जातात व भागीदारांच्या बहुमतानें धंदा चालतो असें कायद्यानें मानलें जातें. वस्तुस्थिति अशी असते कीं धंद्याचे मुख्य हपीस कोठेंतरी दूर ठिकाणीं असतें. १०० रु. अथवा १० पौंड घालणारा लहान भागीदार आपला उद्योग सोडून पदरमोड करून शेंकडो कोसांचा मुलूख तुडवीत भागीदारांच्या सभेला जातहि नाहीं. नियामक अथवा डायरेक्टर यांत ज्यांनीं धंदा उभारला तींच माणसें असतात आणि

लक्षावधि भागीदारांच्या कोटयवधि रुपयांची उलाढाल कुलमुखत्यारीनें करितात. भागीदाराच्या तोंडावर फायद्याचा थोडासा नफा फेकला कीं त्यांचें काम भागतें.

सरकारला लागणारा कोटयवधि रुपयांचा माल हे तयार करतात व त्यासाठीं सरकारधाऱ्याचे पैसेहि वापरतात. सरकारच्या पैशाचा व्यवहार संभाळणाऱ्या बॅंकांशीं व देशांतील इतर बॅंकांशीहि यांचें साटेलोटें असतें या बँकांतर्फें इतर बडया धंदेवाल्याशीहि यांचें नातें जमतें. लोकशाहीच्या नांवाखालीं हे पैसे पेरून मतें मिळवितात व निवडून आल्यावर राज्यसंस्थेच्या बळावर धंदा वाढवितात. मंत्रिमंडळाचा एकादा सभासद एका खाजगी धंद्याचा नियामक आणि दुसऱ्या एका बॅंकेचा चालक या नात्यानें एकाच खुर्चीवर बसून बहुधा एकाच प्रकारचें कामकाज पाहतो. कारण पार्लमेंटानें एकाद्या स्वदेशी धंद्यास संरक्षण द्यावें असें मंत्री या नात्यानें म्हणतांना तो स्वतांच्याच धंद्यास संरक्षण मागत असतो. राज्यकर्त्यांनीं धंद्यांत ढवळाढवळ करूं नये असें बेंथॅम म्हणत असे. पण आतां पाहावें तों अनेक धंद्यांचे चालक आपलें टोळकें जमवून आणि त्यांत चारदोन तत्त्वज्ञ गुतवून घेऊन राज्यसत्तेनेंच धंदा चालवितात. जॉन स्ट्राची लिहितात, " हल्लींची राज्यसंस्था ही भांडवलवाल्यांचीच किरिट–दंडधारी संघटना आहे. '१० डाऊनिक स्ट्रीट लंडन' (इंग्लंडच्या सरकारची मुख्य कचेरी) येथें दर आठवडयांतून दोनदां जमणारे ब्रिटिश कॅबिनेटचे सभासद हे 'ग्रेटब्रिटन लिमिटेड' या कंपनीचे प्रमुख नियामक आहेत. त्यांच्या सभा म्हणजे या कंपनीच्या नियामक मंडळाच्याच सभा होत. " सरदार, पुरोहित आणि राजे यांचें मूर्ख व जुलमी वर्चस्व नाहीसें होऊन व्यापारधंद्यास पूर्ण मोकळीक मिळाली कीं स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांचा प्रसार होऊन जिकडे तिकडे लहान धंदेवाले आनंदानें हरिणाप्रमाणें बागडूं लागतील असें सुखस्वप्न रूसो यांस पडलें होतें. पण मजूरीच्या बाजारांत मजूरास अडवून व त्यापासून अव्याहत वाढावा पिळून घेऊन यंत्राच्या साहाय्यानें अफाट संपत्ति निर्माण करणारा भांडवलवाला, हत्ती जसा पूर्वीं मदोन्मत्त होऊन असंख्य जीवांचा पायाखालीं संहारकरीत करीत रणमैदानावर धांवत असे त्याप्रमाणें, अर्थशास्त्रज्ञांच्या नीतितत्त्वांवर व या जगांतील गोरगरीबांच्या छातीवर नाचेल ही कल्पना रूसोच्या आशाळू

मनास कधींच शिवली नाहीं. भांडवलवाल्यांच्या परस्परांतील चढाओढीची ही वाट लागली. आतां आंतरराष्ट्रीय व्यापारांत प्रतिबंध नसला म्हणजे जागतिक श्रमविभाग होईल व सर्व जग एकजीव होऊन त्यांत शांति व समाधान नांदेल हें जें ॲडॅम स्मिथचें मत त्याचा विचार पुढील प्रकरणांत करूं.

---

## प्रकरण ६ वें

# भांडवलशाहीचें जागतिक स्वरूप—साम्राज्यशाही

भांडवलशाहीच्या जागतिक स्वरूपाचाहि विचार करताना सुरुवातीपासून दोन गोष्टी ध्यानात ठेवल्या पाहिजेत. त्या अशा की, भांडवलवाला धंदा करतो तो अर्थशास्त्रज्ञांच्या तत्त्वसिद्धीसाठीं करीत नसून स्वतांच्या फायद्यासाठीं करीत असतो. आणि भांडवलवाल्याचीं संपत्ति मजूरानें त्यास दिलेल्या वाढाव्यानेंच वाढत असते.

### जागतिक श्रमविभाग व परस्परावलंबन

भांडवलशाहीचा जो जगभर प्रचंड विस्तार झाला आहे त्यास दळणवळणाचीं आणि वाहतुकीचीं प्रचंड साधनें हींच कारण होत. एकाद्या खेड्यांत जो समाज असतो, त्यांतील व्यक्ती संपत्ति उत्पन्न करण्यासंबंधींच्या नात्यांनीं एकमेकांस जखडलेल्या असतात. कुंभार चांभारास गाडगें देतो वाहणा घेतो; चांभार शेतकऱ्यास वाहणा देतो भाकर घेतो; शेतकरी शेतावर खपून दाणे निर्माण करतो, त्याची बायको त्यास घरांतल्या दाण्याची भाकर करून शेतावर पोंचविते. असें खेडेगांव एकत्र बांधलेलें असतें. आगगाड्या, तारायंत्रें झाल्यामुळें शहरचा माल खेड्यास व खेड्याचा माल शहरास, देशाच्या एका टोकाचा माल दुसऱ्या टोकास व दुसऱ्या टोकाचा पहिल्या टोकास येऊं लागून देशहि एकत्र बांधला गेला आणि आगबोटींच्या सोईनीं आतां सारें जग एकत्र बांधलें गेलें आहे. यंत्रयुगापूर्वी एका खेड्यांत ज्याप्रमाणें सर्व गांवकरी श्रमविभागानें व परस्परावलंबनानें जगत तशा प्रकारचा जागतिक श्रमविभाग व परस्परावलंबन आज जगभर उत्पन्न झालें आहे.

निरनिराळ्या देशांची भौतिक परिस्थिति भिन्न भिन्न असून त्या योगें त्यांचें उत्पादनहि भिन्न भिन्न होतें. वाहतुकीच्या साधनांनीं व्यापार वाढला कीं याच मालाची निपज वाढून आंतरराष्ट्रीय देवघेव सुरू होते. उदाहरणार्थ, कॉफी ही ब्राझिल, मध्य अमेरिका, अबीसीनिया, ब्रिटिश मध्य आफ्रिका, डच इंडीज, ब्रिटिश इंडीज्, मलाका या प्रदेशांत होऊन जगभर वाटली जाते. कोको फक्त उष्ण प्रदेशांतच होतो. आजच्या उद्योगधंद्यास जगभर रबराचा उपयोग फार; पण तें ब्राझिल, इक्वेडोर, पेरू, बॉलिव्हिया, ग्वायना अशा थोड्याच देशांत होऊन जगभर वाटलें जातें. सर्व जगास वस्त्रासाठीं लागणारा कापूस अमेरिका, इजिप्त, हिंदुस्थान, आशिया मायनर, चीन, मध्य आशिया या प्रदेशांतच होतो. कापसाच्या खालोखाल लागणारा ज्यूट फक्त हिंदुस्थानांतच मुख्यत: होतो. दगडी कोळसा इंग्लंड, जर्मनी, अमेरिका, ऑस्ट्रिया येथेंच निघतो. रॉकेल अमेरिका, कॉकेशस, हिंदुस्थान, इराण, रुमानिया, गॅलिशिया येथेंच निघतें.

उत्पादनसामर्थ्यात निरनिराळ्या देशांची कमीअधिक प्रगति असते. त्यामुळेंहि जागतिक श्रमविभाग होत असतो. कारण एकाद्या मागसलेल्या देशांत जमिनीत कोळसा असूनहि तो काढण्याचें शास्त्र माहीत नसल्यानें नवीन होणाऱ्या कारखान्यांना तो बाहेरून आणावा लागतो. भांडवलवाले देशाभिमानी नाहीत व मजूरांची कार्यक्षमता वाढली नाहीं अशा हिंदुस्थान देशांतून कापूस इंग्लंड–जपानांत पाठवून तेथून कापड विणून इकडे आणावें लागतें. अशा कारणांमुळें जगांत औद्योगिक बाबतीत सुधारलेली राष्ट्रें व मागसलेलीं राष्ट्रें असे जगाचे दोन भाग पडतात. मागसलेल्या राष्ट्रांतून कच्चा माल सुधारलेल्या राष्ट्रांत जातो व सुधारलेल्या राष्ट्रांतील पक्का माल मागसलेल्या राष्ट्रांत येतो. एकाच प्रांतांत सामान्यत: खेडीं हीं कच्च्या मालाचीं उत्पादक व शहरें हीं पक्क्या मालाचीं उत्पादक असतात. अशी आतां साऱ्या जगाची विभागणी होऊन खेड्यांचीं राष्ट्रें व शहरांचीं राष्ट्रें असे जगांतील राष्ट्रांचे गट पडतात. यामुळें जग एकजीव होत आहे हें ॲडॅम स्मिथचें भविष्य खरें झालें आहे. अमेरिका खंडानें व ऑस्ट्रेलियानें गहूं पिकवला नाहीं आणि हिंदुस्थान व इजिप्त इत्यादींनी कापूस पिकविला नाहीं तर जगावर अकस्मात् फार मोटा अनर्थ ओढवेल यांत मुळीच शंका नाहीं. जगाचा बाजार

तर आतां इतका एकजीव झाला आहे कीं उत्पादनाचा खर्च निरनिराळ्या देशांत कमी-अधिक असूनहि गहू, कापूस इत्यादि जगास लागणाऱ्या पदार्थांचा बाजारभाव सामान्यतः एकच झाला आहे.

या सर्व जागतिक उलाढालीच्या तळाशीं 'वाढावा' आहे हें लक्षांत ठेवावें. कापसाचा जमिनदार शेतीवरील मजूरांस पिळून वाढावा काढतो. जपानांतील कारखानदार तेथल्या मजूरांपासून वाढावा काढतो. आणि या वाढाव्यांचीच देवघेव आंतरराष्ट्रीय क्षेत्रांत चालते. लंडनमधील भांडवलवाला रशियांतील एका शहरास कर्ज देतो आणि रशियांतील हें शहर लंडनवाल्यास व्याज देतें. यांत घडतें तें काय ? इंग्लिश भांडवलवाल्यानें आपल्या मजूरांस पिळून काढलेला वाढावा कर्जरूपानें तो रशियास देतो आणि रशियन शहरांतील भांडवलवाले आपल्या मजूरांस पिळून जो वाढावा मिळवितात त्यांतला कांहीं अंश व्याज म्हणून इंग्लंडास पोंचवितात. बुखारिन लिहितो, " सर्व जगांतील आर्थिक व्यवहाराचें एकंदरींत सार आहे तें इतकेंच कीं मजूरांस पिळून भांडवलवाल्यांनीं वाढावा मिळवावा, तो जगांतील भांडवलवाल्यांत वाटावा आणि वाढावा मिळण्याचा क्रम अखंड चालू राहण्यासाठीं मालक आणि मजूर हे उत्पादनसंबंध सर्व जगभर उत्पादन क्षेत्रांत कायम ठेवावे." (इंपीरियालिझम् अँड वर्ल्ड इकॉनमी)

अॅडॅम स्मिथच्या अपेक्षेप्रमाणें सारें जग एकसंघ होत असलें तरी वाढाव्याची पिळणूक चोहोंकडे चालू असल्यामुळें स्वातंत्र्य व समता हीं मुळांतच नाहीशीं झालीं आहेत. पण एका देशांतील भांडवलवाले हे तरी दुसऱ्या देशांतील भांडवलवाल्यांस स्वातंत्र्यानें व समतेनें वागवितात काय? नाही. मागें एका देशांतील मोठे भांडवलवाले त्याच देशांतील लहानास कसे गिळंकृत करतात हें आपण पाहिलें. तोच प्रकार समर्थ भांडवलवाले देश व दुर्बळ भांडवलवाले देश यांचे मध्यें होत असतो.

हिंदुस्थानांतील हल्लींचें ब्रिटिश राज्य व त्यापूर्वींचें मोंगली राज्य यांत मूलतःच फरक आहे. मोंगल राजे कांहीं अनुयायांसह जे येथें आले ते मग येथेंच कायम राहिले. पण इंग्रज राज्यकर्ते विलायतेस राहतात व येथून मिळणाऱ्या नोकरांच्या पगार-पेन्शनांनीं विलायतेचें वैभव वाढवितात. हा अगदीं स्थूल फरक झाला. पण मुख्य महत्त्वाचा फरक असा कीं, मोंगली राज्य इकडे

कायम राहण्यास आलेल्या एका घराण्याचें राज्य होतें. इंग्रज राज्य हें इंग्रज राष्ट्रांतील प्रजेचें राज्य आहे. हिंदुस्थानांतील मोठ्या पगाराच्या व अधिकाराच्या सर्व जागा इंग्लंडांतून येणाऱ्या नोकरांना मिळतात आणि त्यांच्या साह्यानें हें राज्ययंत्र सुरळित चालू ठेविलें जातें आणि लोकशाहीच्या नांवाखालीं ज्या भांडवलवाल्यांची सत्ता इंग्लंडांत चालते त्यांना हिंदुस्थानचा उपयोग माल खपवून नफा मिळविण्यासाठीं होतो. 'आम्ही राज्य करतों, तुम्ही धन लुटा' ही लॉर्ड कर्झन यांची प्रसिद्ध उक्ति याच अर्थाची द्योतक आहे. अगदीं पहिल्यानें हिंदुस्थानांतून कच्चा माल न्यावा व त्याचा पक्का करून येथें परत विकावा अशा प्रकारें इंग्रज येथें धन मिळवीत. जगांतील प्रत्येक देशांतील भांडवलदार आपापल्या देशांतील मजूरास पिळून वाढावा मिळवतात असें पूर्वीं म्हटलें. असाच मागसलेल्या देशांतील भांडवलवाल्यांच्या खिशांत पडलेला पुष्कळ वाढावा पुढारलेल्या देशांतील भांडवलवाला कमी वाढाव्याचा मोबदला देऊन घेतो. चोर एकमेकांसहि लुटतात तसा हा प्रकार आहे. हिंदी कापसास इंग्लंड हेंच मोठें गिऱ्हाइक होतें तेव्हां हिंदी जमिनदारांनीं शेतकऱ्यापासून पिळून काढलेला कापूस मिळेल तो दाम घेऊन इंग्रजांस विकला. आणि इंग्रजांनीं इंग्लिश मजूरांस पिळून त्यापासून जें कापड विणून घेतलें, तें हिंदुस्थान व इतर परदेश यांत विकून आपल्या वाढाव्याचें पैशांत रूपांतर केलें.

## जगास साम्राज्यशाहीचा वेढा कसा बसतो

पुढें हिंदुस्थानांत कच्च्या व पक्क्या मालाच्या पेठेंत इंग्लंडास प्रतिस्पर्धी उत्पन्न झाले. तेव्हां हिंदुस्थानांतील राजकीय सत्तेचा हरतऱ्हेनें उपयोग करून ब्रिटिशांनीं आपलें आर्थिक वर्चस्व कायम राखण्याचा विशेष प्रयत्न केला. पक्क्या मालाच्या राष्ट्रांनीं कच्च्या मालाच्या राष्ट्रांवर आर्थिक प्रभुत्व राखण्याचा हा राजकीय प्रकार आतां जगभर रूढ झाला असून अमेरिका, इंग्लंड, जपान, फ्रान्स, इटाली या सर्व देशांनीं आपलें आर्थिक वर्चस्व मागसलेल्या देशांवर कमी-अधिक प्रमाणांत बसविलें आहे. ही भांडवलशाहीचीच विकसितावस्था असून ब्रिटिश भांडवलशाहीचा अर्थशास्त्रज्ञ जो हॉब्सन त्यापासून कम्युनिस्टांचा पुढारी लेनिन येथपर्यंत सर्वांनीं या वर्चस्वप्रकारास 'इंपीरियालिझम्' असें नांव दिलें आहे. इंपीरिॲलिझम अथवा साम्राज्यशाही हिची लेनिन खालीलप्रमाणें व्याख्या देतो:—" साम्राज्यशाही ही भांडवलशाहीचीच विक-

सितावस्था आहे. या अवस्थेंत भांडवलवाल्यांतील चढाओढ संपून मक्तेदारी सुरू होते आणि औद्योगिक भांडवलाचा अमल सुरू होतो. जगांतील पक्क्या व कच्च्या मालाच्या बाजारपेठा काबीज करण्याची चढाओढ थांबवून भांडवलवाल्यांचे आंतरराष्ट्रीय संघ या पेठा आपसांत वाटून घेतात. आणि जगांतील सर्व प्रदेशाची भांडवलशाही राष्ट्रांत वाटणी झालेली असते." भांडवलशाहीस ही साम्राज्यशाहीची अवस्था कशी प्राप्त होते याचा आतां विचार करूं.

चढाओढीचा अभाव व औद्योगिक भांडवलाचें वर्चस्व हीं या घटनेचीं मुख्य साधनें आहेत. उद्योगप्रधान म्हणजे पक्का माल काढणाऱ्या राष्ट्रांतकापड इत्यादि पक्का माल जसा होत असतो तसाच हा माल काढणाऱ्या कारखान्यांतील यंत्रें होत असून ज्या देशांतून कापूस येतो व जेथें कापड जातें तेथें स्वदेशी भांडवलशाही सुरू होऊन ही यंत्रेंहि हळूहळू जाऊं लागतात व तेथेंच--उदाहरणार्थः--हिंदुस्थान , चीन वगैरे देशांत कापडाचे कारखाने निघतात. हा वेळपावेतों इंग्लंडसारख्या देशांत भांडवलशाही बरीच रूढ झाल्यानें मजूरांनी संघटना करून मजूरी वाढवून घेतलेली असते. यामुळें तेथें उत्पादनाचा खर्च वाढतो. उलट हिंदुस्थान, चीन येथें कारखान्यांची पद्धति अगदीं नवी असून मजूर वर्ग मागसलेला असल्यानें मजूरीचा दर कमी पडतो. चालकमंडळ चांगल्या प्रकारचें असल्यास या मागसलेल्या मजूरांकडून मजूरीच्या मानानें पुष्कळ चांगल्या प्रकारचें काम करून घेतां येतें व कच्चा माल दूर देशीं नेणें व तेथून कापड परत कापसाच्या देशांत विक्रीसाठीं आणणें हा ने-आणीचा खर्च कापसाच्या प्रदेशांतच गिरण्या काढल्या असतां पूर्णपणें वांचतो. म्हणून इंग्लंडांतील भांडवलवाल्यांना इंग्लंडापेक्षां हिंदुस्थानांत भांडवल गुंतवणें अधिक फायदेशीर वाटतें. यामुळें इंग्रज मजूरांत बेकारी वाढते हें खरें; पण भांडवलवाल्यांचें ध्येय जास्तीत जास्त नफा मिळविणें हें असतें, स्वदेशी मजूरांना काम पुरविणें हें असत नाहीं. भांडवली राष्ट्रें हिंदुस्थानसारख्या राष्ट्रांत भांडवल गुंतवितात; पण एकाद्या प्रचंड कंपनीचे लहान लहान भागीदार आपला पैसा डायरेक्टरांच्या हवालीं करून स्वस्थ बसतात त्याप्रमाणें हिंदी भांडवलवाल्यांच्या हातांत भांडवल देऊन ब्रिटिश भागीदार विलायतेंत हवा खात स्वस्थ बसत नाहींत. घोड्यानें शत्रूचा पराभव करण्यासाठीं माणसास आपल्या पाठीवर घेतलें व त्याचे

हातीं आपली लगाम दिली; पण माणसानें ती लगाम पुढें कधींच हातची सोडली नाही. त्याप्रमाणें मागसलेल्या राष्ट्रांतील धंदेवाल्यांनीं आपल्या धंद्यांच्या वाढीसाठीं परदेशी भांडवल घेतलें की, त्याची योग्य हमी पटविण्यासाठीं त्यांना त्या भांडवलाच्या मालकांची सत्ताहि पत्करावी लागते आणि या सत्तेचा व्याप वाढवीत वाढवीत हे परकी भांडवलवाले चालकांचें आसन आपणच पटकावून बसतात.

स्वदेशांतल्या प्रमाणें विदेशीं पाठविण्यासाठीं उभारण्याचें भांडवलहि दोन प्रकारें उभारलें जातें. एक प्रकार कर्जाचा. यायोगें ठराविक दराच्या व्याजाचे कर्जरोखे काढले जातात व रोखेवाल्यास सालोसाल ठराविक व्याज मिळत जातें. दुसरा प्रकार भागीचा. धंद्यास कमीअधिक नफा होईल त्याप्रमाणें भागीदारास नफ्यांतील कमीअधिक हिस्सा मिळतो. हें विदेशी भांडवल केवळ कारखान्यासाठींच उभारतात असें नाहीं. सरकारी खर्चास लागणारें कर्जहि परकीय देशांत उभारलें जातें. रेल्वे, ट्राम, विजेचे कारखाने वगैरे नवीन वाढीस लागणाऱ्या शहरांना लागणारे कांही कारखाने यांना जो माल लागतो तो सगळाच्या सगळा माल कर्जाऊ पुरवून विदेशी भांडवलवाले एक-एकटेहि या नवीन धंद्यावर पूर्ण वर्चस्व गाजवितात. विदेशीं नवीन निघणाऱ्या धंद्यांना भांडवल पुरविण्यासाठीं प्रचंड प्रमाणावर बँका निघून त्या स्वतांचा भांडवल पुरविण्याचा धंदाहि भागीदारीनें उभारतात व विदेशी धंद्यांतले पुष्कळ भाग विकत घेऊन त्या धंद्यांवर वर्चस्व स्थापन करितात. दोन मोठ्या धंद्यांत चढाओढ लागून नुकसान होऊं लागल्यास त्या दोहोंतीलही पुष्कळसे भाग खरेदी करून भांडवली बँका दोन्हीचें नेतृत्व पतकरतात. एकाच प्रचंड धंद्यास लागणारा अनेक प्रकारचा माल उदाहरणार्थ, कापूस, दगडी कोळसा वगैरे—यांचे जे पृथक् धंदे असतात या प्रत्येकांत भांडवल गुंतवून एकच विदेशी बँक धंद्याच्या सर्व पसाऱ्यांतील चढाओढ नाहींशी करते व गिऱ्हाइकांस आपण म्हणूं त्या दरानें माल घ्यावयास लावते. भांडवल हें एकदां आंतरराष्ट्रीय व्यवहारांत शिरलें कीं तें खाणी, कारखाने, शेती, आगगाड्या, आगबोटी व बँका या सर्व क्षेत्रांत शिरकाव करतें. यांतील कांहीं नफा स्वदेशीं परत जातो पण बहुतेक परत परत भांडवलांतच शिरतो व तें वाढवितो. राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय अशा व्यापक प्रमाणावर चढाओढ थांबविण्यासाठीं निरनिराळ्या

धंद्यांचे अथवा बँकांचे जे संघ होतात त्यांना ट्रस्ट, कार्टेल्स, सिंडिकेट अशीं नांवें आहेत. त्यांच्यांतील बारिकसारिक फरक आपणांस प्रस्तुत नाहींत. मुख्य मुद्दा असा कीं यामुळें बिनचढाओढीचें क्षेत्र प्रचंड होतें. या सर्व प्रचंड संघटनेंत कार्टेल्स, बँका, सरकारी कामें हीं सर्व एकमेकांच्या सहकार्यानें वाढतात. भांडवलाचें केंद्रीकरण ज्या वेगानें होईल त्या वेगानें ही वाढ होऊं शकते. धंद्यांचे संघ होऊन त्यांची चढाओढ थांबली कीं, त्यांना भांडवल पुरविणाऱ्या बँकांची चढाओढ थांबते. उलट, बँकांतील चढाओढ थांबली कीं, धंद्यांतीलहि थांबत असते. बँका व धंदेवाले यांचें व सरकारचें परस्परावलंबन वाढतें. निरनिराळ्या क्षेत्रांत संघटना व भांडवलाचें केंद्रीकरण यांची एकमेकांस मदत होत असते. यामुळें राष्ट्रांतील आर्थिक घडामोडींतील फुटीरपणा नाहींसा होऊन एकच एक आर्थिक संघटना निर्माण होते. तिचें आधिपत्य सहजच भांडवलवाल्यांकडे येतें व तेच राज्ययंत्रावरहि प्रभुत्व गाजवितात. स्वराष्ट्रांतील बाजारावर या संघटनेस स्वामित्व मिळतें व यापासून पुढें जगाचें स्वामित्वहि त्याजकडेच येतें.

पण एकाद्या भांडवली संघाला स्वदेशांतील इतर संघटना व बाजार यांवर आक्रमण जितकें सहज शक्य होतें, तितकें सहज आक्रमण परदेशावर होत नाहीं.

भांडवलशाहीचे इंग्लंडांतील आद्य प्रवर्तक—तत्त्वज्ञ व भांडवलवाले दोघेहि —अप्रतिबंध व्यापाराचे पुरस्कर्ते होते. तत्त्वज्ञांचे उच्च हेतु कांहीहि असोत स्वतां भांडवलवाल्याला दिसत होतें तें इतकेंच कीं, इंग्लंडची उत्पादनपद्धति सुधारलेली होती. तेव्हां ब्रिटिश मालास इतर राष्ट्रांत घुसण्यास स्वातंत्र्य मिळालें कीं, ब्रिटिश भांडवलवाल्यांना अपरंपार नफा मिळेल. पण स्वार्थ-साधूपणाचा मक्ता कांहीं एकट्या इंग्लंडलाच ईश्वरानें अथवा बेंथॅमनें दिला नव्हता. जर्मनीसारख्या कर्तबगार राष्ट्रांना इंग्लंडचें आपणांवर आर्थिक आक्रमण होऊं नये व साधल्यास जर्मनीसच इतर राष्ट्रांवर आक्रमण करतां यावें अशी बुद्धि उत्पन्न झाली. ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांचें एक मत मागें सांगितलें कीं, आंतरराष्ट्रीय व्यापारास कृत्रिम प्रतिबंध नसल्यास ज्या देशांत जो माल करणें परवडेल तेथें फक्त तोच माल निर्माण केला जाईल. कारण बाजारांत तोच कमी किंमतीचा म्हणून खपेल व म्हणून इतर माल स्वदेशांत महागाईनें न पिकवितां विदेशांतून स्वस्त किंमतींत खरेदी केला जाईल.

## भांडवलशाही राष्ट्रांची आपसांतील स्पर्धा

या विचारसरणींत इतर राष्ट्रांना अनेक दोष दिसत होते. अमुक एक माल स्वदेशांत पिकविणें परवडतें कीं नाहीं हें पाहतांना त्या मालाची निष्पत्ति करण्यासाठीं सुधारलेल्या पद्धति अवलंबून व बरेंच बुडीत भांडवल घालून प्रयोग करून पाहिला पाहिजे. हा प्रयोग पाहतांना कांहीं दिवस हा माल महाग पडूं लागला व त्याच्याशीं परदेशी मालास चढाओढ करूं दिली तर प्रयोग यशस्वी होणारच नाही. म्हणून, लहान मुलास त्याची पूर्ण वाढ होऊन तें स्वावलंबी होण्यापूर्वी जसें सर्व बाजूंनी संरक्षण देतात त्याप्रमाणें नवोत्पन्न धंद्यास देऊन त्याची पूर्ण वाढ होऊं दिली पाहिजे, म्हणजेच तो स्वदेशांत परवडतो कीं नाहीं हें खरोखर समजेल. म्हणून या बालधंद्यांना संरक्षण देण्यासाठीं विदेशी मालाच्या आयातीवर कर बसविले पाहिजेत व लोकांत स्वदेशी मालाबद्दल अभिमान उत्पन्न केला पाहिजे. इतकेंहि करून स्वदेशी माल थोडासा महाग पडला तरी कच्च्या मालाचें पक्क्या मालांत रूपांतर करणें व दोन्हींची ने–आण करणें याची मजूरी विदेशीयांस मिळते व स्वदेशी लोक तितक्या प्रमाणांत बेकार होतात; तेव्हां एकंदरीत राष्ट्रीय दृष्टीनें पाहतां परदेशी माल महागच पडतो. तिसरा आक्षेप असा की, यंत्रें वगैरे जीं साधनें स्वदेशांत होत नाहींत तीं आणून त्यांपासून निघणाऱ्या मालाचे कारखाने वाढवावेत व पुढें पुढें यंत्रेंहि स्वदेशांत करूं लागून परदेशी माल पूर्ण बंद करावा. परदेशी मालाची आयात करावयाची ती ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञांच्या मताप्रमाणें स्वदेशांत तो तो माल उत्पन्न करणें कायमचें बंद करावें यासाठीं नव्हे तर, सर्व प्रकारचा परदेशीं होणारा माल स्वदेशांतच करतां येण्यासाठीं अवश्य असा माल–यंत्रें वगैरे–परदेशांहून आणावयाचा. चवथा आक्षेप असा की, जीवितास आवश्यक असे पदार्थ–उदाहरणार्थ, आगपेटी, चष्मा, युद्धोपयोगी सामान, वगैरे–हे पदार्थ बाहेर कोठें तरी युद्ध सुरू होऊन वाहतूक बंद झाल्यास बाहेरून आणणें अशक्य असून त्यावाचून राष्ट्राचें जिणेंच अडचणीचें होतें. यासाठीं फाजील खर्च करूनही असा माल स्वदेशांतच बनविणें जरूर असतें. या सर्व व असल्याच आणखी आक्षेपांची एकत्र बेरीज केली म्हणजे अप्रतिबंध व्यापाराचा सर्व युक्तिवाद धुळीसच मिळतो. या सर्व आक्षेपांच्या बुडाशीं जी एक भावना आहे ती ही कीं, पक्क्या मालाचीं उत्पादक राष्ट्रें हीं यांत्रिक साधनां-

मुळें व बौद्धिक प्रगतीमुळें युद्धकर्तृत्व, राज्यकर्तृत्व वगैरे बाबतींत पुढारलेलीं असतात. यांना मागसलेल्या देशांत अप्रतिबंध ठेवणें म्हणजे मेंढरांच्या कोंडवाड्यांत वाघास अप्रतिबंध ठेवण्यासारखें आहे. जेथें कच्चा माल होतो तेथेंच पक्काहि माल तयार झाल्यास मागसलेलें राष्ट्र हें स्वतांहि बलिष्ट होऊं शकेल. अशा वैभवाची ईर्षा स्वतां धरण्याचें सोडून तें औद्योगिक राष्ट्रास कां वरचढ होऊं देईल ? शिवाय, जर्मनीसारख्या ज्या राष्ट्रांना आपणहि इंग्लंडप्रमाणें औद्योगिक राष्ट्र बनून कच्च्या मालाच्या प्रदेशावर प्रभुत्व गाजवावें असें वाटतें, तीं राष्ट्रें इंग्लंडचा माल स्वदेशांत येऊं देऊन त्यांचें प्रभुत्व कां स्वीकारतील ?

अप्रतिबंध व्यापाराविरुद्ध विदेशी मालावर जकाती बसवून स्वदेशी मालास संरक्षण देण्याचें जें धोरण आज जगभर रूढ झालें आहे त्याची ही स्थूल मीमांसा आहे. पण याचें अंतरंग कांहीसें येथेंच समजून घेऊं. वरील विवेचनांत आपण स्वदेश स्वदेश असा शब्द वापरीत आलों. पण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं 'स्वदेशी' धंदे याचा अर्थ सर्व राष्ट्राच्या मालकीचे धदे असा नव्हे. ते राष्ट्रांत कांहीं व्यक्तींच्या मालकीचे असतात व बेंथॅमचा मानसपुत्र जो स्वार्थसाधूपणा तो यांच्याहि अंगी असतोच. परदेशांतील धंदेवाल्यांशीं यांची चढाओढ लागलेली असते व तीत वरचढ होण्यासाठी हे स्वदेशी भावनेला उत्तेजन देऊन आपला धंदा वाढवितात. असा धंदा वाढल्यानें आपलाहि फायदा आहे हें जनतेस पटत असल्यानें जनता त्यास पाठिंबा देते. पण भांडवलवाले धर्मासाटीं पंढरपुरास सहस्रभोजनें घालीत असले किंवा तत्त्वज्ञानमंदिरें चालवीत असले किंवा कॅाँग्रेसला पैसे देत असले तरी स्वतांचा धंदा करतांना स्वदेशाभिमान संभाळीत नाहींत. स्वदेशी कापड आपल्या गिरणीत विणीत असतांना यांच्या बायकामुलांना फक्त परदेशीच कपडे चालतात. ज्यांच्या कष्टावर यांचा धंदा चालतो व यांना वाढावा मिळतो त्यांच्या सुखाची भांडवलदारांना फिकीर नसते. गिऱ्हाइकास देतां येईल तितका स्वस्त माल द्यावा ही इच्छा नसते आणि ज्या वेळीं देशाभिमानास्तव थोडा कमी नफा घेऊन धंदा वाढविणें इष्ट असेल अशा वेळीं हे भांडवलदार स्वदेशी बाजाराची परदेशी धंदेवाल्यांशीं वाटणी करून ज्यांनीं भांडवलवाल्यासाठीं स्वदेशी चळवळ केली व हाल सोसले त्यांची भर बाजारांत विदेशीयासमोर

फजीति करतात. अगदीं अलीकडील इंडो-जपानी करार व बॉम्बे—लँकाशायर करार हीं भांडवलवाल्यांच्या देशद्रोहाची ताजीं उदाहरणें आहेत. हे भांडवल-वाले धंद्यास संरक्षण मागतात त्यांत त्यांची राष्ट्रीय बुद्धि नसून निवळ स्वार्थ-बुद्धिच असते.

स्वतांचा धंदा स्वदेशांत वाढविण्यासाठीं संरक्षण मागणें ही जशी भांडवल-वाल्यांची कारवाई असते तशीच परदेशांत आपला माल खपावा अशासाठींहि संरक्षण मागण्याची कारवाई चाललेली असते. धंद्यास फाजील संरक्षण मिळालें कीं नफ्याची निश्चिती होऊन भांडवलवाला धंद्यांत सुधारणा करीत नाहीं असा आक्षेप हिंदी लोक केव्हां केव्हां येथील भांडवलवाल्याविरुद्ध घेत असतात. पण जर्मनी, जपान, इग्लंड वगैरे देशांतील भांडवलवाले येथल्या भांडवलवाल्यांसारखे ऐदी गोळे नाहीत. स्वदेशांत बाहेरून येणाऱ्या माला-वर जबर जकात बसविली की स्वदेशांतील भांडवलवाल्यांना सपाटून नफा म्हणजे स्वदेशी मजूरांकडून सपाटून वाढावा मिळतो. त्याच्या बळावर ते धंद्यांत सुधारणा करतात व परदेशांत चढाओढींत किमती खूप कमी करून वेळीं नुकसानीतहि माल विकतात. यांत स्वदेशाची उन्नति आहे असें भासवून मजूरांना कमींत कमी पगारावर राबवितात. मजूरांनीं तक्रारी करूं नयेत अथवा संघटना करून नफेबाजीस आळा घालू नये म्हणून स्वदेशांतील मजूर संघटनेस व लोकशाहीसहि ठार करितात. जर्मनी व जपान येथें हे सर्व उपाय सध्यां पूर्ण जारी आहेत.

स्वदेशांत भरपूर नफा मिळवून परदेशांत कमी किमतीनें माल विकण्यास इतर राष्ट्रांच्या सरहद्दींवरील जकाती आड येतातच. इंग्लंड व अमेरिका अशा ज्या राष्ट्रांना राजकीय स्वामित्वाखाली प्रचंड प्रदेश लाभले आहेत त्यांना ही अडचण फार कमी असते. अमेरिकेंत अखिल राष्ट्राच्या सरहद्दीवर जकाती असून निरनिराळ्या संस्थानांच्या सरहद्दींवर अर्थातच जकाती नाहींत. यामुळें भांडवलवाल्यांना खुद्द अमेरिकेंतच फार मोठें गिऱ्हाइक प्रतिस्पर्ध्यां-शिवाय लुटतां येतें. इंग्रजांना आपल्या साम्राज्यांत हीच सोय करतां येते. इतर वसाहतींतील भांडवलवाले हल्लीं समर्थ झाले असल्यानें आपला बाजार लुटण्यास इंग्रजी भांडवलवाल्यांना मुभा देणें त्यांना रुचत नाहीं. पण हिंदु-स्थानांतील भांडवलवाले मागसलेले व दुर्बल असल्यानें ब्रिटिश भांडवलवाले

हिंदी जकातींनीं जर्मनी, जपान यांस मागें रेटून जवळजवळ बिनजकातींनीं आपला शिरकाव हिंदी बाजारांत करतात व लहान माशास मोठा मासा खातो या न्यायानें येथील भांडवलवाल्यास गिळंकृत करतात. शिवाय इंग्लंडांतून माल आणून येथील व्यापाऱ्यांचा पराभव करण्यापेक्षां हिंदुस्थानांतच ब्रिटिश भांडवल गुतवून व येथेंच धंदा उभारून येथील व्यापाऱ्यास खाऊन टाकतात. लांडग्यानें शक्यतर मेंढवाडयांतच घर करून राहणें अधिक फलप्रद नाहीं काय ?

## आर्थिक स्पर्धेतून शस्त्रयुद्धाचा उद्भव

जकातीचा अडथळा न येतां व्यापारधंद्याचा जगभर अप्रतिहत संचार व्हावा म्हणून भांडवलशाही राष्ट्रें राजकीय सत्ता वाढविण्याचा हव्यास धरतात यांत एका राष्ट्राचा राज्यलोभ दुसऱ्या राष्ट्राच्या लोभाआड येऊन त्यांचा खटका उडतो किंवा ज्याचे स्वातंत्र्यावर धाड आली त्यांकडून विरोध सुरू होतो; यामुळें आंतरराष्ट्रीय युद्धें होतात. भांडवलशाहीची वाढ जितकी झपाटयानें होईल तितकी ही युद्धें अधिक व्यापक व अधिक भयानक होतात. कारखान्यांत ढिगाचे ढीग माल निर्माण होऊं लागतो. पण कमींत कमी मजूरीवर राबविलेल्या स्वदेशी प्रजेस तो सर्व माल खरेदी करण्याची शक्तिच नसते. माल बाहेर खपवावा म्हटले कीं, इतर राष्ट्रांशीं चढाओढ सुरू होते. एकाहून अधिक औद्योगिक राष्ट्रें चढाओढीत पडली की अप्रतिबंध व्यापाराची इतिश्री झालीच. ज्याला जो प्रदेश हातीं लागेल तो कबज्यांत घेऊन तो तेथें आपली राज्यसत्ता स्थापितो व कच्च्या मालाचा व पक्क्या मालाचा सत्तेचा बाजार आणि भांडवल गुंतविण्याची सत्तेची भूमि तेथें निर्माण करतो. १८७० पर्यंत इंग्लंड औद्योगिक बाबतींत निरंकुश होतें. तोंपावेतोंहि हिंदुस्थान, ऑस्ट्रेलिया, कॅनडा वगैरे प्रचंड भूप्रदेश इंग्लंडनें जिंकले होते. यापुढें जर्मनी, फ्रान्स, रशिया, बेल्जम या सर्वांनींहि इंग्लंडबरोबरच आफ्रिका, चीन, पासिफिक महासागरांतील बेटें वगैरे प्रदेशांत राजकीय व आर्थिक वर्चस्व स्थापन केलें. यंत्रामुळें माणसाची उत्पादनशक्ति एकसारखी वाढत राहून मालाचे ढीग एकसारखे निर्माण होतात; यामुळें बाजार वाढणेंहि जरूर असतें. पण जगावरील सोईस्कर भूप्रदेश हे केव्हां तरी संपणारच. तसे ते संपले कीं एकाच्या प्रदेशावर दुसऱ्यानें झडप घालणें भाग पडतें. हें काम निवळ तागडीवाल्यास तागडीच्या दांडयानें करतां येण्यासारखें नसल्यानें

त्यास अडदांड शिपायांकरवीं हें काम उरकावें लागतें. आणि मग भांडवल-वाल्यांचे मुनीम जे राज्यकर्ते ते आपलीं खडीं सैन्येंच नव्हे तर देशांतील सर्व तरुण नागरिक बळी देण्यासाठीं खांद्यांवर बंदूकी देऊन खंदकांत उभे करितात.

पक्क्या मालाच्या बाजारासाठींच भांडणें होतात असें नव्हे तर, कच्च्या मालाच्या हक्काच्या पुरवठ्यासाठींहि राष्ट्राराष्ट्रांचे तंटे होतात. औद्योगिक क्रांति प्रथम होते ती पक्क्या मालाच्या उत्पत्तींत होते. ही क्रांति इतकी झपाट्यानें व अनेक देशांत एकदम होते कीं, लवकरच कच्च्या मालाचा पुरवठा अपुरा पडूं लागतो. जुन्या पद्धतीनें शेती करणारे देश मालास मागणी जितक्या वेगानें वाढेल तितक्या वेगानें माल पुरवूं शकत नाहींत. बरीच मशागत झाल्यावरच सुपीक होणाऱ्या अशा जमिनी पिकविण्यास त्यांजजवळ भांडवलहि नसतें व उत्साहहि नसतो. त्यामुळें पक्क्या मालाच्या धंदेवाल्यास कच्च्या मालाच्या उगम–प्रदेशावर ताबा मिळवावा लागतो. कच्चा माल लागतो तो विविध प्रकारचा व दूरदूर देशांत पिकणारा असतो. निरनिराळ्या प्रकारचें लाकूड, कापूस, अनेक प्रकारचीं जनावरें (कांतडीं, हाडें, मांस यांसाठीं), रबर, कोळसा, लोखंड, तांबें, तेल या सर्व औद्योगिक उत्पादनास एकत्र लागणाऱ्या वस्तु साऱ्या जगभर अस्ताव्यस्त पसरलेल्या आहेत. तेथून तेथून त्या एकत्र जमवून आणाव्या लागतात. यासाठीं ते ते प्रदेश काबीज करावे लागतात. इराणांतील तेलाच्या खाणींवर इंग्लंडचें सर्व आरमार अवलंबून आहे. इजिप्त तर इंग्लंडनें कापसाचें शेतच केलें आहे. ज्या राष्ट्रांना आधीं नंबर मिळाले त्यांनीं मुख्य मुख्य जागा पटकावल्या. मागून आलेल्यांना यांच्याशीं भांडावें लागलें. अशा भांडणांत जर्मनीनें मोठा घास घेण्याच्या भरीं पडून होतें तेंहि गेल्या महायुद्धांत ओकून टाकलें. आतां आफ्रिकेंतील वसाहती गेल्यामुळें कापूस नाहीं म्हणून त्यास गिरण्या कमी वेळ चालवाव्या लागत आहेत. जपाननें मांच्युरिया घशाखालीं घालून कच्च्या मालाचें मोठेंच रान काबीज केलें आहे. त्याचा चीनहि खाण्याचा विचार दिसतो; मग जर्मनीचा अनुभव त्यासहि न येवो म्हणजे झालें.

भांडवलशाहीच्या भयंकर स्वरूपाचें म्हणजे साम्राज्यशाहीचें परदेशांत भांडवल गुंतविणें हें महत्त्वाचें लक्षण असल्याचें मागें सांगितलें आहे. प्रत्यक्ष युद्ध न करतां हळूहळू परदेश घशांत घालण्यांत या भांडवलाचा फार उपयोग

होतो. इजिप्त हें इंग्लंडचें व्यवहारतः अंकित राष्ट्र आहे; तें असें पैसे गुंतवूनच घेतलें आहे. आतां तेथें इंग्लंडचें सैन्य आहे. तेथें लक्षावधि पौंडांचें भांडवलहि आतां गुंतलें असून सप्तपदीनें लागलेल्या लग्नाप्रमाणें इंग्लंड व इजिप्त यांचें नातें कधींच तुटणें शक्य नाहीं. तोंडांत भक्ष्य घेऊन मासा जसा गळाला आडकतो त्याप्रमाणें विदेशी राज्यें या कर्जाच्या गळाला अडकलीं जातात. सावकार काय, व्याज घेईल, फार तर तारण घेईल असें आपण समजतों. पण अशिक्षित शेतकरी व पाताळयंत्री सावकार यांच्या संबंधांत जो प्रकार दिसतो तोच राज्यकर्ते व त्यांचे विदेशी कर्जदार यांचे दरम्यान् दिसतो. रिणको राष्ट्रास कर्ज देतांना इतर अनेक करार त्याबरोबरच केले जातात. त्यांत रिणको राष्ट्रानें धनको राष्ट्राकडून हत्यारें, दारूगोळा, जहाजें, रेल्वेचें सामान वगैरे खरेदी करावे असे करार होतात. तसेंच रिणको राष्ट्रानें धनको राष्ट्रांतील भांडवलवाल्यांस रेल्वे, ट्रॅम, तारायंत्र, टेलिफोन वगैरेचा प्रसार विशेष सवलतीनें करूं द्यावा असें ठरविलें जातें. नवीन खाणी काढणें, बंदरें बांधणें, जंगलें तोडणें वगैरे बाबतींत धनकोस सवलती मिळतात. धनको राष्ट्रानें कर्ज दिलें म्हणजे पुढें केव्हांहि रिणको राष्ट्रानें दुसऱ्या राष्ट्राकडून कर्ज काढूं नये, दुसऱ्या राष्ट्रास व्यापारी सवलती देऊं नयेत, त्याचा माल येऊं देऊं नये, जगाच्या बाजारांत रिणको राष्ट्राची पत धनको राष्ट्रानें संभाळावी, अंतर्गत व्यवहारावर ताबा चालवावा, एक ना दोन सहस्र करार रिणको राष्ट्रावर लादले जातात. आंतरराष्ट्रीय नीतिदृष्टया यांतलें पुष्कळ गैर असेल; पण तें कागदोपत्रीं नमूदहि नसतें. परस्पर समजुतीनीं सुरू झालेल्या व्यवहारांत रिणको राष्ट्र रक्तपाताशिवाय केवळ कर्जाच्या बळावर परतंत्र होतें. अर्थात् प्रत्यक्ष रक्तपात नव्हे तरी शस्त्रबलाचा धाक कर्जाचे मागें उभा असतोच. यामुळें ज्या राष्ट्राचें लष्करी सामर्थ्य प्रचंड त्याचें कर्ज परदेशांत यशस्वी होतें.

एकदां कर्जरूपानें अथवा कर्जावर स्वार होऊन धनको राष्ट्राच्या आगगाड्या, तारायंत्रें, कारखाने यांचा पसारा ऋणको राष्ट्रांत पसरला कीं तो नफ्यांत पडावयास पाहिजे याचें बंधन ऋणको राष्ट्रावर असतें व त्यामुळें यास विशेष संरक्षण दिलें जातें. कर्जाची मेख परराष्ट्राच्या शरीरांत अशी आरपार जात असते. औद्योगिक राष्ट्राचे धंदे जसजसे वाढीस लागतील तस-

तसा त्याजजवळ माल जास्त जास्त निर्माण होतो. मागसलेल्या देशांत यांत्रिक उत्पादन सुरू होत असल्यानें औद्योगिक राष्ट्रांतील यंत्रें वगैरे मालाची मागणी वाढते. मागसलेलीं राष्ट्रें या सर्व मालाची किंमत एकदम अथवा पुढें केव्हांच देऊं शकत नाहीत. हा सर्व माल कर्जाऊ भांडवल ( फिनॅन्स कॅपिट्ल् ) म्हणून ऋणको राष्ट्राच्या पोटांत शिरतो आणि या कर्जाच्या मागोमाग दृश्य अथवा अदृश्य अशा राजकीय सत्ताप्रकारांनीं ऋणको राष्ट्राचें जीवित सर्व बाजूंनीं जखडलें जातें.

औद्योगिक राष्ट्रांतील भांडवलानें मागसलेल्या राष्ट्रांत पाय पसरल्यास त्याचे दोन महत्त्वाचे परिणाम होतात. एकतर भांडवल गुंतविण्यास नवें क्षेत्र लाभतें आणि दुसरा फायदा म्हणजे धनको राष्ट्रास आपल्या मालासाठीं सत्तेचें गिऱ्हाइक मिळतें. हे फायदे मिळविण्यासाठीं धनको राष्ट्र ऋणको सरकारावर वजन घालून आपल्या प्रतिस्पर्ध्याविरुद्ध जकातीच्या भिंती उभ्या करतें. यामुळें धनको राष्ट्राचा फायदा अधिकाधिक वाढतो आणि कमी किंमतीवर माल विकून आणखी बाहेरचे बाजार हीं राष्ट्रें काबीज करतात व मागून भांडवलाच्या पायांनी आंत शिरून आणखी नवे प्रदेश व्यापून टाकतात. तेथें पुन्हां जकाती, पुन्हां पुष्कळ फायदा, पुन्हां त्याच्या बाहेर कमी किंमतीनें बाजार व्यापणें, पुन्हां भांडवलानें आंत शिरणें असें हें चक्र एकसारखें वेगानें पुढें धांवत राहतें आणि दुसऱ्या एकाद्या राष्ट्राचें दुसरीकडून असेंच वेगानें फिरत येणारें चक्र यास धडकलें कीं महायुद्धाची ठिणगी पडते.

---

# प्रकरण ७ वें

# माणसें कशासाठीं झगडतात ?

भांडवलशाही व तिचेंच विराट स्वरूप साम्राज्यशाही यांचें आतांपावेतों वर्णन केलें. आतां ऐतिहासिक दृष्ट्या या जागतिक घटनेचें वैशिष्टच काय आहे हें पाहूं. कांहीं स्थूलद्रष्ट्यांचें म्हणणें असें असतें कीं “ भांडवलशाहींत

राष्ट्राराष्ट्रांचे जे झगडे होतात ते अनादि कालापासून असेच चालत आले आहेत व भांडवलशाहींत ते कांहींसे अधिक तीव्र दिसत असले तरी त्यांचा निराळा प्रकार मानण्यासारखें विशेषसें त्यांत कांहींच नाहीं. एका मानववंशास दुसऱ्यावर प्रभुत्व गाजविण्याची इच्छा असते व हा दुसरा त्यास विरोध करतो यामुळें कलह माजतो. हें जगांतील सामुदायिक झगड्याचें सामान्य स्वरूप आहे. देव आणि राक्षस यांच्या हजारो वर्षापूर्वीच्या झगड्यापासून आज आशिया विरुद्ध युरोप, हिंदु विरुद्ध मुसलमान, काळा विरुद्ध गोरा, आर्य विरुद्ध अनार्य, ख्रिस्ती विरुद्ध ज्यू या हल्लीं जगभर चालू असलेल्या झगड्यापर्यंत शतकानुशतकें हा वंशकलह चालत आला आहे."

## वांशिक व धार्मिक उपपत्तींतील अपुरेपणा

पण इतिहासाकडे थोडीशी चिकित्सक दृष्टि टाकल्यास इतिहासाचा हा उलगडा चुकीचा दिसतो. गेलें महायुद्ध हें सर्व जगांत आजवर झालेल्या युद्धांत फार व्यापक व फार भयंकर होय. त्याचेंच परीक्षण केल्यास ही वंश-कलहाची कल्पना फोल ठरते. वंशकल्पनेचा आधुनिक पुरस्कर्ता जर्मन पुढारी हिटलर यासहि हें मान्य आहे कीं, हल्लीचे जर्मन लोक व इंग्लंडांतील अँग्लो सॅक्सन लोक हे एकाच आर्यवंशाचे आहेत. गेल्या महायुद्धांत लढलेल्या दोन पक्षांचे ते प्रत्येकीं अग्रणी होते. 'आर्यांचे' हाडवैरी जे ज्यू लोक त्यांनीं जर्मनींत जर्मनांना व इंग्लंडांत इंग्रजांना मदत केली. बल्गेरियन्स व सर्ब्स हे दोन्ही स्लाववंशोत्पन्न असून साधारणतः एकच भाषा बोलतात. पण गेल्या महा-युद्धांत ते प्रतिपक्षी होते. परस्परांचे शत्रु असे जे ऑस्ट्रिया व रशिया त्या दोन राष्ट्रांचे लोक पोलंडांत एकत्र राहून पोलंडबद्दल अभिमान बाळगतात. इंग्लिश, फरेंच, इटालियन, रशियन् हीं सर्व एकाच पक्षाचीं राष्ट्रें असून त्यांच्यांत वांशिक ऐक्य मुळीच नाहीं. आणि यांच्या बाजूनें लढणारें फ्रान्सचें निग्रो सैन्य हें तर जगांत वंशदृष्ट्या अद्वितीय आहे. जर्मन, झेच, हंगेरियन, बल्गेरियन् आणि तुर्क हे सर्व भिन्न भिन्न मानववंश एकाच बाजूनें लढले.

गेलें महायुद्ध सोडून मागें पाहिलें तरी ही वंशकल्पना टिकत नाहीं. जगांत आशियाविरुद्ध युरोप असा झगडा असल्याचा बोभाटा मुख्यतः जपानी लोक करितात. १९०४–५ सालीं जपान व रशिया यांचें झालेलें युद्ध

मुख्यतः या लढ्यांतून उद्भवलें असें जपानी पुढारी म्हणत असून इतर राष्ट्रांतील मुत्सद्यांनीहि यास पुष्टि दिली आहे. पण थोडें खोल पाहिल्यास हें दिसून येतें कीं खुद्द इंग्रजांना जपानपेक्षां रशियाचा हिंदुस्थानच्या सुरक्षिततेच्या दृष्टीनें अधिक धाक वाटून इंग्रजांनीं रूसो–जपानी युद्ध झाल्यास आपण तटस्थ राहूं व इतर पाश्चिमात्य राष्ट्रें रशियाला मिळाल्यास आपण जपानला मदत करूं असा जपानशीं १९०२ सालीं तह केला होता. जपानी व चिनी हे एकाच मानव वंशाचे आहेत. पण वांशिक बंधुभाव गुंडाळून ठेवून जपानी लोक चिनी राष्ट्राची संपत्ति त्यांच्यावर तलवारी चालवून लुबाडीत आहेत. चीनचें जपानपासून जें थोडें रक्षण झालें आहे तें आजवर फ्रान्स, रशिया, जर्मनी, व इंग्लंड यांनीं या सर्वांहून अमेरिकेनें वेळोवेळीं जपानला धाक दाखवून चीनची संपत्ति स्वतां लुटण्यासाठी जपानला मागें परतविलें यामुळें होय. इंग्लंड व इंग्लंडांतून अमेरिकेंत गेलेले वसाहतवाले हे अगदीं एका हाडामांसाचे; पण वसाहतवाल्यांनीं फरेंचांशी मसलत करून इंग्लंडशीं लढाई केली व इंग्लंडपासून स्वातंत्र्य जिंकून घेतले. उलट कानडांतील फरेंच वसाहती परत फरेंचांच्या अमलाखाली न जातां इंग्रजांच्या साम्राज्यांत राहण्यास राजी आहेत; आयरिश लोक हे भिन्न वंशीय म्हणून इंग्रजांशीं भांडतात. पण त्यांच्यांतच इंग्रजाशी संबद्ध राहूं पाहणारा प्रबळ पक्ष आहे. दक्षिण आफ्रिकेचे सुप्रसिद्ध पुढारी जनरल स्मट्स हे बोअर म्हणजे डच असून बोअर युद्धांत इंग्रजांशीं लढलेहि होते. पण आतां त्यांना ब्रिटिश साम्राज्याचा अभिमान असून त्यांनी इंग्रजांची गेल्या महायुद्धांत व इतर वेळींहि बहुमोल सेवा केली आहे. युरोपांत धार्मिक यादवीच्या काळीं एकवंशाच्या लोकांनीं एकमेकांच्या माना कापल्या व पुढें तुर्कस्थानच्या रक्षणासाठीं फरेंचांनीं रशियाशी म्हणजे ख्रिस्त्यांनीं ख्रिस्त्यांशीं लढाई केली. हिंदुस्थानांत हिंदु–मुसलमान लढले खरे, पण सिंधु नदी उतरून इकडे येऊन स्थायिक झालेला मुसलमान सिंधूपलीकडील मुसलमानांचा शत्रू झाला होता. पानिपतच्या युद्धाच्या वेळीं हिंदुस्थानांतील कांहीं मुसलमान सेनानी पेशव्यास अनुकूल होण्याचा संभव होता असें इतिहासकार सांगतात., रजपुतांनीं मोंगली दरबारची वंशपरंपरा सेवा केली व या रजपुतांच्या साह्यानें मोंगलांनीं दक्षिणेंतील बहामनी या मुसलमान राज्याच्या शाखा बुडविल्या. बहामनी राज्याच्या शाखा परस्परांत भांडत असत

आणि त्यांचीं भांडणें त्यांच्या पदरचे मराठे सरदार खेळत. शिवाजीनें सर्व मराठे एक करून स्वतंत्र राज्य स्थापिलें. पण पुढें उत्तरेंत त्याच्या शाखा पसरल्यांवर तिकडील सरदारांनी आपापला सवता सुभा स्थापिला व अखेर सर्वांनीं आपसांत भांडून इंग्रजास घरांत घेतलें.

वांशिक आपपर भाव जागतिक घटनेंत महत्त्वाचा नाहींच असें नाहीं. उच्च व नीच मानल्या गेलेल्या वंशांत शरीरसंबंध होऊन वांशिक ऱ्हास होऊं नये ही इच्छा मानव समाजांत तीव्र आहे. आशियाटिक प्रजेस गोऱ्या राष्ट्रांतून दूर दूर वागवितात व अमेरिकेंत निग्रोंना जाळतात ते या वांशिक द्वेषामुळेंच; पण वांशिक अहंकारापेक्षां आर्थिक लोभ अधिक बलवान आहे आणि समान आर्थिक हितसंबंधामुळें गट पडून गटागटांत लढे माजतात, तितके वंशभेदामुळें माजत नाहीत ही गोष्ट ऐतिहासिक दृष्टया महत्त्वाची आहे. इंग्लंडनें आपणास लुटूं नये म्हणून अमेरिका स्वतंत्र झाली व जपानास चीन लुटण्यास समृद्ध, जवळ व सोपा म्हणून जपान चीनच्या उरावर बसतो. इंग्रजां-प्रमाणें आपणासहि साम्राज्य हवें म्हणून त्याच वंशाचे जर्मन त्यांच्याशी भांडतात आणि इंग्रजांचें पूर्वेकडील वर्चस्व उठविण्यासाठी तुर्कस्थानवर वजन घालून त्याची मदत घेतात.

लढा असतो तो मुख्यत: भिन्न भिन्न धर्मीयांमध्यें असतो असें म्हणण्याचा एक काळ होता. पण, ख्रिस्ती व महंमदी धर्मांचे लोक गेलीं कित्येक शतकें इतके आपापसांत भांडले आहेत की आतां निदान गेल्या तीनचारशें वर्षांचा इतिहास धार्मिक दृष्टीनें उलगडूं पाहण्याचा प्रयत्नहि आतां कोणी करीत नाहीं.

## स्वदेश कल्पना आर्थिक लोभांत जन्मली

एक वंश अथवा एक धर्म यापेक्षां एकराष्ट्रीयतेमुळें गट पडतात असें मान-णारा एक पंथ आहे. जर्मनी, इंग्लंड व जपान या राष्ट्रांचीं माणसें जगांत कोठेंहि गेलीं तरी आपल्या राष्ट्रीयत्वाचा अभिमान सोडीत नाहींत. अमेरिकेच्या ताब्यांत असलेल्या पासिफिक महासागरांतील हवाई बेटांत ४२ टक्के लोक-संख्या एकटया जपान्यांची आहे. त्यांनीं आपली भाषा, धर्म, संस्कार, चालीरीती वगैरे सर्व कायम राखल्या आहेत. हवाई बेटांतील एकाद्या जपान्यास लग्न करावयाचें असून समान दर्जाची जपानी स्त्री तेथें न मिळा-

त्यास तो परराष्ट्रीय स्त्री करीत नाहीं तर चार हजार मैल दूर असलेल्या जपानांतून बायको मागवितो. जर्मन लोक पूर्व युरोपांत उत्तरेस बाल्टिक समुद्रापासून दक्षिणेस काळ्या समुद्रापर्यंत पसरले आहेत; आफ्रिकेंतहि त्यांची लोकसंख्या बरीच आहे; पण, त्यांचा स्वदेशाभिमान नेहमीं जागृत असून स्वदेशासाठीं ते केव्हांहि प्राणार्पण करण्यास तयार असतात. इंग्रजांचाही असाच लौकिक आहे.

पण याविरुद्ध पुरावाहि थोडा नाही. अमेरिकेनें इंग्लंडबद्दल स्वदेशप्रेम अखेर सोडलें हें मागें सांगितलेंच. १९२० सालीं अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांत विदेशीय म्हणून नोंदलेल्या साडेतीन कोटी लोकसंख्येंत आयरिश, ब्रिटिश, रशियन, कॅनडियन या सर्वांपेक्षां ऑस्ट्रो–हंगेरियन व जर्मन यांची लोकसंख्या जास्त म्हणजे एक कोटी साडेसव्वीस लक्ष होती. पण या लोकांनी जर्मनीच्या विरुद्ध अमेरिकेनें युद्ध पुकारावें या मतास पाठिंबा दिला.

तथापि देशाभिमानानें गट पडत जातात हा नियम सामान्यत: खरा दिसतो. पण याचें तरी कारण काय तें पाहिलें पाहिजे. हिंदुस्थानांतून दक्षिण आफ्रिकेंत गेलेले मजूर अपमान, उपहास व दारिद्र्य कां सोसतात आणि इंग्रज मनुष्य जगावर कोठेंहि गेला तरी त्याला मानाचें पान कां मिळतें ? या दोन घटनांचीं जी दोन कारणें ती देशाभिमानाच्या भावनेंतील गूढ उकलून दाखवितात. हिंदी सरकार आपल्या परागंदा प्रजेचा पाठपुरावा करीत नाहीं. पण ब्रिटिश सरकारची सर्व शक्ति जगावर कोठेंहि भटकणाऱ्या इंग्रजाचें रक्षण करण्यास त्याच्या पाठीशी उभी असते. इंग्लंडची इभ्रत जगभर आहे तोंवरच आपण पृथ्वीतलावर निर्भय आहों हें ठाऊक असल्यामुळें इंग्रज मनुष्य स्वदेशाचा अभिमान बाळगतो व त्या देशाचा दरारा जगावर पसरितो; स्वदेशाच्या पाठिंब्यावर जगांत पराक्रम करून धनवान् व बलवान् होतो आणि या त्याच्या वाढत्या वैभवानें अखेर इंग्लंडचें वैभव वाढतें. इंग्रज, जपानी, जर्मन यांचा देशाभिमान ते कोठेंहि असले तरी जाज्वल्य असतो, पण हिंदी लोकांचा तितका असत नाहीं, याची उपपत्ति अशी आर्थिक दृष्ट्या लागते. माणसास भावना म्हणून कांहीं स्वतंत्र गुण आहे हें अगदीं खरें. मातेचें वात्सल्य व देशभक्ताचा देशाभिमान हीं पूर्णपणें आर्थिक स्वार्थजन्य आहेत असें कोणीच मानीत नाहीं. पण विशिष्ट प्रकारच्या भावना या शिक्षण, संस्कार,

संवय, इतिहास यांनीं दृढ होत असतात आणि ऐहिक योगक्षेम मानवी जीवितांत फारच खटाटोपानें सिद्ध होत असल्यानें या योगक्षेमकारक खटाटोपास अनुकल असेंच स्वरूप, शिक्षण, संवयी व इतिहास यांना धारण करावें लागतें. तसेंच ज्या भावना या योगक्षेमकारक खटाटोपास अनुकूल व पोषक असतात त्याच वाढीस लागतात व त्यांविरुद्ध असणाऱ्या नामशेष होतात. आईबापांचें अपत्यप्रेम सर्व मुलांवर सारखेंच खरें, पण आय. सी. एस्. होऊन नोकरीस लागलेला मुलगा मेल्याचें जेवढें दुःख आईबापास होईल त्याहून जो मुलगा गांधींच्या नादीं लागून आय्. सी. एस्. भावाच्या नोकरीवरच गदा आणूं लागला तो मेल्यानें थोडें तरी कमी होईल. असो.

पण 'स्वदेशाभिमान' ही भावनाहि कांहीं अनादिसिद्ध नाहीं. ज्याला आपण हिंदुस्थान देश असें मानतों व त्याबद्दल अभिमान बाळगावा म्हणतों त्यांतील प्रांत एकमेकांशी इतिहासकाळांत नेहमी लढले आहेत. मराठ्यांच्या कर्नाटकावर, गुजराथवर व बंगालवरच्या स्वाऱ्या प्रसिद्ध आहेत. बंगाली लोकांनाकीं जे आज स्वदेशाभिमान व प्रांताभिमान यांत अखिल हिंदुस्थानांत अग्रेसर आहेत; त्यांना—कित्येक शतकें स्वदेशाभिमान मुळींच माहीत नव्हता. अज्ञानाच्या दौलतीप्रमाणें या धनसंपन्न प्रदेशाची शतकोशतकें लूट चालली होती. इंग्लंडच्या आजच्या वैभवाचें मूळभांडवल पुष्कळ अंशानें बंगालनें पुरवलें. पण इंग्रजांच्या उपाधीनें व सुराज्यव्यवस्थेनें बंगालला एकराष्ट्रावस्था प्राप्त झाली व अखिल हिंदुस्थानालाहि त्यामुळेंच एकराष्ट्रीयत्व प्राप्त झालें. ग्रेटब्रिटन हा भूप्रदेश इंग्लंड, स्कॉटलड व वेल्स यांनीं बनलेला आहे. पण हे तिन्ही देश एकमेकांशीं शतकानुशतकें लढले आहेत. प्राचीन ग्रीकांचा 'स्वदेशाभिमान' तर गांवापलीकडेहि गेला नव्हता. फ्रान्सचे परगणे व जर्मनीचे प्रांत हे एकमेकांशीं मध्ययुगांत नेहमीं लढत असत. यांत सैन्य म्हणून जे लोक लढत तेहि स्वदेशाभिमानानें मुळींच लढत नसत. पगारी शिपाईगिरी करणें हाच यांचा धंदा असे. निरनिराळ्या सरदारांचीं पगारी पथकें असत. यांना निष्ठा असलीच तर ती प्रादेशिक नसून वैयक्तिक सरदाराबद्दल असे.

मध्ययुगाच्या शेवटीं युरोपांत आर्थिक परिस्थितींत क्रांति झाली व या क्रांतींतून सामान्य जनतेच्या दृष्टीनें 'स्वदेश' जन्मास आला. तुर्कांनीं कॉन्स्टांटिनोपल काबीज केल्यामुळें पौर्वात्य देशाशीं व्यापार करण्याचा खुष्कीचा

मार्ग बंद झाला. पूर्वेकडील देशास जाण्यासाठीं जलमार्ग शोधतांना कोलंबसास अमेरिका सांपडली व तेथून सोनें युरोपांत येऊं लागलें. जीव धोक्यांत घालून व साहस करून ज्यांनीं संपत्ति मिळविली त्यांना तिचें रक्षण व व्यापारधंद्याची वाढ यांची गरज वाटूं लागली. सरदारांच्या वर्चस्वानें व यादवीनें गांजलेल्या व सोन्याचा लोभ उत्पन्न झालेल्या राजांनीं या साहसी वर्गांचा पाठिंबा घेऊन सरदारांची सत्ता हळूहळू मोडून काढली आणि व्यापारीवर्ग व त्यांची संपत्ति आपल्या लगामीं लावली. सरदारांची यादवी मोडून आर्थिक उद्योगास कांहींशी स्वस्थता लाभली तरी लोभी राजांपासून संपत्ति संभाळणें हें काम कांहीं सोपें नव्हतें. पुढें व्यापाराबरोबर कारखाने व हळूहळू प्रचंड यांत्रिक उत्पादनहि सुरू झालें. या प्रचंड उत्पादनपद्धतीचा निर्माता जो भांडवलवाला त्याच्या हातीं साऱ्या समाजाच्या आर्थिक जीवनाचें साधन एकत्रित झालें. या भांडवलवाल्यांत परस्परांत स्पर्धा चाले; तरी मध्ययुगीन सरदारां प्रमाणें त्यांना एकमेकांचे गळे कापून आर्थिक उत्पादनाचा व्यवसाय चालविणें नव्हतें. आर्थिक उत्पादनाचा व्यवहार सुरळीत चालण्यासाठीं आर्थिक स्पर्धा चालवूनहि कांहीं गोष्टी एकोप्यानें करणें भागच पडलें. त्यांनीं लहरी राजांस नियंत्रित केलें. अमुक एका भूक्षेत्रांत अमुक राज्यसत्ता असें शासन सरदारांच्या निःपातामुळें निश्चित झालें. त्यांत कायदा व सुव्यवस्था स्थापण्यांत आली. माणूस व मालमत्ता यांच्या रक्षणासाठीं व आर्थिक उत्पादनाचा व्यवसाय जारी करण्यासाठीं चांगला न्याय व त्याची चांगली बजावणी जरूर झाली व त्यासाठीं सरकारचें सामर्थ्य वाढविणें भाग झालें. सरकारची सत्ता आपल्या हातीं घेऊन भांडवलवाल्यांनीं तें वाढविलेंहि. पुढें यांत्रिक उत्पादनपद्धतीनें एकएका राष्ट्राचें जीवित एकसंघ होऊन त्याच्या एका भागावर संकट तें सर्व भागावर, ही वस्तुस्थिति प्राप्त झाली. यामुळें सामान्य माणसांतहि 'स्वदेश' व 'स्वदेशाभिमान' उत्पन्न झाला. या स्वदेशाचा दरारा जेवढा मोठा त्या मानानें परदेशांत जाणाऱ्या साहसी माणसास संरक्षण अधिक म्हणून परागंदा साहसी माणसांत जाज्वल्य देशाभिमान वावरूं लागला व याच्या पराक्रमानें अखेर आपल्याच देशाचा फायदा होणार म्हणून राज्यकर्त्यांनीं याचा पाठपुरावा केला. निरनिराळ्या देशांतील भांडवलवाल्यांच्या चढाओढींत एकाद्या राष्ट्रांतील भांडवलवाल्यावर संकट आल्यास एकंदर

समाजावर हें संकट आहे हें सिद्ध करून भांडवलवाल्यास जनतेचा स्वदेशाभिमान आज जागृत करतां येतो. ज्या काळीं यांत्रिक उत्पादन नव्हतें व विहिरींतील बेडकाप्रमाणें समाज लहान लहान जागीं खुरटून नांदत होता त्या वेळीं हिंदुस्थान, अमेरिका, रशिया यांसारख्या प्रचंड देशांबद्दल प्रत्येक नागरिकास स्वदेशाभिमान वाटत असणें अशक्यच होतें. ग्रेटब्रिटनसारख्या लहान बेटांतहि तीनतीन चारचार लहान लहान राष्ट्रकें असून त्यांतहि सामान्य जनतेस आपल्या गांवापलीकडे 'स्वदेश' भासणें मुष्कील होतें. आल्फ्रेड धि ग्रेटसारखे थोर राजे प्रजेच्या नांवानें बोलतों असें प्रामाणिकपणें समजत. त्यांना भौगोलिक स्वदेशाची दृष्टिहि होती. पण जनतेस ती असण्याचें कारण नव्हतें.

सारांश, एकराष्ट्रीयत्व व स्वराष्ट्राभिमान यांनीं आज मानव समाजांत गट पडतात हें खरें असलें तरी हें असेंच पूर्वीपासूनच चालत आलें आहे असें नाहीं. यांत्रिक उत्पादनप्रकारामुळें आज विशिष्ट भौगोलिक प्रदेशांतील लोकांचें जीवित निगडित झालें आहे, त्यांचें सुखदुःख सर्वांस साधारण झालें आहे म्हणून त्यांच्यांत बंधुभाव वाढत असून त्या सर्वांना आधार जो 'भूप्रदेश' 'स्वदेश' त्यासाठी ते मरावयासहि तयार होतात. आर्थिक योगक्षेमाची इच्छा हीच सामान्यतः शत्रु कोण व मित्र कोण हें ठरविते. अर्थात् यांत्रिक व भांडवलशाही उत्पादन ही जशी उत्पादनपद्धतीच्या विकासांत एक पायरी आहे तशीच 'स्वदेशाभिमान' हीहि भावना त्या उत्पादन–विकासास अनुसरून भावनाविकासक्रमांतील एक पायरी आहे. हा उत्पादनप्रकार नव्हता तेव्हां ही भावना नव्हती. हा प्रकार पुढें बदलल्यास म्हणजे भांडवलशाही नष्ट झाल्यास ही भावना आहे याच स्वरूपांत राहणार नाहीं.

यांत्रिक उत्पादन प्रकारानें 'स्वदेश' व 'स्वदेशाभिमान' यांस जन्म दिला असें आपण पाहिलें. पण यांत्रिक उत्पादनानें भांडवलशाही, साम्राज्यशाही या एकीहून एक प्रचंड अशा समाजघटना निर्माण केल्या हेंहि आपणांस समजलें. समाजवादी भांडवलशाहीचे विरोधक आहेत खरे; पण मनुष्यसमाजाच्या विकासक्रमांत भांडवलशाही ही प्रगतीची पुढली पायरी आहे असें समाजवादी मानितात हें येथें ध्यानांत ठेविलें पाहिजे. इंग्लंडांत भांडवलशाही प्रथम उत्पन्न झाली. तेथें ती प्रथम कशी उत्पन्न झाली, पुढें तिचा

इतर राष्ट्रांत कसा उद्भव झाला व भांडवलशाहीस साम्राज्यशाही हें भयानक स्वरूप कसें प्राप्त झालें इत्यादि विवेचन पूर्वी केलेंच आहे. ही भांडवलशाही अथवा साम्राज्यशाही जशी एका विशिष्ट आर्थिक परिस्थितींत उत्पन्न झाली तशीच ही परिस्थिति बदलल्यावर भांडवलशाही व साम्राज्यशाही यांचाहि अंत झाल्यावाचून राहणार नाहीं असें समाजवाद्यांचें अनुमान आहे. हें अनुमान तपासून पाहण्यापूर्वी भांडवलशाही ही तत्पूर्वींच्या समाजव्यवस्थेनंतरची प्रगतीची पुढली पायरी आहे, या समाजवाद्यांच्या मताचा अर्थ प्रथम समजून घेऊं.

---

## प्रकरण ८ वें

# भांडवलशाहीपूर्वींची समाजस्थिति

भांडवलशाहीच्या पूर्वी म्हणजे जेव्हां आगगाड्या, तारायंत्रें, मोटारी, हवित्सर तोफा नव्हत्या तेव्हां मनुष्यसमाजाची स्थिति कशी होती? या प्रश्नाचें उत्तर आपणास येथें शोधलें पाहिजे. त्या वेळीं राजे, सरदार व पुरोहित यांचा जुलूम असे खरा, पण तो मुख्यतः राजधानीच्या शहरी व आसपास विशेष असे. तेथें कत्तली चालत; राज्यप्राप्तीच्या महत्त्वाकांक्षेनें वरचेवर लढाया होत व सामान्य जनतेचें जीवितहि तेथें धोक्यांत असे. पण हिंदुस्थान, चीन-सारख्या प्रचंड प्रदेशांत राजधानीसारखीं शहरें सोडून थोडें दूर गेलें कीं हा कांहींहि गलबला चाललेला नसे. कित्येक हजार एकर काळीभोर जमीन, तिच्यांतून गंगा, यमुना, कृष्णा, कावेरी अथवा यांगत्से, ऱ्हाईन, व्होल्गा अशी एकादी रम्य नदी वाहात असून तिला मिळणाऱ्या अनेक उपनद्या, ओढे-नाले यांनीं या प्रदेशास जीवनाचा भरपूर पुरवठा होई. वर्षांतून वेळोवेळीं पाऊस पडून या नद्यांस व जमिनीस पाणी मिळे. या नदीनाल्यांच्या आसऱ्यानें लहान लहान जनसमाज-अगदीं फारतर हजारपांचशें माणसें गट करून राहात. एका हिंदुस्थानांत आजहि सात लक्षांवर अशीं खेडीं आहेत. या खेड्यांत बहुसंख्य समाज शेतकरी होता. बैल, घोडे, रेडे हीं त्याचीं जिवंत हत्यारें व नांगर, कुदळ, कोयता हीं जड हत्यारें. त्याची शेती अतिशय याता-

यातीची होती. धरणींत बीं पेरून त्याचें पीक ओसरीवर आणून टाकणें म्हणजें शेतकऱ्याचा तो वार्षिक मृत्यु व पुनर्जन्म असे. शेतकऱ्याचीं बायका-मुलें त्याच्या समवेत त्याच्याप्रमाणें व शेतकरी स्वतां बैला-घोड्या-समवेत बैला-घोड्याप्रमाणें एकसारखा धरणीशीं झटापट करीत असे. तेव्हां कोठें त्याची गुजराण होण्याइतकें अन्नवस्त्र त्याच्या पदरीं पडे. त्यांतून पीक पदरीं पडेपर्यंत हजार विघ्नें ! रानडुकरें, कोल्हे व वाटमारीवर उप-जीविका करणारे सरदार त्याच्या पिकाची नासाडी करून साऱ्या सालाची मेहनत एका रात्रींतहि मातींत कालवीत. लांडगा, वाघ येऊन त्याचीं जनावरें, पोरें, बाळें व केव्हां स्वतां शेतकरी यांसहि गट्ट करीत. पण इतक्या यातायातींतून एकंदर खेंड्यास कांहीं तरी पीक पदरांत पडे.

## राजकीय व आर्थिक साधेपणा

लहानमोठ्या अलग अलग कुटुंबाचाच गांव बनला होता हें खरें. पण आप-पर भाव फारसा नव्हता. गांवाचें पीक पुष्कळ झाल्यास सार्वजनिक पेवांत त्याचा संग्रह करून चावडींत कोणाचें किती याची नोंद ठेवीत असत. शेत-कऱ्यास नांगर कुळव करून देणारा सुतार, खुर्पे, खोरें, कुदळ करून देणारा लोहार; हजामत करणारा न्हावी, तरुण शेतकऱ्याचें त्याच्या अस्तुरीशीं लगीन लावणारा भटजी, चावडींत वहीवर रेघोट्या ओढणारा कुलकर्णी, कर्ज देणारा शेटजी वगैरे अनेक लहान लहान वर्ग आपापल्या गुणानें शेतकऱ्याची चाकरी करून त्याची भाकरी खात. पैसा फारसा नव्हताच. सारा ऐनजिनसी व्यवहार. शेतकऱ्यानें खळ्यांत रास घातली आणखी तिची पूजा केली कीं भटजी झोळी घेऊन उभा. त्याची झोळी भरली कीं न्हावी, सुतार, लोहार, जो तो आपापल्या नंबराप्रमाणें व परंपरागत हक्काप्रमाणें आपलें पोतें भरून पाठीवर टाकून घरोघर रवाना होई व मग पुढील सालापर्यंत आपआपलीं हत्यारें घेऊन शेतकऱ्याच्या सेवेस सज्ज असे. राजा आणि त्याचें राज्य दूर कोठें तरी असे. निरनिराळ्या शेतकऱ्याची शीव हातांतल्या सोडग्यानें सांगणारा कांबळे पांघरलेला महार, लांडगें, कोल्हे, पोरेंसोरें आणि परकी माणूस यांवर भोंकून शेतकऱ्याचें शेत राखणारा वाघ्या कुत्रा आणि गांवांतल्या सामाजिक, धार्मिक वगैरे प्रश्नांची चर्चा करून निर्णय ठरविणारी पंचायत असें शेतकऱ्याचें जवळचें परिचयाचें

सरकार होतें. हल्लींचे अधिकारी प्रजेची राखण करणें हें आपलें कर्तव्य गुंडाळून ठेवून प्रजेचें भक्षण करतात. पण महार व कुत्रा हे अधिकारी अतिशय इमानानें शेतकऱ्याची व त्याच्या धनाची राखण करीत. आज खेड्यांत पोलीस पाहिला कीं शेतकऱ्याची पाचावर धारण बसते. पण पूर्वींच्या खेड्यांतला पोलीस–म्हणजे कुत्रा हा शेतकऱ्याच्या घरचें आणखी एक मूल होतें. मेणाहून मऊ पण वज्राहून कठिण असा तो माणूस नसूनहि सत्पुरुष होता. शेतकऱ्याच्या मुलासंगती तो खाईपिई, खेळे आणि त्यांना खेळवी व त्यांच्याच संगतींत वाढे. तीं पोरें अंगाशीं झोंबत असतांहि त्यांच्यांत पडून तो दिवसा झोंप घेई. संध्याकाळ झाली की याचें उजाडलें. मग तो वाघासारखा क्रूर होई. शेतकऱ्यांच्या खोपटास कडी ना कुलूप. पण त्याच्याभोंवतीं फिरून हा शिपाई सारी रात्र गस्त घाली आणि चोराचिलटास, कोल्हया–लांडग्यांस फिरकू देत नसे. शेतांत माल असला कीं शेतकऱ्याबरोबर हा गस्तवालाहि तेथें जाई व त्याच्या शेताचें रक्षण करी. कुत्र्याच्या या इमानीपणामुळें कायदा व सुव्यवस्था फार सुरेख नांदत असे.

गरीब, श्रीमंत असल्या फरकाचे परिणाम विशेष भयंकर असे होत नसत. समजा, एकाद्या सावकारानें अगदीं साऱ्या गांवची जमीन गहाण खाऊन मालकीची केली. तरी त्याचा फार फार काय परिणाम होईल ? सगळ्या शेतांचें धान्य त्या सावकाराचे ओटीवर जमा करावें लागेल. मग तो वाटल्यास तें आपल्या खाजगी पेवांत ठेवील. पण त्याचें काय करील ? खुद्द खेडेगांवांत चांगल्या सडका म्हणजे काय हें ठाऊकच नव्हतें आणि परगांवास जाण्यास सडका असत त्या सुमारच असत. वाहन बैलगाडी, घोडागाडी असें कांहीं तरी असे. यांनीं पेवांतील धान्य कसें, किती आणि कोठवर नेणार ? आणि तें हवें कुणाला ? ज्या त्या गांवास लागणारें पीक तो तो गांव पिकवी. पण पेवांतलें धान्य पेवांतच अनंत काल सांचविणें शक्य नव्हतें. त्याची तेथें मातीच व्हायची. मालकाला तें सगळें खाणेंहि शक्य नव्हतें. तेव्हां कर्ज म्हणून, उसनें म्हणून, नाहीं तर दीलखुष होऊन त्याला तें परत गांवास वाटून टाकावेंच लागे. कर्जाचा आंकडा तरी एका बाजूनें सारखा फुगत राहिल्यास त्याची फेड कशी व कोठून करणार ? कर्जाचा आंकडा फार फुगून गांवच्या जमिनी सावकारास गेल्या म्हणजे एक दिवस गांवकरी सावकाराच्या घरास

वेढा घालून त्यास दस्तैवज फाडून टाकावयास लावीत आणि देठ तुटलेल्या फळाप्रमाणें सगळ्या जमिनी शेतकऱ्यांस अलगद पदरांत पडत. एखाद्या अल्लाउद्दिनाची स्वारी झाली कीं गांवेंचीं गांवें ओस टाकून शेतकरी रानोमाळ पळून जात. मग हा लुटारू गेल्यावर गांवच्या पाटलास, कबुतरें हाकारून जमवावी, त्याप्रमाणें शेतकऱ्यांना परत बोलावून गांवगाडा चालू करावा लागे अशी माणसाची माणसाला गरज होती. आजचीं पार्लमेंटें, मतदारसंघ, जन्मसिद्ध हक्क, हा लोकशाहीचा डोलारा त्या काळीं नव्हता. पण पाटील, कुलकर्णी नाही तर आणखी कोणी अधिकारी जुलमी निघाला तरी त्याचें जीवित खेड्यांतील लोकांच्या स्वाधीन असे. हजारों कोसांवर असणाऱ्या अवरंगजेबाच्या सैन्याचा त्याला पाठिंबा नव्हता. जुलूम केला तर चारदोन गुंड एके दिवशीं ओढ्यानाल्यांत नेऊन आपली वाट लावतील ही त्यास भीति असे. गांवांत फळ्या असत. गुंडगिरी चाले. पण कायमचा बली कोणीच नसे. विशेष करामती माणूस मोठा होई, पुढारी होई. पण त्याचा पोर दगड निघाल्यास बापाचें मोठेपण त्यास वांशिक हक्कानें मिळत नसे आणि थोडें मिळालें तरी फार वेळ टिकत नसे.

## नैतिक व धार्मिक जीवन

गांवांत नीतिमत्ता बऱ्या प्रकारची असे. जुगार, चोरी, लबाडी थोडीफार चाले. पण धनसंचय व लोकमताविरुद्ध श्रीमंतीची प्रौढी हीं दोन्हीहि अशक्य असत. अनीतीनें द्रव्यसंचय करण्यास फारसें उत्तेजन नव्हतें. लहानपणीच लग्नें होत. बालविवाहामुळें अल्पवयांत संबंध घडून त्या काळीं लोकांच्या शरीराची हानि होई अशी कांहीं सुधारकांची समजूत आहे ती खरी नाहीं. स्त्रीपुरुष संबंध ही कांहीशी पवित्र, कांहीशी प्रेमाची व पुष्कळशी निग्रहाची बाब आहे ही समजूत दृढ होती. स्त्री–पुरुष अगदीं सरमिसळीनें वागत. कुणब्या-माळ्यांत म्हणजे बहुसंख्य समाजांत हा सरमिसळपणा आजहि दिसून येतो. शहरांतल्या पांढरपेशा वर्गांत दिसत नसला तरी खेड्यांतल्या पांढरपेशा वर्गांतहि एका गल्लींतले लहानमोठे स्त्रीपुरुष अजूनहि सरमिसळीनें वागतात. ही अगदीं जुनी सार्वत्रिक रूढि आहे. स्त्रीपुरुष यांच्यांत एकमेकांशीं अदबीनें वागण्याची रीत असे. आज जो अडमुठेपणा, अतिलज्जा अथवा मुरका दिसून येतो असें अतिकृत्रिम त्या वेळीं कांहीं नव्हतें. कामुकतेचें वय प्राप्त

झालें म्हणजे वडील माणसांच्या अनुज्ञेनें त्याची सोय होई. तो उत्सवाचा पण मर्यादशीलपणाचा, प्रेमाचा पण निग्रहाचा, भोगेच्छेचा पण त्याहून पुत्रेच्छेचा विषय असे. विवाह ही अगदीं स्वाभाविक बाब होती व वेळच्या वेळी सर्व गोष्टी सहजपणें होत असल्यानें वासनाक्षोभास फारसा वावच नव्हता. शारीरिक आरोग्य, बलिष्टपणा याचें महत्त्व होतें. खेड्याचें लुटारूपासून, हिंस्र पशूपासून रक्षण करण्याचा प्रसंग नेहमींचा असल्यानें लोकांना स्वारी शिकारीचा नाद असे. यामुळें–परचक्रापासून रक्षण करण्यास समर्थ अशी नव्हे पण–सामान्यत: आरोग्यास पोषक अशी लोकांची राहणी होतीच. या समाजांची पुढें अवनति झाली हें खरें. पण त्याचें कारण बाल-विवाहाखेरीज अन्यत्र शोधलें पाहिजे.

धार्मिकता लोकांत कितीशी होती हे सांगतां येत नाहीं. कारण धार्मि-कता म्हणजे 'देव'परायणता म्हटलें तर 'देवा'बद्दलच्या व त्याच्या शक्तीबद्दलच्या बहुसंख्य समाजाच्या कल्पना सर्व देशांत सर्व काळी मूर्ख-पणाच्या, गुलामगिरीच्या व अधोगतीस नेणाऱ्याच होत्या. कोंबडेखाऊ, बकरेखाऊ, पोरेखाऊ असे सारे देव असत. देव हा प्रेमापेक्षां भीतीचा विषय होता. जुलमी सत्ताधाऱ्याचे अंगचे सर्व गुण देवाच्या अंगीं लावण्यांत येत. देव हा शूर पण क्रूर, दरवडेखोर, व्यभिचारी, सत्य कोळून प्यालेला असाच मानला जाई. जोखाई, मखाई, शनिमहाराज हे राहोतच पण इंद्र, चंद्र, ब्रह्मदेव, महादेव यांचीहि चरित्रें पाहिलीं म्हणजे अंगावर शहारे येऊन मनास किळस वाटते. व यांची भक्ति म्हणजे अधर्मसेवाच आहे असें वाटूं लागतें. या अनेक दुष्ट देवतांच्या व त्यांच्या लबाड भक्तांच्या मगरमिठीतून जनतेस सोडविण्याकरितांच शंकराचार्य, ज्ञानेश्वर, तुकाराम, ख्रिस्त, बुद्ध यांनीं आपलें सारें आयुष्य खर्च केलें. हिंदू वेदांतानें बहुसंख्य समाजास या 'देवा'च्या गुलामगिरींतून सुटण्याचा स्पष्ट मार्ग सांगितला. ईश्वर कांहीं करीत नाहीं, 'स्वभाव' म्हणजे सृष्टिक्रम, सर्व कांहीं करतो अशी आरोळी ठोकून गीतेनें 'देवा'चा कर्तृत्वाचा सर्व हक्क हिरावून घेतला आहे. पण हा संदेश सामान्य जनतेस नीटपणें कधींच पोंचला नाही. आणि 'देव'कल्पना युगायुगांतून सर्व देशांत टिकून राहिली आहे. कोणत्याहि इतर भावनेपेक्षां या देवकल्पनेनें मानव जातीचें अधिक नुकसान केलें आहे.

धर्म म्हणजे सार्वजनिक नीतिमत्ता म्हटली तर धार्मिकतेचा दर्जा आजच्या भांडवलशाही समाजापेक्षां खास उच्च दर्जाचा होता असें म्हणण्याचें मी धाडस करतों. चोरी, चहाडी, शिंदळकी चाले खरी. पण तिला नैसर्गिक मर्यादा होती. शहरांतून यांचें प्रमाण थोडें जास्त असे. पण खेड्यांची संख्या शहरांच्या सहस्रपट होती. खेड्यांत एकादी वेश्या, नायकीण असेच. पण त्यामुळें कांहीं अवखळ वृत्तीच्या लोकांची सोय लागून गांव शाबूत राही. वेश्या, नायकिणी यांच्याहि कांहीं नीतिमत्तेच्या कल्पना असत व त्यांना समाजव्यवस्थेंत स्थान असे. नववधूचें मंगलसूत्र या अखंड सौभाग्यवतीकडून अजून खेडोपाडी करून घेतात. अगदी पातळ वस्त्र नेसून झांकलें शरीर उघडें करून दाखवावें, पूर्ण नग्न, अर्धनग्न चित्रें, पुतळे दाखवून, स्त्रियांच्या शरीराचे शृंगारिक हावभाव दाखवून चित्तक्षोभ करावा असें त्या वेळी कोणास फारसें ठाऊक नव्हतें. शिमगा हा सण जगांत सर्वत्र निरनिराळ्या स्वरूपांत आहे व तो सामान्यत: आपल्यासारखाच पाळलाहि जातो. तमाशाचा प्रकारहि सर्वत्र आहेच. या वेळीं फाजीलपणाचीं बोलणीचालणी करून पुरुषवर्ग उथळ करमणूक करून घेई. स्त्रीचा दर्जा दुय्यम व भोग्यतेचाच होता. बायकांस मारपीट होई. व्यभिचार व तज्जन्य गुन्हेहि थोडे फार होत. पण समाजांत हें सर्व निंद्य मानलें जाई व लोकमताची कदर प्रखर असल्यानें या प्रकारास सहजच आळा पडे. मोठे पुरुषहि लंगोट्या घालून खुशाल वावरत आणि साधारण पोक्त बाई चारचौघांत मुलें पाजण्यास बसे. रानावनांतून स्त्रीपुरुष मोकळ्या मनानें एकमेकांच्या खांद्यास खांदा लावून कामें करीत. कामुक प्रेमालापहि केव्हां केव्हां चालत. लिहिणें वाचणें नव्हतेंच. पण शाहीरांच्या पोवाड्यांतून भरदार वाङ्मयाचा प्रसार भरपूर होत असे. त्यांत स्त्री–पुरुष–प्रेमसंबंधाचें आदरानें व उत्सवानें वर्णन केलेलें असे. पण त्यापेक्षांहि शौर्यधैर्यादि गुणांचें कौतुक अधिक असे. आज कवी व कथाळ लेखकांच्या मुखांतून जो शृंगारनामक बीभत्सरस नद्यांच्या मापानें वाहतो आहे तो त्या वेळीं कविकुलगुरु कालिदासाच्या, जगन्नाथाच्या, भर्तृहरीच्या किंवा असल्याच एखाद्याच्या फाजील वाणींतून फाजील शृंगारविलासाचें, उन्मत्तपणाचें, हलकटपणाचें आगर जे राजदरबार तेथेंच फक्त गळे. छापण्याची कला व आगगाडी नसल्यानें त्याचे ओघळ

दूरवर खेड्यापाड्यांत पोंचत नसत. सामान्यपणें सर्वांस सारखी व बेतशीर आर्थिक अनुकूलता आणि खबरदार लोकमत असलें म्हणजे सदभिरुचि नांदणें ही सहज गोष्ट आहे. सदभिरुचीचा बिघाड करण्यांत कांहीं कलागीरांना आर्थिक व भौगिक फायदा दिसूं लागला म्हणजे सदभिरुचि बिघडूं लागते. खेड्यांत असा फायदा कोणास मिळण्यासारखा नव्हता.

## नापीक प्रदेशांतील रानटयांचें जीवन

साधारणतः सुपीक प्रदेशांत ही स्थिति होती. नापिक प्रदेशांतील जीवन याहून वाईट असे. परिस्थिति पाहून येथील लोकांनीं आपलीं बिऱ्हाडें पाठीवर घेतलेली असत. एका प्रदेशांत चरितार्थ न चालल्यास तेथील लोक आपला आटोपशीर संसार गाढवाच्या पाठीवर बांधून स्थलांतर करीत. कोठें सुपीक प्रदेश निर्मनुष्य दिसला तर तेथें स्थाइक होत. नाहीं तर फिरत राहात. यांच्यांत नीतिमत्तेच्या कल्पना सैल असून हे लूटमार करीत व स्थायिक समाजास यांचा मोठा उपद्रव असे. या चिर प्रवाशांचें जीवन अर्थातच नेहमीं संकटाचें होतें. पण त्यामुळें यांच्यांत मृत्यूचें भय कमी होतें, स्त्रिया व पुरुष सर्वजण बहुधा शूर असत. स्थायिक समाजावर यांचे हल्ले निरंतर होत आले आहेत व वेळप्रसंगीं या लुटारूंनीं स्थायिक प्रजेवर राज्यें स्थापिली आहेत. सुपीक प्रदेशांतील शेतकरी समाज हा पिकासाठीं नेहमीं एकाच जमिनीशीं झगडणारा असून या जमिनींत उगवणाऱ्या झाडाप्रमाणें पिढ्यानुपिढ्या स्थायिक असे. नापीक प्रदेशांतून सुपीक प्रदेशावर लूट करण्यासाठीं येणारा वाटमाऱ्या उत्पादनकलेंत नव्हे तर लुटण्याच्या कलेंत दुसऱ्यावर हल्ला करण्याच्या कलेंत कुशल होता. यामुळें वाटसरू झाडावरील आयतीं फळें तोडून खातो त्याप्रमाणें सुपीक प्रदेशांतील वृक्ष-सहोदर अशा कृषीवल समाजाचें धन हा फिरस्ता लुटारू खुशाल लुटून नेई. केव्हां फिरत फिरत एकाद्या सुपीक प्रदेशांत स्थायिक होण्याची यास लहर येई व सुपीक प्रदेशांतील उत्पादक प्रजेस जिंकून हा लुटारू वर्ग राज्यकर्ता होई. सारे दिल्लीचे राजवंश असे मुळचे लुटारू अथवा सभ्यपणें बोलावयाचें म्हणजे 'जेते' होते; मराठ्यांचा संसार यांच्या अर्धवट सुपीक प्रदेशांत भागत नसल्यामुळें यांनींहि कर्नाटक, गुजराथ, मध्यहिंदुस्थान, बंगाल या प्रदेशांवर धाडी घालून म्हणजे स्वाऱ्या करून पुढें हळूहळू राज्यविस्तारहि

केला. एकादा लुटारूवर्ग एकदा राज्यकर्ता झाला म्हणजे मग अर्थात् त्याचा उपद्रवीपणा त्या मानानें कमी होई व शेतकऱ्याचें सालोसालचें 'पेरावें, पिकवावें व खावें' हें संसारचक्र पुन्हां सुरळीत चाले.

प्रस्तुत यंत्रयुगापूर्वीचा हा समाज सुखी होता काय? हा एक विचार करण्यासारखा प्रश्न आहे. पण त्याचें उत्तरहि फारसें कठीण नाहीं. दुष्काळ, रोगराई, व लूटमार ही संकटें त्यांना होतींच. पण अनेक शतकें एकाच प्रकारानें शेती करून राहिल्यामुळें शेतकऱ्याच्या संकटांत सुद्धां कांहीं नियम, शिस्त उत्पन्न झाली होती. यामुळें कांहीं तजवीज व कांहीं संवय यांनीं तो या संकटांना कधीं तोंड देई आणि कधीं पाठ दाखवी. सृष्टिक्रमानें व आपल्या कर्तृत्वानें काय शक्य आहे व काय नाहीं याची अटकळ त्याची कायम झाली होती. यामुळें त्याची आकांक्षा साहजिकच शक्यतेच्या मर्यादेंतच राही. जें मिळणें शक्य त्याचीच आकांक्षा धरल्यामुळें आशाभंगाचें दुःखहि नसे. यामुळें तो कांहींसा समाधानी होता हें खरें आहे. आगगाडी नाहीं याचें दुःख आगगाडी हवीशी वाटल्यावर मग ती मिळत नाही यांत आहे. जेव्हां पायीं रखडणारास बैलगाडीहून अधिक कांही मागण्याचें सुचलेंच नसेल व बैलगाडी सहजलभ्य असेल तेव्हां आगगाडी नसल्याचें दुःख कोठून येणार? कोणी तत्त्वज्ञ म्हणतात हें अज्ञानजन्य सुख आहे तें माणसास शोभत नाहीं. जनावर होऊन खातेऱ्यांत लोळण्यांत सुख मानण्यापेक्षां मनुष्य होऊन तत्त्वविचारांत दुःख भोग णेंहि अधिक श्रेष्ठ आहे. पण जनावर सुखी आहे कीं नाहीं व त्याचें सुख त्याचे दृष्टीनें श्रेष्ठ आहे की नाहीं या बाबतींत तत्त्वज्ञाच्या पेक्षां जनावराचें मतच अधिक ग्राह्य होय.

---

## प्रकरण ९ वें

## कृषीवल समाजाचें सर्वांगीण दौर्बल्य

यंत्रपूर्वकालीन शेतकरी समाज वरील विचारसरणीनुसार सुखी होता असें मानिलें तरी त्याला जनावराच्या मापानें मोजण्याचा मात्र कांहीं उपयोग नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. कारण जनावर तें जनावर व मनुष्य

तो मनुष्य हा फरक महत्त्वाचा आहे. खातेऱ्यांत लोळण्याची संवय व त्यांतील ब्रह्मानंद जनावरास अनादिकालापासून लाभला असून तो अनंतकालपर्यंत तसाच टिकेलहि. पण माणसाचें तसें नाहीं; त्याचें जीवित चंचल आहे. जनावरास जें भक्ष्य हवें तें सृष्टींत त्यास आयतें आहे. त्याचीं आत्मरक्षणाचीं व भक्ष्य मिळविण्याचीं साधनें त्याच्या शरीरावर उगवलीं आहेत. त्याला अहंकारहि नाहीं. माणसाचें हें सर्व भिन्न आहे. स्वतांचें भक्ष्य शोधण्याची साधनें त्यास स्वत: तयार करावीं लागतात. त्यास अहंकार व तज्जन्य स्वाभिमान, इष्टानिष्ट, इच्छा, आशा, आकांक्षा, अपेक्षा, स्मृति, ओळख, कल्पकता, पूर्वसूचना, स्वातंत्र्यप्रीति वगैरे अनेक बौद्धिक व मानसिक गुण असल्यानें जनावराशीं सुखदु:ख भावनांचे बाबतींत त्याची तुलनाच होऊं शकत नाहीं. याचाच अर्थ मनुष्य तो मनुष्य व जनावर तें जनावर. यंत्रपूर्वकालीन समाज सुखी होता कीं नाहीं या प्रश्नाचा विचार करतांना, त्यास जरी एकाद्या अवस्थेंत सुख वाटणें शक्य असेल, वाटलेंहि असलें तरी ती अवस्था कितपत टिकाऊ आहे, तो ती टिकविण्यास समर्थ व स्वतंत्र किती आहे वगैरे अनेक गोष्टींचा विचार करून मग अमुक एक अवस्था इष्ट अथवा अनिष्ट असें ठरवितां येईल. या दृष्टीनें आतां यंत्रपूर्वकालीन कृषीवल समाजाचें परीक्षण करूं. [जमिनीच्या लहान लहान तुकड्यांची शेती करून राहाणारा शेतकरी समाज असा 'कृषीवल समाज' याचा अर्थ येथें अभिप्रेत आहे.]

## दुबळा कृषीवल व शूर लुटारू

रानांतील धांवतीं जनावरें एवढेंच एकदां माणसाचें भक्ष्य होतें. ती अवस्था सोडून शेती करून माणूस नांदूं लागला, त्यावेळेपासून त्याची राहणी जनावरांहून अतिशय वेगळी झाली. प्रदेश कितीहि सुपीक असला तरी धरणीशीं झगडा करून तिचें दान प्राप्त करून घेण्यांत बहुसंख्यसमाजाचा वेळ जाऊं लागला. जागेपणींचा सारा वेळ मनुष्य ज्या प्रकारांत घालवितो त्या प्रकारास अनुकूल अशाच त्याच्या संवयी, स्वभाव, सामर्थ्य व संस्कृति ही बनत असतात. शिकारीच्या आयुष्यक्रमांत माणसाच्या अंगीं असलेलें जें शौर्य, धैर्य, पराक्रम, क्रूरपणा, जुटीनें हल्ला करणें व जुटीनें आत्मरक्षण करणें हे गुण ते बैल जुंपून नांगर हाकणाऱ्या शेतकऱ्याचे अंगीं शिकाऱ्यासारखे

राहिले नाहींत. शिकारीचा रोजचा सराव सुटल्यामुळें त्याची लढाऊ वृत्ति कमी झाली. रोज नव्या प्रसंगास तोंड देण्याचें कारण न राहून वर्षानुवर्ष व असे शतकानुशतकें एकच एक प्रकारचें निवळ शरीरकष्टाचें व सावकाशीचें काम करावें लागल्यामुळें तो बुद्धीनें मद्दड आणि शरीरानें ढिला झाला.

नापीक प्रदेशांतील फिरत्या लुटारू टोळ्यांची स्थिति याहून फार वेगळी होती. त्यांचा शिकारीचा छंद सुटला नव्हता. रानोमाळ भटकतां भटकतां सुपीक शेतीचा प्रदेशहि यांस वाटेंत आढळे आणि दिसेल तें भक्ष्य पकडावें या आपल्या उपजतबुद्धीनें हा रानटी समाज शेतकऱ्यांच्या वसाहतीवर झडप घालून त्यांनीं वर्षानुवर्ष खपून पिकविलेलें अन्न तो हातोहात पळवून लावी. शेतकरी यांपेक्षा दुबळा असल्यानें त्यास या रानट्यांचा प्रतिकार फारसा कधींच करतां आला नाहीं व एकादी लहान टोळी मारपीट करून पळविली तरी त्यांचा कायमचा बंदोबस्त तो कधींच करूं शकला नाहीं. लिहिणें, वाचणें, ईश्वरविषयक व सृष्टिमूलतत्त्वविषयक विचार, कलाविकास, सदभिरुचि, नीतिकल्पना वगैरे गुण उच्च संस्कृतीचीं लक्षणें मानिली गेली. रानटी टोळ्यांत यांतलें कांहींच नव्हतें. शेतकरी समाजांत जो अल्पसंख्य असा कारागीर, पुरोहित, अधिकारी, पंडित यांचा वर्ग असे तो वरील अर्थानें सुसंस्कृत होता. आणि यांच्या अनुषंगानें बहुजन असा शेतकरी वर्ग त्यासहि या संस्कृतीचा ओलावा मिळत असे. यामुळें हा एकंदर समाजच स्वतांस मोठा सुसंस्कृत व श्रेष्ठ मानीत असे. पण यांत थोडें फार तथ्य असलें तरी दुर्बलता हें या समाजाचें फार मोठें वैगुण्य होतें यांत संशय नाहीं. स्त्री ही सुंदर, सुज्ञ व कलाभिज्ञ आहे खरी, पण सामर्थ्यांत दुबळी असल्यानें ती सगळ्या इतिहासकालांत पुरुषाची भोग्य व पुरुषाकडून रक्ष्य झाली आहे. स्त्रीदाक्षिण्यवाल्यांना हें बोलणें कसेसेंच वाटेल. पण तें झळझळीत ऐतिहासिक सत्य आहे. कृषीवल समाज हा सर्व इतिहासकालांत स्त्रीसारखा सुसंस्कृत पण दुबळा होता. यांतहि एकादा पराक्रमी वीर निपजे पण त्याची परंपरा लगेच खंडित होई.

## वेल्स, गिबन, कोंट व राजवाडे यांची मीमांसा

प्लेटो, ॲरिस्टॉटलसारखे तत्त्ववेत्ते व अलेक्झांडरसारखे वीर ज्या समाजांत निर्माण झाले त्या समाजाचें एकंदर स्वरूप पाहिल्यास उत्पादक बहुसंख्यवर्ग

गुलाम व शेतकरी होता. रोमन साम्राज्य जगभर गाजलें. पण शेवटीं जेव्हां रानटयांनी त्याचा धुव्वा उडविला तेव्हां गुलामगिरीवर हें साम्राज्य उभारलें गेल्यामुळें तें रानटयांच्या भक्ष्यस्थानीं पडलें ही गोष्ट उघड झाली. ख्रिश्चॅनिटीच्या दुबळया तत्त्वज्ञानामुळें रोमच्या साम्राज्याचा नाश झाला असें गिबनचें मत आहे. हें त्याचें मत अमान्य करून एच्. जी. वेल्स म्हणतात कीं, निवळ ख्रिश्चॅनिटीच्या शिकवणुकीनें रोमन साम्राज्य बुडालें नाहीं. "त्यांनीं ज्ञानसंवर्धनाची तरतूद ठेविली नव्हती. त्यांनीं शास्त्राचा तिरस्कार करून संपत्तीचा वडेजाव केला. श्रीमंतांच्या हातीं सत्ता देऊन पंडितांना द्रव्याच्या मापानें मोजलें. त्यांना दूरदृष्टि नव्हती, त्यांना लष्करी धोरण नव्हतें. ...." (औटलाइन ऑफ हिस्टरी).आपल्याकडे राजवाडे यांनी शास्त्राचा अभाव आणि संन्यासमार्गाची व तत्त्वविचाराची शिकवण यांनीं हे प्राचीन समाज पराभूत झाले असें मत दिलें आहे. राजवाडे म्हणतात, "उत्तमातें धरिजे। अधम तरी अव्हेरिजे। हें कांहींच नेणिजे। वसुधा जेविं॥१॥ गाईची तृषा हरूं। का व्याघ्रा विष होऊनि मारूं। ऐसें नेणें गा करूं। तोय जैसें॥२॥--पाणी, माती वगैरे अचेतन भूतांप्रमाणें बऱ्यावाइटाचें ग्रहण सचेतन मनुष्यप्राण्यांनीं सुखदुःखाकडे लक्ष न देतां उदासीन बुद्धीनें करावें असें तत्त्वज्ञान ज्या देशांत नांदूं लागलें आणि 'मी हें भाष नेणें। माझें कांहींच न म्हणे। सुखदुःख जाणणें। नाहीं जेथें.' अशी भगवद्भक्तांची ममत्वरहित अचेतन वृत्ति झाली तेथें मुसलमानासारख्या रानटी परंतु बुभुक्षु लोकांनीं राज्य करावें व सर्वस्वापहार करावा यांत कांही नवल नाहीं." राजवाडे पुढें लिहितात,-" कांहीं कालानें रामदास स्वामी अवतीर्ण झाले.त्यांनीं दासांच्या म्हणजे महाराष्ट्रांतील गुलाम बनलेल्या लोकांच्या बोधार्थ दासबोध नामक इतिहासतत्त्वनिरूपक ग्रंथाची रचना केली. मराठा तेवढा मेळवावा। मारतां मारतां मरावें।" हें व्यवहारज्ञान शिकविलें व त्यामुळें पुढें मराठयांत कर्तृत्व निर्माण होऊन महाराष्ट्राचा अभ्युदय झाला असें राजवाडयांचें म्हणणें आहे. (मराठयांच्या इतिहासाचीं साधनें खं. ६ प्रस्तावना)

यंत्रपूर्वकालीन शेतकरी समाज पराभत कां झाला याची गिबन, वेल्स व राजवाडे यांनीं आपापल्या परी दिलेली उपपत्ति पूर्णपणें निर्दोष नाहीं. ख्रिस्ताच्या शिकवणीनें रोमन लोक दुबळे झाले असें गिबनप्रमाणें म्हणावें तर ख्रिस्ताचे अनुयायी म्हणविणारीं व आज साऱ्या जगावर प्रभुत्व गाजवीत

असलेलीं राष्ट्रें ख्रिस्ताच्या शिकवणीनेंच श्रेष्ठ झालीं असें म्हणावयाचें काय ? रोमन लोकांनीं ज्ञानसंवर्धन केलें नाही, पंडितांना हीन लेखलें, त्यांना दूरदृष्टि नव्हती हें त्यांच्या नाशाचें कारण हें वेल्स यांचें मत खरें मानलें तर ज्या अर्धनग्न रानटयांनीं रोमनांचा पराभव केला त्यांना तरी पांडित्याची चाड होती काय ? अलेक्झांड्रियाची लायब्ररी जाळून टाकणारा धर्मवेडा मुसलमान कितीसा पांडित्यप्रेमी होता म्हणून तो सर्वत्र विजयी झाला ? ज्ञानेश्वर–तुकारामांनीं संन्यास शिकविला. पण दासबोध समग्र वाचणारास हें आढळून येईल कीं प्रापंचिक कर्तृत्वाच्या शिकवणीवर समर्थांनीं जितका भर दिला आहे तितकाच भर देऊन सृष्ट्युत्पत्तीचें भारूडहि दिलें आहे. मानवी जीविताचें वर्णन तर समर्थांनीं इतकें किळसवाणें केलें आहे की त्याचा मनावर होणारा परिणाम मनुष्यदेहाबद्दलच तिटकारा उत्पन्न करतो. ती शिकवण मनावर बिंबल्यास ‘नेटका प्रपंच’ करण्यास कधीच हुरूप राहणें शक्य नाही. खुद्द समर्थांची शिकवणहि समर्थांच्या मागें लोप पावली. पेशवेकालीन मराठ्यांना समर्थांपासून, फार काय शिवाजीपासूनहि स्फूर्ति नव्हती. समर्थांच्या मागून त्यांचा जो संप्रदाय शिल्लक राहिला तो भगवी वस्त्रें पेहेरून समर्थांच्या श्लोकांवर भीक मागणाऱ्यांचा. समर्थांच्या शिकवणींत कर्तृत्वाचा जोम उत्पन्न करण्याचें सामर्थ्य आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. पण त्यांचा संप्रदाय कां लोपला याचें उत्तर त्यानें मिळत नाही. आणि मग यंत्रपूर्वकालीन समाजाच्या राहणीतच त्याच्या ऱ्हासाचीं बीजें होतीं तीं नाहींशीं करण्याचें सामर्थ्य समर्थांच्या शिकवणींत अथवा तीं बीजें वाढविण्याचें सामर्थ्य ख्रिस्ताच्या शिकवणींतहि नव्हतें असें शेवटीं म्हणावें लागतें. आणि हें अगदींच स्वाभाविक नव्हे का ?

मन, बुद्धि, अहंकार यांमुळें मनुष्यदेहाला मनुष्यत्व आलें आहे हें खरेंच. पण तितकेंच हेहि खरें कीं मन, बुद्धि, अहंकार यांवर जे बरे वाईट संस्कार व्हावयाचे ते या शरीरद्वाराच व्हावयाचे. हें शरीर ज्या प्रकारच्या कर्मांत नेहमीं गढलेलें असेल त्या कर्मास अनुकूल असेच संस्कार मन, बुद्धि, अहंकार यांवर घडणार. जोंपर्यंत चरितार्थसंपादनाचा व्यवहार हा माणसाचें शरीर अहर्निश राबवून घेतो तोंपर्यंत चरितार्थसंपादनास अनुकूल असेच संस्कार मन, बुद्धि, अहंकार यांवर घडणार आणि कृपीवल

समाजाचा अर्थोत्पादन-प्रकार शरीरास थकवून टाकणारा, ज्ञानवर्धनाची गरज न ठेवणारा, सैलटपणें व चेंगटपणें वागविणारा, असा असल्यानें त्यास अनुकूल असेच संस्कार मन, बुद्धि, अहंकार यांवर होणार हें उघड आहे. या आर्थिक राहणीची पक्कड इतकी घट्ट असते कीं ज्या लुटारू टोळचांनीं कृषीवल म्हणजे शेतकरी समाजाचा पराभव करून त्यावर स्वामित्व स्थापलें व त्यांचें साहचर्य पत्करलें त्यांनाहि कृषीवल समाजाशीं अंगभूत असलेल्या दौर्बल्यानें पुढें पछाडल्यावाचून सोडलें नाहीं. खैबर घाटांतून आलेल्या सर्व लुटारू टोळचांनीं सिंधूच्या अलीकडील राजांचा पराभव करून दिल्लीस राज्यें स्थापिलीं. मराठचांसुद्धां कोणत्याहि राज्यकर्त्यास खैबर घाटांतून आलेल्या लुटारूंच्या हल्ल्यास यशस्वितेनें तोंड देतां आलें नाहीं. पण यांत विशेष गोष्ट अशी कीं जे जे लुटारू हिंदुस्थानांत येऊन स्थाइक झाले ते हिंदी कृषीवल समाजा-प्रमाणें अखेर दुबळे झाले व त्यांचा खैबर घाटांतून आलेल्या नव्या नव्या लुटा-रूंनीं पुन्हां पराभव केलाच. आशिया खंडाच्या इतिहासांत मोंगल हे फार प्रसिद्ध लुटारू होत. हिंदुस्थान व चीन या प्रचंड देशांत त्यांनी मोठमोठीं राज्यें स्थापिली. हिंदुस्थानांत मोंगलांनीं राज्य स्थापल्यावर रजपुतांस प्रथम जिंकून व पुढें त्यांचा स्नेह संपादून आपलें राज्य बळकट केलें. पण थोडीशी स्वस्थता लाभतांच त्यांस दुर्बळता आली. आणि अर्धवट सुपीकतेमुळें ज्यांना चरितार्थास पुरवणीदाखल प्रथम स्वदेशांत व पुढे परदेशांत म्हणजे परप्रांतांत मुलुखगिरी करावी लागली त्या मराठचांनी दक्षिणेंत आलेल्या अवरंगजेबाच्या सैन्यास यथास्थित चोप दिला. चीनमध्येंहि मोंगल साम्राज्याची अशीच दुर्दशा झाली.

राधामाधवविलासचंपूची प्रस्तावना लिहितांना राजवाडचांनीं आणखी खोल विचार करून रानटचांपुढें जेरीस आलेले समाज हत्याराचे बाबतींत मागसलेले होते म्हणून त्यांचा मोड झाला असें म्हटलें आहे. राजवाडे लिहि-तात, "कोणत्याहि राष्ट्राचा श्रेष्ठकनिष्ठपणा त्या राष्ट्राच्या हत्याराच्या स्वरूपावरून ओळखतां येतो. फार काय सांगावें, हत्यार हें राष्ट्राच्या एकंदर संस्कृतीचें मापक आहे. जशी ज्या राष्ट्राची संस्कृति तसें त्या राष्ट्राचें हत्यार. पशुपक्ष्यांचीं हत्यारें म्हणजे नांग्या, दांत, नखें, खूर, सोंडा, शेपटचा, पिसें वगैरे त्यांचे अवयव होत. त्याहून उच्चतर कोटींतला वानर

क्वचित् धोंडे, फांद्या, वगैरे सहजोपलब्ध बाह्य साधनांचा उपयोग करूं शकतो. त्याहून श्रेष्ठ जो अर्धवट रानटी माणूस तो गारेच्या बोथाटच्या वगैरे ओबडधोबड दगडी हत्यारें घासून तयार करतो व प्रसंगीं उपयोगी पडावीं म्हणून संग्रही जमा करून ठेवितो आणि पशुपक्ष्यांदींचा संहार करतो. त्यांच्याहून श्रेष्ठ पायरीचा आर्य माणूस खाणी खणण्याचा व त्यांतून तांबें, लोखंड वगैरे धातु काढण्याचा शोध लावितो व त्या धातूंचे भाले, बरच्या, तिरांचे फाळ, सुऱ्या वगैरे धारेची दूरवर फेंकतां येण्याजोगी हत्यारें बनवितो व केवळ आंगलट करून झोंबाझोंबी किंवा मारामारी करणाऱ्या अर्धरानटी समाजाला जिंकून गुलाम करतो. धनुर्धारी राम ह्या खनिकर्मकुशल आर्यांपैकी होता व तो आपल्या शेकडों लोखंडी बाणांनीं एतद्देशज रानटी भिल्ल, गोंड, कातकरी, राक्षस वगैरे लोकांचा नायनाट करी व त्यांपैकीं कित्येकांना शूद्र करून आपली काबाडकष्टाचीं कामें करवी. लोखंडी बाणांहूनहि दूर पल्ल्याच्या हत्यारांचा म्हणजे दारू उडणाऱ्या वेळच्या कांडांचा शोध लावणाऱ्या आर्यांनीं केवळ लोखंडी तीरानें लढणाऱ्या आर्यांचा पराभव करून आपलें रसायन–मिश्रण ज्ञान जगाच्या अनुभवास आणिलें. त्याहिपुढें मजल मारून लोखंडी नळचांत दारू भरून अर्ध्या पाव कोसावरून शत्रूचा पाडाव करणाऱ्या मुसलमानांनी ख्रिस्ती, हिंदु वगैरे कनिष्ट संस्कृतीच्या लोकांचा पराभव केला. पुढें युरोपियन लोकांनीं नाना शास्त्रीय शोधांच्या द्वारां नेमकें काम करणाऱ्या व दूरवर पल्ल्यांच्या तोफा, बंदुका, वगैरे संगीन हत्यारांच्या जोरावर मुसलमानांची युरोपांतील स्पेन वगैरे देशांतून हकालपट्टी केली व पृथ्वीवरील अमेरिका आफ्रिका, व हिंदुस्थान हे देश जिकण्याची हिंमत बांधली." पुढें "टोपीवाल्याकडून कारीगार बंदुका, तोफा व दारूगोळा मराठ्यांनीं घेतला" पण सबंध मराठेशाहींत मराठ्यांनीं तो स्वतां निर्माण कां केला नाहीं? असा आनुषंगिक प्रश्न उपस्थित करून राजवाडे त्याचें उत्तर देतात की, "उत्तम, रेखीव व नेमकें हत्यार बनविण्याची कला पैदा होण्यास शास्त्रीय ज्ञानाची जी पूर्वतयारी राष्ट्रांत व्हावी लागली ती त्या काळीं महाराष्ट्रांत नव्हती. शहाजीच्या काळीं युरोपांत डकार्ट, बेकन इत्यादि विचारवंत सृष्टपदार्थ संशोधनकार्याचे वाली जारीनें पंचभूतांचा शोध लावण्यास लोकांना प्रोत्साहित करीत होते

आणि आपल्या इकडे एकनाथ, तुकाराम, दासोपंत, निपटनिरंजन इत्यादि संत पंचमहाभूतांना मारून ब्रह्मसाक्षात्कारांत राष्ट्राला नेऊन मुक्त करण्याच्या खटपटींत होते. अशांना स्क्रू, टांचणी, बंदूक, तोफ यांचा विचार वमनप्राय वाटल्यास नवल कसचें? थोडक्यांत ऑगस्ट कोंट याच्या भाषेंत सांगावयाचें म्हणजे महाराष्ट्र त्या वेळीं मेटॅफिझीकल ('आधिदैविक') अवस्थेंत होतें आणि पॉझिटिव्ह ('आधिभौतिक') अवस्थेंत येण्यास त्याला अद्याप पांचशें वर्षें अवकाश होता. म्हणजे शक २००० च्या सुमारास महाराष्ट्र (आधिभौतिक) पॉझिटिव्ह बनणार होतें". येथें हें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं हें सर्व विवेचन केवळ मराठ्यांनाच लागू नसून युरोपीयांच्या दिग्विजया-पूर्वीच्या एकंदर मानव समाजास सामान्यतः लागू पडतें, असा राजवाड्यांचा आशय आहे.

हें विवेचन अजूनहि सदोष आहे. ज्यास मागें आपण कृषीवल समाज म्हटलें व जो हत्यारांत मागसलेला होता कारण तो "आधिदैविक" काळांत असल्यानें त्यावर नैराश्योत्पादक तत्त्वज्ञानाचें दडपण होतें असें राजवाडे म्हणतात, त्याचा पराभव एकट्या शास्त्रवेत्त्या युरोपियांनीच केला नाहीं. मोगल, तार्तर, हूण वगैरे रानटी टोळ्यांनीं जगांतील सर्व कृषीवल समाज वेळोवेळीं जिकले होते. खुद्द महाराष्ट्रहि अल्लाउद्दिनानें जिंकला होता. हे 'आधिदैविक' युगांतले कृषीवल समाज ज्या रानट्यांनीं जिंकले ते कोणच्या तरी अर्थानें 'पॉझिटिव्ह' म्हणजे भौतिक शास्त्रांत पारंगत होते काय? कोंटनें आपल्या 'पॉझिटिव्ह फिलॉसफी' या निबंधांत मानव समाज थिऑलजी ('धर्म'), मेटॅफिझिक्स ('आधिदैविक') व पॉझिटिव्ह ('आधिभौतिक') या अवस्थांतून 'उन्नत' होत येत असतो असें म्हटलें असून पॉझिटिव्ह यांत तो एकोणिसाव्या शतकांतील भौतिक शास्त्रें व औद्योगिक उत्पादन यांचा समावेश करतो. या निबंधांतूनच राजवाड्यांनीं कोंटचें हें मत येथें उद्धृत केलें असावें. आतां कोंटचा हा मानवविकासक्रम जर खरा म्हटला तर प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, आधिभौतिक युगांतील कृषीवल समाजाचा पराभव करणारे रानटी लोक आगगाडी—तारायंत्र जाणणारे या अर्थानें पॉझिटिव्ह ('आधिभौतिक') होते कीं काय?' तसें नसेल तर कोंटच्या विकासक्रमांत त्यांचें स्थान कोणतें? ते 'थिऑलॉजींत ('धर्म') होते म्हणावें तर त्याहून वरची पायरी जी

'मेटॅफिजिकल' ('आधिभौतिक') अवस्था, तींतील लोकांचा पराभव सरसहा सर्वकडे त्यांनी कसा केला ? तसेंच ख्रिस्ताचें निराशामय तत्त्वज्ञान गुंडाळून ठेवून त्याचे भक्त आज जगांत चक्रवर्ती झाले आहेत असें म्हटलें तरी ज्ञानेश्वर, तुकाराम, आम्हांसहि कां गुडाळून ठेवतां आले नाहींत हा प्रश्न उरतोच. उलट रामदासहि काखेंत मारून, मना सज्जना भक्तिपंथेंच जावें। म्हणून आम्ही प्रतिष्ठित भिकाऱ्यांचा संप्रदाय कां काढला? या सर्व प्रश्नांचीं उत्तरें राजवाडे व कोंट या दोहोंच्याहि उपपत्तीनें मिळत नाहींत.

यंत्रयुगापूर्वीचा कृषीवल समाज दुर्बल असण्याचें खरें कारण या प्रकरणाचें आरंभीं विवेचिल्याप्रमाणें कृषिकर्म म्हणजे शेतीचा व्यवसाय हा बहुसंख्य समाजाच्या शक्तीचा व वेळाचा फार मोठा भाग खर्चीत होता आणि शेतकऱ्यास शरीरानें ढिला, मनानें लुला व बुद्धीनें मूढ बनवीत होता हें आहे. आसपासच्या शेतावर ज्यांची गुजराण होईल तेवढींच माणसें खेड्यांत राहूं शकत. वाहतुकीचीं साधनें व प्रचंड शेतीचीं अवजारें नसल्यानें शेतीचे तुकडे लहान असत. यामुळें खेडीं अंतराअंतरावर राहून लूटमार करणाऱ्या टोळ्यांपासून एका खेड्यास उपद्रव झाला तरी दुसऱ्यास वेळींच कुमक पाठविणें कधींच शक्य होत नसे. लढाई व लूटमार करणें हा व्यवसाय ज्या नापीक प्रदेशांतील मोगल, हूण, तार्तर यांना चालवावा लागला त्यांना उत्पादनकला फारशी अवगत नव्हती. त्यांनीं कृषीवल समाजांना लुटलें, जिंकलें व त्यांवर राज्यें केलीं. पण राज्य स्थापून कृषीवलाशी साहचर्य करतांच तेहि उत्पादक झाले. त्यांच्या तरवारी जाऊन नांगर हातीं आले. स्थानिक शेतकऱ्यांत ते सरमिसळ होऊन त्यांच्याप्रमाणें आपणहि दुर्बल बनले व पुन्हां दुसऱ्या रानट्यांनीं केलेल्या स्वाऱ्यांत पराभूत होऊन त्यांचे गुलाम बनले. शालिवाहनाचें मातीचें सैन्य नर्मदेंत उतरलें तसतसें विरघळून वाहून गेलें, तसेंच हे रानटी लुटारू कृषीवल समाजांत ज्या ज्या वेळी येऊन मिसळले त्या त्या वेळीं ते त्यांच्याच सारखे दुबळे झाले. यंत्रयुगापूर्वीच्या साऱ्या मनुष्यसमाजाचा जगभर हाच इतिहास आहे असें दिसतें.

कृषीवल समाजाचें दौर्बल्य त्याच्या कृषिपद्धतींत शोधण्याचें व तेथेंच तें सांपडण्याचें कारण मागें म्हटल्याप्रमाणें हेंच कीं सृष्टीपासून चरितार्थसाधनें

—अन्न, वस्त्र वगैरे साधनें—मिळविणें यांतच माणसाचे सर्व श्रम व वेळ आजवर खर्ची पडला आहे. आणि अर्थात् या खटाटोपास अनुकूल असेच संस्कार त्यावर घडले आहेत. कोणत्याहि समाजाचा संपत्त्युत्पादन प्रकार कळला असतां सामान्यतः त्याची राहणी व संस्कृति कळून येते असें म्हणण्यास कांहींही प्रत्यवाय नाही. एंजल्स म्हणतोः—" माणसास राजकारण, शास्त्र, धर्म, कला इत्यादींची गोडी लागण्याचे आधीं अन्न, पाणी, वस्त्र व आश्रय यांची जरूरी असते. यांमुळें अत्यवश्य वस्तूंचें उत्पादन व त्यांस उपयुक्त अशी झालेली समाजाची मांडणी या भूमिकेवर तदनुरूप राज्यसंस्था, कला व धर्म यांची उभारणी होत असते. नेहमीची पद्धति अशी आहे की, राज्यसंस्था, कला, धर्म यांवरून उत्पादनप्रकार, समाजव्यवस्था कशी आहेत हें ठरवितात. पण खरोखर उत्पादनप्रकार हाच सर्वांचा नियामक असून त्यावरूनच माणसाची राहणी व संस्कृति समजून येते."

## उत्कर्षकारक उत्पादन—प्रकार कोणता

मनुष्याच्या आधिभौतिक उत्कर्षास व मानसिक व बौद्धिक उन्नतीस कोणत्या तऱ्हेचा उत्पादन—प्रकार आवश्यक आहे असा प्रश्न विचारून त्याची चर्चा करण्याचा येथें प्रयत्न करूं. आज ज्याला आपण अत्यंत नीच असा उत्पादन-प्रकार म्हणूं तो म्हणजे गुलामगिरी—गुलामांकडून सक्तीनें संपत्ति निर्मिणें— हा प्रकार समाजसुव्यवस्थेस अत्यवश्य आहे, असें ॲरिस्टॉटलनें म्हटलें आहे. एवढा जगद्वंद्य तत्त्ववेत्ता असें धाडसी विधान करतो त्याचें विशेष कारण आहे. ग्रीक लोकांत नागरिक व गुलाम असे वर्ग होते. जमिनीची मशागत करून ती पिकवून भोग्य संपत्ति निर्मिणें हें अतिशय कष्टाचें काम गुलाम करीत असत. आणि नागरिक हे गुलामांनीं निर्मिलेले भोग्य पदार्थ सेवून राजकारण करीत व बौद्धिक उन्नति करून घेत. माणसाची बौद्धिक उन्नति होण्यासाठीं त्यास आवश्यक संपत्तीची सुबत्ता व रिकामा वेळ यांची गरज आहे. जीवनास आवश्यक वस्तूंची प्राप्ति पुरेशी न झाल्यास माणसाच्या शारीरिक व मानसिक शक्तींची वाढ खुंटून त्यांचा नाश होत जाईल. तसेंच आवश्यक संपत्ति पुरेशी मिळूनहि शरीर थकून पडे तोंवर त्यास कष्ट करावे लागल्यास जीवनशक्ति कर्मेंद्रियांचे कामीं खर्च होऊन बुद्धिदीपास तेलच मिळणार नाहीं. हजारों वर्षें मनुष्य धरणी ही माता समजला. पण ती अशी नाठाळ

असल्याचा अनुभव त्यास आला आहे कीं, माणसाची श्रम करण्याची सर्व शक्ति आपल्या सेवेस घेऊनच तिनें त्यास पोषक द्रव्यें दिलीं आहेत. यंत्र-युगापूर्वीची शेतीप्रधान समाजव्यवस्थाहि मानवास हजारों वर्षांच्या यातायातींनीं प्राप्त झाली आहे. सुपीक प्रदेश म्हणून आपण ज्यांचें वर्णन करतों ते प्रदेश घनदाट जंगलें, हिंस्र पशु, विषवल्ली यांनीं एका काळीं व्याप्त असून या परिस्थितीशीं झकडून झगडूनच माणसानें आपल्या जीवनाची सोय केली आहे. सृष्टि ही त्याची माता नसून त्याची वैरीणच ठरली आहे. वाघ-सिंहांना शस्त्रास्त्रासहित जन्म मिळाला. मनुष्य हा सृष्टि या राक्षसीसमोर निःशस्त्र उभा आहे. पण इतर प्राण्यांस नाहीं असें एक शस्त्र त्यास प्राप्त झालें आहे. तें म्हणजे बुद्धि, कल्पकता. मधमाशी जें पोवळें बांधते तें अतिशय कारागिरीचें काम आहे. पण लक्षावधि वर्षें ती तें एकच एक कसब दाखवीत आहे. माणसानें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें रोज नवी चीज निर्माण केली आहे. सृष्टीशीं झगडून आपलें जीवनसाहित्य मिळविण्यासाठीं माणसानें सृष्टींतून हत्यार निर्माण केलें, ही त्याच्या बुद्धीची पहिली फार मोठी कमाई होय. मनुष्य हा हत्यार करणारा प्राणी आहे असें फरांक्लिन म्हणतो. यांत त्यानें इतर सर्व प्राण्यांहून माणसाचें ठळक श्रेष्ठत्व दाखविलें आहे. बुद्धीमुळेंच माणसास हत्यार करतां आलें. या बुद्धीची तीक्ष्णता, करामत, जसजशी वाढेल तसतसा मनुष्य नव्या नव्या युक्त्या योजून सृष्टीवर अधिकाधिक प्रभुत्व मिळवितो. बौद्धिक प्रगति जसजशी अधिकाधिक होत जाईल तसतशी त्या प्रगतीसाठींच सांपत्तिक सुबत्ता व फुरसतहि त्यास हवी असते. पण हा स्वस्थ बसला तर मग सृष्टीशीं झगडून याचें पोषण कोणीं करावें ? ॲरिस्टॉटलचें म्हणणें असें कीं, जर समाजांत निदान कांहीं बुद्धिमान व विचारी माणसें राहणें अवश्य आहे तर बाकीच्यांनीं जिवापाड कष्ट करून व सृष्टीशीं झगडून यांना संपत्ति पुरविली पाहिजे. पण सृष्टीशीं झगडण्याचें अतिकष्टाचें काम कोणी खुषीनें करणार नाहीं. अर्थात् बहुसंख्य समाजास गुलाम करून, त्यावर कोरडे ओढून त्याजकडून संपत्तिनिर्मितीची यातायात करविली पाहिजे.

ॲरिस्टॉटलच्या प्रयत्नानें माणसास सृष्टीवर प्रभुत्व मिळविण्याचे कामीं किती मदत केली हें माहीत नाहीं. पण एक गोष्ट खरी कीं, माणसाच्या

बौद्धिक शक्तीचा विकास होण्यासाठीं त्यास कमी यातायातीनें सृष्टीकडून अधिक दान मिळणें जरूर होतें. कृषीवल समाज अथवा रानटी समाज हे या दोनहि दृष्टींनीं पंगुच होते. ज्या वेळीं दोघांचें वैर असे त्या वेळीं कृषीवलाची संपत्ति रानटचे लुबाडीत अथवा तिची नासधूस करीत व सृष्टीवर अधिकाधिक प्रभुत्व मिळवून तीपासून कमी श्रमांत अधिक दान मिळविण्याच्या प्रयत्नास अवसर नसे. बरें; रानटी वर्ग ज्या ज्या वेळीं कृषीवलांत मिसळला तेव्हां तोहि त्याच्या सारखाच सृष्टीशीं झगडण्याच्या कामास आला. येथें व्हायला हवें होतें तें हें कीं रानटयांची पराक्रमशीलता व कृषीवलाचा कष्टाळूपणा यांचा योग्य संयोग होऊन सृष्टीशीं झगडा करण्याचें त्यांचें सामर्थ्य वाढावयास हवें होतें. इंग्लंडांत मध्ययुगाच्या शेवटी भांडवलशाही सुरू झाली, तेव्हां हा सुफल संयोग घडून आला. मोंगल, तार्तर, हूण—आणि मध्ययुगीन युरोपीय सरदारहि यांतच जमा—यांनीं कृषीवल समाजास जिंकून त्यांची लूट केली. त्याचप्रमाणें भांडवलवाल्यानें मजूरास बाजारांत गांठून त्याला भुकेच्या चिमटयांत पकडून कारखान्यांत खेचलें व त्यापासून वाढावा पिळून घेतला. पण रानटयांनीं अथवा सरदारांनीं आपली लूट खाऊन पिऊन उरलेली नासून टाकली. तसें न करतां भांडवलवाल्यानें वाढावा जतन करून त्यापासून अधिक कच्चा माल, अधिक हत्यारें, अधिक मजूर खरेदी केले. यामुळें संपत्तीच्या वाढीचा वेग वाढला. त्यानें सहकार्य व श्रमविभाग यांस पुढें यंत्राची जोड देऊन संपत्त्युत्पादनाचा वेग आणखी वाढविला. संपत्ति वाढली, सांचूं लागली तशी ती पुनःपुनः पुढल्या वाढीच्या कामीं आली. राजकीय स्वास्थ्य मिळाल्यानें निवळ लूटमारीची भीति नाहींशी झाली व संपत्त्युत्पादनाच्या खटाटोपास उत्तेजन मिळालें. बुद्धिमंतांना दैनंदिन उत्पादनाच्या खटाटोपांतून सवड मिळून त्यांनीं सृष्टीवर वाढता विजय मिळविण्यासाठीं शास्त्रीय संशोधन केलें. हत्यार सुधारण्याच्या प्रयत्नास एकदां गति मिळतांच मजूरांनींहि कित्येक शोध लाविले. शेतीच्या लहान तुकडयांचें एकीकरण होऊन व त्यास शास्त्राची मदत मिळून शेतीचें पीकहि वाढलें.

मालाचे ढीग निर्माण झाल्यावर त्यांना दूरदूरच्या बाजारांची गरज उत्पन्न झाली. निवळ खटाऱ्यांनीं व नावांनीं न होणारें असें हें काम

करण्यास आगगाडी, आगबोटी पुढें आल्या. प्रचंड महासागर व प्रचंड डोंगर, पर्वत यांची दुर्लंघ्यता नाहींशी झाली. उत्पादक यंत्रें व शास्त्रीय ज्ञान हीं एका देशांतून दुसऱ्या देशांत याप्रमाणें जगभर पसरलीं. पूर्वी पोटांत रसरसलेली भूक शमविण्यासाठीं कडक थंडीवाऱ्यापासून आपलें रक्षण करण्यासाठीं जिवापाड श्रम करावे लागून बहुसंख्य समाज तहानभुकेच्या साखळदंडांनीं सृष्टीस जखडला होता व अल्पसंख्य समाज त्याची लूट करीत असून त्याची व पर्यायानें आपलीहि सृष्टीच्या गुलामगिरींतून सुटका करूं देत नव्हता. ही हजारों वर्षें न पालटलेली स्थिति सूर्योदय होऊन १२ तासांचा अंधार पाव तासांत नाहींसा व्हावा त्याप्रमाणें भांडवलवाल्यांच्या उदयानंतर एका शतकांत पालटली. भांडवलवाल्याचा मजूर भुकेच्या सांखळीनें जखडला होताच व अजून आहेहि. पण तो सृष्टीस नव्हे; भांडवलवाल्याच्या हातीं त्याची लगाम आहे. ही लगाम त्यानें सृष्टीइतक्याच निर्दयतेनें खेचली, पण त्यायोगानें मजूराची म्हणजे श्रम करणाऱ्या अखिल मानवजातीची उत्पादन-क्षमता वाढली. माणूस सृष्टीचा गुलाम होता तो आतां तिचा स्वामी झाला आहे, नव्हे––सृष्टीचा त्यानें स्वामी व्हावें हें शास्त्रीय व यांत्रिक प्रगतीमुळें शक्य झालें आहे इतकें तरी खरें आहे. अजून एकमेकांचे गळे कापण्याची त्यांची खोड गेली नाहीं हें उघड दिसत आहे. ती कशी जाईल हें पुढें पाहूंच. आज माणसाची सांपत्तिक ददात संपली नाही हेंहि खरेंच. पण त्याचें कारण माणसाचें उत्पादनसामर्थ्य कमी आहे हें नव्हे. सृष्टी पान्हा सोडीत नव्हती तो तिनें आतां भरपूर सोडला आहे. कांहीं कृत्रिम अडचणींमुळें आपणास तिचें दूध मिळत नसावें असें दिसतें.

पण यांत्रिक व शास्त्रीय शोधांनीं माणसाची उत्पादनशक्ति–सृष्टीशीं झगडण्याची शक्ति अपरंपार वाढली व सृष्टीचा गुलाम राहण्याची गरज यापुढें त्यास राहिली नाहीं हें निश्चित. ॲरिस्टॉटलच्या काळीं माणूस माणसाचा गुलाम होता. कारण प्रथम सर्वच माणसें सृष्टीचीं गुलाम होतीं. हें गुलामगिरीचें ओझें ॲरिस्टॉटलसारख्या कांहीं थोड्या लोकांना, इतरांवर अधिक लादून, चुकवितां येत असे. आज माणसास सृष्टीचा गुलाम राहण्याची गरज संपली. अजूनहि माणूस माणसाचा गुलाम राहिला असल्यास त्याचें सृष्टीहून अन्य कांहीं कारण असेल.

सृष्टीच्या गुलामगिरीतून यांत्रिक व शास्त्रीय शोधांच्या साह्यानें माणसास मुक्त करण्याचें हें कर्तृत्व भांडवलवाल्यांनी निर्लोभानें केलें नाहीं. हें सात्त्विक कर्तृत्व नव्हे, हें खरें. फलासक्त, लोभी, नीतिअनीतीस न जुमानणारा, क्षणांत हर्षभरित, क्षणांत खिन्न होणारा असा हा रजोगुणी कर्ता होता यांत मुळीच संशय नाही. पण रानटयाप्रमाणें अथवा मध्ययुगीन सरदाराप्रमाणें भांडवलवाला हा नुसताच विध्वंसक, दांडगा, मूर्ख असा तामस कर्ता नव्हता; त्याहून श्रेष्ठ होता व आपल्या राजस कर्मानें मानवाच्या उन्नतीस त्यानें चांगलीच मदत केली आहे यांत संशय नाही. या दृष्टीनें मानवविकासाच्या इतिहासात त्यास महत्त्वाचें स्थान आहे. 'भांडवलशाहीचे शास्त्रोक्त पद्धतीनें दोष दाखवून तिच्या नाशास लोकांना प्रवृत्त करणारा जर्मन तत्त्ववेत्ता व क्रांतिकारक कार्ल मार्क्स भांडवलशाहीचें इतिहासात कोणतें स्थान आहे हें सांगतांना कॅपिटलमध्यें लिहितो, "भांडवलवाल्याचें ऐतिहासिक महत्त्व व समर्थन हें आहे कीं मानवजातीस त्यानें आपल्या पोटापुरताच नव्हे तर बाजारांत रत्नण्यासाठी माल ( प्रॉडक्शन फॉर प्रॉडक्शन्स सेक ) निर्माण करावयास लाविलें. याचें फल म्हणजे समाजाची उत्पादनशक्ति वाढली आणि यामुळें विकासक्रमांतील वरचा दर्जा समाजास प्राप्त होण्यास अवश्य अशी भौतिक परिस्थिति निर्माण झाली. या वरच्या दर्जाचे जें मुख्य तत्त्व व लक्षण की, व्यक्तीची पूर्णपणें व अनिरुद्धपणे उन्नति होणें तें आतां शक्य झालें आहे."

## सर्व जगभर एकच अनुभव

यंत्रपूर्वकालीन कृषीवल समाज व त्यांतच समाविष्ट होणारी मराठेशाही कां बुडाली याचा उलगडा आतां सहज होतो. मराठ्यांत राष्ट्रीय बुद्धि नव्हती, त्यांच्यांत सहकार्य करण्याची आवड नव्हती, त्यांना संस्था चालवितां येत नव्हत्या व शेवटीं त्यांचें हत्यार कारीगार नव्हतें. हें सर्व आपापल्यापरीं खरेंच आहे. पण आफ्रिका, ईजिप्त, तुर्कस्थान, इराण, हिंदुस्थान, चीन व अमेरिका इतक्या विस्तृत भूप्रदेशांत भांडवलवाल्यांनीं धुडगूस घालून सर्वत्र जुनी समाजव्यवस्था मोडून नवी निर्माण केली तेव्हां या सर्व ठिकाणच्या समाजांच्या नाशास त्यांच्या अंगचे कांहीं सर्व देशांत सामान्य असे अवगुणच कारण झाले असेंच म्हणावें लागतें. आणि हें कारण म्हणजे या सर्व समाजांचें दौर्बल्य हें होय.

संपत्त्युत्पादनाच्या कामीं हे सर्व समाज सृष्टीचे गुलाम असून, उत्पादन-शक्तीत श्रेष्ठ झालेले, शास्त्रीय शोध व संघटना यांनीं सृष्टीवर प्रभुत्व पावलेले भांडवलदार उत्तम उत्पादक व उत्तम जेतेहि ठरले आणि त्यांच्या हल्ल्यापुढें उन्हानें बर्फ वितळावें त्याप्रमाणें जुनी समाजव्यवस्था मोडून पडली हें सहजच झालें. डाक्याची मलमल व आग्ऱ्याचा ताजमहाल यांचें आपण कौतुक करतों. पण त्या काळीं बहुसंख्य समाजास चंद्रमौळी घरांत राहावें लागत असून लंगोटी-पुरतें वस्त्र कसेंबसें मिळूं शके हें पाहिलें म्हणजे आज ढिगाचे ढीग कापड निर्माण करूं शकणाऱ्या माणसापुढें त्या वेळचा मनुष्य किती दुर्बल होता हें सहज लक्षांत येतें.

भांडवलवाल्याची उत्पादनपद्धति श्रेष्ठ यामुळें त्याचें युद्धकर्तृत्वहि तसेंच श्रेष्ठ ठरलें आहे. रोमन साम्राज्याचा व संस्कृतीचा रानटयांनीं नाश केला. तसाच अठराव्या शतकाच्या अखेरीस उन्नति पावलेल्या युरोपीय संस्कृतीचा नाश रानटी लोक पुन्हां करतील याचा धाक गिबनला पडला होता. रानटयांना नौकानयनाची कला अवगत नव्हती. तेव्हां युरोपवर रानटयांचा हल्ला आलाच तर सर्व युरोपीयांनीं जहाजांत बसून अमेरिकेंत पलायन करावें तेथें आपल्या संस्कृतीची निर्वेधपणें वाढ करावी असा उपाय गिबननें सुचविला होता. पण अठराव्या शतकाचे अखेरीस ज्या यंत्रप्रधान भांडवलशाहीस अल्पारंभ झाला होता तिचें युद्धसामर्थ्य पुढें इतकें वाढलें कीं भांडवलवाल्यांच्या बंदुकीपुढें व तोफांपुढें जगांतील कृषीवल समाजा-प्रमाणें सर्व रानटी समाजहि सपशेल पराभूत झाले. एका हातांत तागडी व दुसऱ्या हातांत बंदूक घेऊन भांडवलवाल्यानें आज दिग्विजय केला असून सर्व जगांतील राजकीय व आर्थिक क्षेत्रांतहि प्रभुत्व मिळविलें आहे. भांडवलवाल्यांचे आपसांत जयापजय होतात, त्यांतहि ज्यांची भांडवलशाही अधिक श्रेष्ठ त्यांचा जय होतो. बिनभांडवली राष्ट्रांनीं भांडवलवाल्याचा पराभव केल्याचें तर इतिहासांत उदाहरणच नाहीं. भांडवलवाल्यांविरुद्ध बिनभांडवलवाल्यांची संख्या केवढीहि मोठी असो, ती लांडग्यासमोर मेंढ्या-सारखी ठरते. हिंदी—इंग्रज, चिनी—जपानी, रशियन—जपानी, हे सर्व लढे वरील सिद्धांतच सिद्ध करतात.

ज्या काळीं आगगाडी, तारायंत्र, छापखाना हें कांहीं नव्हतें त्या वेळीं

हिंदुस्थानसारख्या अफाट देशांत राष्ट्रैक्यबुद्धि, लोकशाही, असें कांहीं असतें तरच आश्चर्य. खेड्यांमध्यें पंचायतीचें पार्लमेंट होतेंच होतें. पण सार्वराष्ट्रीय पार्लमेंट आगगाडी, तारायंत्र व छापखाना यांवाचून होऊंच शकत नाही. एका अवाढव्य देशांत मुदतबंदीनें नोकर नेमून त्यांच्या द्वारां एका शिस्तीनें व कदरीनें वर्षानुवर्ष व असा शंभर वर्षें कारभार हाकणें, हें आगगाडी, आगबोट, गिरणी, छापखाना, तारायंत्र, मशिनगन, आणि यांच्या साहृयानें कर्तृत्व गाजवितांना अंगीं अवश्य असणारी व येणारी शिस्त, टापटीप, हिशेबीपणा, दूरदृष्टि, कवाईत, जमावानें काम करण्याची संवय, यांच्या वाचून शक्यच नव्हतें. मराठ्यांच्या राज्यकारभारांत शिवाजीमागून सर्वत्र आनुवंशिकपणा शिरला व उत्तरेंत गेलेल्या मराठ्यांनीं सवता सुभा निर्माण केला हें त्या वेळच्या साधनांत शक्य होतें तसेंच झालें. इतर जगांत भांडवलशाहीचीं साधनें नव्हतीं तेव्हां सामान्यतः असेंच घडलें आहे. लोक आधिदैविक युगांत होते, भोळे होते, भक्तिमार्गी होते, चमत्कारावर विश्वास ठेवणारे होते हें सर्व खरें. पण तें सर्व जगभर सर्वत्र होतें व स्वाभाविक होतें. भौतिक सृष्टिनियम म्हणून कांही आहेत याचा ज्यांना गंध नाहीं, ज्याला एक अर्ध्या एकर एवढ्या लहान जमिनीच्या तुकड्यांत वारा, पाऊस, आग, धरणीकंप अशा अनिश्चित शक्तींच्या लहरीप्रमाणें मिळेल ती ओलीकोरडी भाकर खाऊन नाहीं तर उपाशी पडून राहावें लागे, ज्याला रानट्यांनीं, सरदारांनीं, पुरोहितांनीं व फुकटखाऊंनीं कधीं मदत न करतां सदा लुटलें मात्र, तो जीविताविषयीं निराश आणि सृष्टिशक्तीपुढें हताश असला व सृष्टीवर प्रभुत्व मिळवून पराक्रमी होत्साते जग जिंकीत चाललेल्या भांडवलवाल्यांच्या हल्ल्यापुढें पहिल्या धडाक्यास पराभूत झाला तर यांत कांहीं आश्चर्य नाहीं. राजवाडे विचारतात, मराठ्यांनीं लांब पल्ल्याची तोफ कां केली नाहीं ? याचें उत्तर मराठे आधिदैविक युगांत होते हें नव्हे. लांब पल्ल्याच्या तोफा होण्यास कोळशाच्या व लोखंडाच्या खाणींचा उसपा होऊन लोखंड व पोलाद यांचे यांत्रिक कारखाने सुरू होणें जरूर होतें व त्यासाठीं भांडवलशाही निर्माण व्हावयास पाहिजे होती. मनुष्य संपत्त्युत्पादनाचा व्यवसाय करतो त्यांतच त्यास साजेशी व त्यांत शक्य अशी युद्धसामग्री निर्माण करतो. कृषीवल समाजास पोलादी यंत्रांच्या कारखान्यांत तयार होणारी तोफ निर्माण करणें

शक्यच नव्हतें. भांडवलशाहींतील उत्पादनपद्धति, युद्धकला, युद्धसामुग्री, समाजसंघटना व व्यक्तिगुण हीं सर्व कृषीवल समाजापेक्षां अधिक श्रेष्ठ होतीं. यामुळें भांडवलशाहीपुढें कृषीवल समाजाचा नाश झाला. मराठ्यांनीं जपानी लोकांप्रमाणें यांत्रिक उत्पादनाची थोरवी ओळखली असती तर ते भांडवलशाही पत्करून इंग्रजांपुढें टिकाव धरून राहतेहि; मग पुढें जपान्याप्रमाणें वैभवासहि चढले असते. पण त्या वेळच्या चोहीकडून अडचणींनीं घेरलेल्या परिस्थितींत इतकें स्वास्थ्य त्यांस लाभलें नाही आणि आपल्या अडचणींच्या गुताघ्यांत ते धडपडत असतांच इंग्रजी भांडवलशाहीचा लोंढा एकदम अंगावर आला तेव्हां इतर जगभर घडलें त्याप्रमाणेंच मराठ्यांचें कृषीवल राज्य व कृषीवल समाज भांडवलशाहीच्या महापुरांत वाहून गेला.

## मार्क्स व एंजल्स यांचें मत

हिंदुस्थानात या वेळी भांडवलशाही उत्पन्न होणें अपरिहार्यच होतें. स्वदेशी भांडवलशाही कोणत्याहि कारणांनी होऊं शकली नाही तर कृषीवलपद्धतीच्या उत्पादनांतून हिंदी लोकांस सोडविण्यास परदेशी भांडवलशाहीहि येणें आवश्यक व अपरिहार्यहि होतें. या विदेशी भांडवलशाहीनें येथें अनर्थ माजविला व जनतेस दुःखाच्या खाईत लोटलें. आतां ही लाट उलटविली पाहिजे हें सर्व खरें. पण जें झालें तें इतिहासक्रमप्राप्त व त्यांतल्यात्यांत प्रगतीच्या वाटेवरच नेणारें आहे हें खास. इंग्रजांच्या हिंदुस्थानांतील चढाईसंबंधी 'न्यूयॉर्क डेली ट्रिब्यून ' मध्यें १८५३ साली लिहिलेल्या लेखांत मार्क्स लिहितो, "हिंदुस्थानावर पसरत असलेल्या ब्रिटिश राज्यामुळें तेथील उद्योगी व शांतताप्रिय कौटुंबिक समाज विस्कटले जाऊन त्यांच्या चिंधड्या होत आहेत, समाजबंधनें विस्कटून मोकाट झालेल्या व्यक्तींची प्राचीन संस्कृतीच नव्हे तर परंपरागत धंदेहि बुडविले जात आहेत आणि ही माणसें दुःखाच्या गर्तेत लोटली जात आहेत, हें सर्व पाहून मनास हळहळ वाटते. पण आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं ही कृषीवल पद्धतीची ग्रामसंस्था (आयडिलिक व्हिलेज कम्युनिटी) पौर्वात्य देशांतील सुलतानशाहीचा शेकडों वर्षे आधार झाली आहे. या संकुचित समाजव्यवस्थेमुळेंच या लोकांची दृक्कक्षा अगदीं संकुचित झाली. ते जुन्या संवयी, चालीरीति व भोळ्या समजुती यांचे गुलाम झाले. यामुळें त्यांच्यांत असेल नसेल तो मोठेपणा लोपून

जाऊन ऐतिहासिक क्रमानें विकसत जाण्याचा जोमहि त्यांच्यांत राहिला नाहीं. आपण हें लक्षांत घेतलें पाहिजे कीं हे लोक टीचभर जमिनीच्या तुकड्याच्या मूर्ख अहंकारांत गुरफटून जाऊन राज्यांच्या उलथापालथी, सबंध गांवांच्या कत्तली, असे भयंकर अवर्णनीय प्रकार शांतपणें पाहात राहिले. अगदी सामान्य सृष्टिक्रमाहून यांत त्यांना कांहीहि अधिक दिसत नसे. स्वतः हे लोक अगदी दुबळे असून कुणाहि लुटारूच्या हल्ल्यास सहज बळी पडत. या झाडा-झुडपासारख्या जड व अचल आणि शरणागत जिण्याची प्रतिक्रिया म्हणून दुसऱ्या बाजूस अनंत विध्वंसक पंथ उत्पन्न झाले. कत्तली करणें ही त्यांची एक धार्मिक बाब ठरली. आपण हेंही ध्यानांत ठेविलें पाहिजे कीं या हिंदी लोकांत जाति पडून गुलामगिरीहि माजली होती. मनुष्य हा सृष्टीचा प्रभु होण्याऐवजीं गुलाम झाला होता. आपोआप बनत आलेली समाजघटना ही सृष्टीचा त्रिकालाबाधित कायदा आहे असें या लोकांनी मानिलें. वास्तविक सृष्टीचा प्रभु असा माणूस इतका मूर्ख व कुचकामाचा झाला कीं तो हनुमान माकडापुढें व शबला गाईपुढें गुढगे टेकून त्यांची पूजा करूं लागला." एकदां आगगाडी यांच्यांत शिरली कीं या लोकांत जागृति होऊन हे इंग्रजी सत्तेस प्रतिकार केल्यावाचून राहणार नाहींत असें मार्क्सनें याच लेखांत पुढें लिहिलें आहे.

अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांनी मेक्सिकोचा पराभव केला त्यासंबंधीं मार्क्सचा आजन्म सहकारी एंजल्स म्हणतो, " मेक्सिकोचा अमेरिकेनें पराभव केला यांत आम्हांस आनंदच आहे. हीहि प्रगतिच आहे. कारण जें एकादें राष्ट्र आपल्याच प्रपंचांत गुग होऊन राहिलें, अंतर्गत यादवीनें फाटून चाललें व ज्याची प्रगति खुटली तें राष्ट्र इतिहासाच्या प्रवाहांत सक्तीनें खेचलें गेल्यास त्यास हें प्रगतीच्या दिशेनेंच वळण मिळालें असें म्हटलें पाहिजे. मेक्सिकोच्या कल्याणासाठीच मेक्सिको संयुक्त संस्थानांच्या अमलाखालीं गेलें पाहिजे." भांडवलशाहीमुळें प्राचीन समाजांत जी क्रांति होते ती इष्ट असून त्यामुळेंच पुढें भांडवलशाहीहि मोडेल व समाजसत्ता प्रस्थापित होईल असें मार्क्स व एंजल्स या उभयतांचेंहि मत होतें. वरील लेखांतच जुन्या समाजव्यवस्थेशी झगडणाऱ्या भांडवलवाल्यास उद्देशून एंजल्स लिहितो, "भांडवलाच्या परम-पूज्य मालकांनो, चालू द्या तुमची लढाई आणि चढाई. तूर्त तुमची आम्हांस

गरज आहे. कोठें कोठें तुमची राजसत्ताही आम्हांला हवी आहे. मध्ययुगाचे अवशेष व एकतंत्री राज्यसत्ता या अडचणी आमच्या समाजसत्तेच्या मार्गांतून तुम्हीच दूर केल्या पाहिजेत. तुम्हीं पुरोहितशाही मोडली पाहिजे. राज्यकारभार केन्द्रीभूत केला पाहिजे. लहानसान मालकांना तुम्ही मजूर बनवून मजूरांची संख्या वाढविली पाहिजे. ज्यायोगें मजूरांना स्वातंत्र्य प्राप्त करून घ्यावयाचें आहे ती भौतिक परिस्थिति तुम्हीं कारखाने व व्यापार उभारून निर्माण केली पाहिजे. या सर्व उपयुक्त कर्तृत्वाचा मोबदला म्हणून आम्ही कांहीं दिवस तुम्हांस राज्य करूं देऊं. आमच्यावर कायदे लादा; आपण निर्मिलेल्या भांडवली बादशाहीचें ऐश्वर्य भोगा; राजवाड्यांतून मेजवान्या झोडा आणि सुंदर राजकन्यांशीं लग्नें करा. पण ध्यानांत असूं द्या कीं फाशीवाला मांग दाराशी उभा आहे." (१८४७ मधल्या क्रांतिकारक चळवळी).

---

## प्रकरण १० वें

# भांडवलशाहीनें उडविलेला अनर्थ

मागील प्रकरणांत आपण असें पाहिलें कीं, भांडवलशाहीपूर्वीची कृषीवल व रानटी समाजरचना दुर्बल व मनुष्याच्या सर्वांगीण अभ्युन्नतीस प्रतिकूल असून भांडवलशाहीच्या जबरदस्त हल्ल्यापुढें तिचा संहार झाला. तसेंच भांडवलशाहीनें माणसाचें सृष्टीवरील प्रभुत्व वाढवून त्यास उन्नतीच्या मार्गास लावलें. भांडवलशाहीनें अशा प्रकारें माणसाचीं उन्नतिसाधनें व सुखसाधनें वाढविलीं खरीं. पण भांडवलशाहीचा इतिहास पाहतां मानव समाजाचें दुःख उलट वाढलें आहे. रावणाच्या जन्मापासूनच त्यानें धरित्रीचा छळ सुरू केला असें म्हणतात. तसें भांडवलशाहीचें चरित्र मानवसमाजास तिच्या जन्मापासूनच दुःखदायक झालें आहे. जुनी खुरटलेली समाजव्यवस्था मोडून भांडवलशाहीनें समाजांत प्रागतिकपणा आणला खरा. पण हें स्थित्यंतर घडून येतांना पर्वतप्राय दुःख माणसावर कोसळलें आहे. जुन्या

इमारतीची पाडापाड करतांना घरांतील माणसेंहि त्या इमारतीखालीं मारावीं व जीं त्यांतून निसटलीं त्यांना राहण्याची कांहीं सोय न करतां उन्हातान्हांत, पावसापाण्यांत तडफडत ठेवावें नाहींतर देशोधडीस लावावें; असलें, जगांत फक्त हिंदुस्थानांतील एकाद्या संस्थानिकासच शोभणारें, क्रूर व मूर्खपणाचें चरित्र भांडवलशाहीनें आपल्या जन्मापासून गाजविलें आहे.

मजूरांच्या बाजारांत ब्रिटिश भांडवलवाल्यानें भुकेच्या चिमटचांत पकडून मजूरास खरेदी केलें व कारखान्यांत त्यास पिळून त्यापासून वाढावा मिळविला. या वाढावारूपी हत्यारानें त्यानें जुन्या समाजाचा विध्वंस सुरू केला. सहकार्य, श्रमविभाग व पुढें यंत्र यांच्या जोरावर उत्पादनाचा वेग वाढल्यामुळें जुन्या लहान धंदेवाल्यांचे धंदे बुडून बेकारी वाढली. नवीन उत्पादन–प्रकारांत उत्पादनाचा वेग व प्रमाण वाढून मालाचे ढिगाचे ढीग निर्माण होऊं लागले. अर्थात् खुद्द इंग्लंडांत इतक्या सर्व मालास गिऱ्हाईक न मिळाल्यानें तो माल बाहेर पाठविणें प्राप्त झालें. ही निर्गतीची सोय हळूहळू होत होती. पण त्याहून अधिक वेगानें बेकारी वाढत होती. यामुळें मजूरांत रोजगारीसाठीं चढाओढ लावून बेकारी व कमी मजूरी यांमुळें मजुरांची उपासमार झाली. पुढें वणवा पेटत जावा त्याप्रमाणें लवकरच भांडवलवाल्यांचा माल परदेशच्या बाजारांत जाऊन पडूं लागला. त्यामुळें इंग्लंडांतील बेकारी थोडथोडी कमी झाली तरी परदेशच्या धंदेवाल्यांचे धंदे बडून त्यांच्यांत बेकारी आली. पण परदेशांत यांत्रिक धंदे ताबडतोब सुरू न झाल्यानें या बेकारांना धंद्याची सोय कोठेंच न लागून शेतीवर या सर्व लोकांचा भार पडला. जुन्या पद्धतीच्या शेतीत उत्पादन बेताचेंच होत असल्यानें लक्षावधि लोक गेल्या शतकांत हिंदुस्थानांत दुष्काळांत हालहाल होऊन मृत्युमुखीं पडले. संपत्त्युत्पादक अशा नवीन कारखान्यांची स्थापना होण्याचे आधीं आगगाडीचाच प्रसार पुष्कळ झाल्यामुळें परदेशी मालाचे ढिगाचे ढीग खेडोपाड्यांत शिरून स्वदेशी धंदेवाल्यांना नवीन उद्योगाची सोय होण्यापूर्वीच परदेशी मालानें जुन्या धंद्यांचा नाश केला.

## जुन्या समाजाची नासधूस

कृषीवल कालांतील खेड्याचें वर्णन करतांना मागें आपण असें म्हटलें आहे कीं सावकारानें साऱ्या गांवाची जमीन गहाणद्वारां खरेदी केली व त्यामुळें

साऱ्या गांवचें पीक सावकाराच्या ओटीवर जमा झालें. तथापि वाहतूकीचीं साधनें नसल्यानें ही विनाशी संपत्ति सावकारास या ना त्या रूपानें गांवकऱ्यांस वाटावीच लागे. अशा प्रकारें गांवकऱ्यांस मालकीवाचूनहि भोगवटा मिळत होता. यामुळें मालकीहक्काची मातब्बरी फारशी कोणास वाटत नव्हती. गांवानें पिकवावें व गांवानें खावें हा व्यावहारिक न्याय होता. आगगाडीची संक्रांत येताच हें सर्व पालटलें. आतां सावकाराच्या ओटीवरील साऱ्या गांवचें पीक आगगाडीतून मुंबई, कलकत्ता, कॅंटन, शांघाय या बंदरांत गेलें व तेथून तें कोठें मसणांत रवाना झालें. असो—गांवकऱ्यांना—ज्यांनी मालकीच्या, गहाणाच्या, नाहीतर सावकाराच्या शेतांत धन पिकविलें त्या गांवकऱ्यांना त्या पिकांतील दाणाहि परत दृष्टीस पडला नाहीं एवढी गोष्ट गांवकऱ्यांच्या प्रत्ययास आली. उत्तम आंबेमोहोर पिकवावा, त्याने आगगाडी पहावी व आंबेमोहोराच्या निर्मात्यानें नाचणीलाहि महाग व्हावे असा काळ आला. कापड, वस्तरे, चाकू, कात्र्या, कागद हे सर्व पदार्थ परदेशांहून येऊन हे सर्व येथील धंदेवाले देशोधडीस लागले. पुढें इकडे कापसाच्या गिरण्या वगैरे कांही यांत्रिक कारखाने सुरू झाले व कांही बेकारांना रोजगारी मिळाली. पण मोटारी येऊन छकडेवाले, टांगेवाले ठार मेले. भांडवलशाहीच्या पराक्रमाने कारखाने निघून संपत्ति वाढली, कालवे निघाले, शेतीत शास्त्रीय सुधारणा झाली व पिकें वाढलीं. पण माणसाची ददात कमी करण्याची शक्ति या संपत्तींत नाही असा चमत्कार येथें घडत आहे. आर्थिक विषमतेच्या या आपत्तीबरोबर समाजावर इतर सर्व बाजूंनी आपत्ति कोसळली आहे. इंग्लंडचा माल परदेशांत खपूं लागला तसतशी इंग्लंडच्या मजूरांची रोजगारी व मजूरी वाढूं लागली व मजूरांना राजकीय क्षेत्रांत मतदानाचा हक्क मिळाला. पण त्यांना पिळून काढणाऱ्या भांडवलवाल्यांनीं आतां हिंदुस्थान व चीन यांचे पाय बांधून त्यांना पिळण्यास सुरवात केली. या प्रचंड देशांतील भांडवलवाले ब्रिटिश भांडवलवाल्यांना या पिळणुकीचे कामी साथीदार झाले. इंग्लंडचें उदाहरण घेऊन जर्मनी, जपान, अमेरिका, फ्रान्स, इटली या देशांनींहि प्रथम स्वदेशी मजुरांना पिळून त्या वाढाव्याच्या जोरावर आपणहि परदेशी मजूरांस पिळण्यास सुरवात केली. भांडवली राष्ट्रांनीं पिळावयासाठीं घेतलेल्या राष्ट्रांची अनिरुद्धपणें पिळणूक व्हावी यासाठीं राजकीय सत्तेनें त्यांचे पाय

बांधले. पण सर्व भांडवली राष्ट्रांनीं इतर राष्ट्रांची पिळणूक आपसांत अखेरपर्यंत तडजोड करून केली नाहीं. जग निर्माण करणाऱ्या विधात्यानें या भांडवलवाल्यांच्या सोईनें तें जग केलें नाहीं हें भांडवलवाल्यांस आढळून आलें. इंग्लंडांत दगडी कोळसा व इंग्लंडला लागणारा कापूस हजारो कोस दूर असा अमेरिकेंत, हिंदुस्थानांत व इजिप्तांत. तेल इराणांत व इंडीजमध्यें. जपानास यांतलें स्वतांचें कांहींच नाहीं. जर्मनीस समुद्रकिनाराच नाहीं. आणि अमेरिकेस सर्व अमेरिका खंडाचाहि बाजार माल खपविण्यासाठीं पुरत नाहीं. यामुळें कच्च्या मालाचे हक्काचे प्रदेश, पक्क्या मालास हक्काचे बाजार व यांच्या भेटीस जाण्यासाठी जवळचे सोपे जलमार्ग या बाबतींत भांडवली राष्ट्रांत तेढ उत्पन्न होऊन युद्धें झाली व कोटयवधि लोक प्राणास मुकले. संपत्तीची नासधूस किती झाली व मानव जातीस हालअपेष्टा किती भोगाव्या लागल्या याला मितीच नाही.

हा सर्व अनर्थ भांडवलवाल्यांच्या नफ्यांतून निघाला या नफ्यास सुरवात कोठून झाली? स्वदेशांतील मजूरास पिळून वाढावा घेतला, त्याचें परत भांडवल केलें. फिरून वाढावा घेतला तो आगगाडींत भरला, आगबोटींत भरला, परदेशच्या बंदरांत उतरला आणि सुरुंगाची बत्ती पेटली. जुन्या समाजाची धूळदाण झाली. मागसलेल्या राष्ट्रांच्या पायांत पारतंत्र्याची जड बेडी पडली व भांडवली राष्ट्रांच्या म्हणजे त्या राष्ट्रां–राष्ट्रांतील भांडवलवाल्यांच्या चढाओढीमुळें झालेल्या युद्धांत कोटयवधि माणसांचा संहार झाला. त्यांतून निभावलेले लोक निरंतरच्या दुःखांत होरपळतच आहेत. एकाद्या मोठ्या तटास धरणीकंपानें आडवे उभे तडे जावे त्याप्रमाणें भांडवलशाहीनें सर्व जगांतील समाजांच्या चिरफळ्या करून टाकल्या आहेत. महायुद्धांत मजुरांनीं आपले देह निखाऱ्यावर आंथरून ब्रिटिश भांडवलशाहीचें रक्षण केल्यामुळें भांडवलशाहीच्या नफ्याचा फार मोठा हिस्सा मजूरीच्या रूपानें आपणास मिळावा असा त्यांनीं हट्ट धरला. तेव्हां नफाबाज भांडवलवाल्यांनीं हिंदुस्थान, चीन, आफ्रिका, अर्जंटायना, ब्राझिल वगैरे ज्या मागासलेल्या देशांत मजूरी कमी व कच्च्या व पक्क्या मालाचे बाजार नजिक तेथेंच आपलें भांडवल गुंतविलें व तेथून येणाऱ्या नफ्यावर इंग्लंडांतील राज्ययंत्र त्यांनीं शाबूत ठेविलें आहे. इंग्लंडांतील धंद्यांत नवें भांडवल नसल्यानें त्यांत

सुधारणा होत नाहीं, यामुळें जर्मनी, जपान यांच्या मालाशीं इंग्लंडला विदेशीय बाजारांत टक्कर देववत नाहीं म्हणून इंग्लिश कारखान्यांना नफा कमी मिळतो व अर्थात् मजूरी कमी होते, अशी आपत्ति आज ब्रिटिश मजूरांवरहि आली आहे.

## फॅसिझम

जर्मनी, इटाली, जपान या देशांना आपसांत व इंग्लंड--अमेरिकेशीं विदेशी बाजारासाठीं झगडावयाचें असल्यानें तेथील भांडवलवाल्यांना आपला उत्पादनाचा खर्च कमी करावा लागत आहे व त्यासाठीं मजूरांची मजूरी कमी करून त्यांचा विरोध मोडून काढण्यासाठीं मजूरांचे मतदानाचे व संघटनेचेहि हक्क तेथील सरकारनें हिरावून घेतले आहेत. या व्यवस्थेस फॅसिझम असें गोंडस नांव मिळालें असून भांडवलवाले व लष्करआरमार यांची ही सामान्य जनांवर जोड मुखत्यारी आहे. यांना असलेली साम्राज्याची हांव ज्यांचे जवळ आज साम्राज्यें आहेत त्यांचेशीं लढूनच पुरी होणार असल्यानें फॅसिस्ट सरकारचें युद्ध व प्रजेचा संहार हें ध्येयच आहे. जर्मनीचे आजचे गुरुवर्य पेपेन व हिटलर हे स्त्रियांनीं अगदीं थकेपर्यंत मुलें प्रसविणें व पुरुषांनीं धारातीर्थी देह ठेवणें हेंच मानवी जिविताचें सार्थक आहे असें धर्मप्रसारकाचा आव आणून आपल्या प्रजेस सांगत असतात. इटालीचा मुसोलिनी हा या रावणी मताचा प्रमुख शंकराचार्य आहे. या मताप्रमाणें राष्ट्रांतील नागरिक हे युद्धरूपी यज्ञास वहाण्याचे पशुच असावे असें दिसतें. हें मत ज्या देशांत प्रभावी असेल त्यांतील प्रजा कायमची तोफेच्या तोंडीं बांधलेलीच आहे असें समजलें पाहिजे. पण हें सगळें शौर्य कशाकरितां? पोटास अन्न नाहीं म्हणून काय? नव्हे. न खपणाऱ्या मालास बाजार पाहिजे व बाजार सत्तेचा हवा यासाठीं साम्राज्य पाहिजे म्हणून. जपान, जर्मनी, इटाली या देशांना आपला माल खपवून चरितार्थाचीं साधनें मिळवावयाची जरूरी असेल. पण, इंग्लंड, अमेरिका हे त्यांची तडजोडीनें सोय करणार नाहींत. कारण तेथील भांडवलवाल्यांना नफ्याची हाव अमर्यादित आहेच. सर्वजण करणार काय? तर आपल्या प्रजेस पिळून व अंकित असलेल्या प्रजेस पिळून मालाचे ढीग रचणार व ते सामोपचारानें खपण्याची सोय होत नाहीं म्हणून तरवारी उपसून एकमेकांच्या प्रजाजनांचे गळे कापून दर दहा-

वीस वर्षांनीं कोटचवधि लोकांचा नरमेध करणार. या सर्वांचें मूळ कारण तरी काय ?

## अर्थशास्त्रज्ञांना कोंडणारा चक्रव्यूह

याचें कारण भांडवलशाहीच्या अर्थशास्त्रांतच चूक आहे हें होय. इंग्लंडचा माल बाहेरच्या देशांत खपूं लागला तेव्हां इंग्रज मजूराची रोजगारी वाढली व मजूरीहि वाढली. पण हळूहळू इंग्रजी यंत्रांनींच जगांत कारखाने वाढविले व इंग्लंडांतील पक्क्या मालाला मागणी कमी झाली. जर्मनी, अमेरिका, बेल्जम, जपान यांनीं बाहेरील मालाला स्वदेशांत मज्जाव करून आपला माल जगाच्या बाजारांत मांडला. तेव्हां साहजिकच प्रत्येकाचें जगांतील गिऱ्हाइक कमी झालें. भांडवलवाल्यांच्या या विदेशीय व्यापाराच्या चढाओढींत प्रत्येकाचा माल इतका वाढला कीं त्याला बाजारांत गिऱ्हाइक नाहीं. म्हणजे काय झालें ? जगांतील लोकांचीं पोटें काय अन्नानें फुगलीं ? थंडीवारे निवारूनहि कपडयांचे ढीग जास्त उरले ? मोटारी ठेवायला जागा नाहींशी झाली ? यांतील कांहींहि झालें नाहीं. लक्षावधि माणसांना अजून एक वेळ अन्न मिळत नाहीं. थंडीवाऱ्यांत कपडा नाहीं म्हणून लक्षावधि माणसें गारठून मरत आहेत. मग माल कां खपत नाहीं ?

कारण अगदीं सोपें आहे. पण अर्थशास्त्रज्ञांनीं या सोप्या प्रश्नाची इतकी गल्लत केली आहे कीं मोठमोठयांनाहि हें कोडें आतां उलगडत नाहीं म्हणतात. मारे वानराच्या शेपटचाएवढया पदव्या लटकावून हे अर्थशास्त्राच्या पुस्तकांत डोकीं खुपसत आहेत व 'संपत्ति असून दारिद्रय कां ?' या प्रश्नाचें उत्तर देत आहेत. पण, चक्रव्यूह फोडतां न येऊन त्यांत अभिमन्यूचा अखेर अंत झाला, त्याप्रमाणें भांडवलशाहीचा अभिमानानें पुरस्कार करणाऱ्या जगांतील अर्थशास्त्रज्ञांची गत झाली आहे. आर्थिक आपत्तीचें कारण काय ? 'बेकारी असल्यामुळें लोकांना मजूरी मिळत नाहीं, मजूरी नाहीं म्हणून लोकांत खरेदी करण्याची शक्ति नाहीं, खरेदी करण्याची शक्ति नाहीं म्हणून माल खपत नाहीं, माल खपत नाहीं म्हणून नवीन निर्माण होत नाहीं, नवीन निर्माण होत नाहीं म्हणून रोजगारी वाढत नाहीं, रोजगारी वाढत नाहीं म्हणून बेकारी कमी होत नाहीं, झाली एक फेरी. आतां दुसरी—बेकारी असल्यामुळें लोकांना मजुरी मिळत नाहीं, मजूरी नाहीं म्हणून लोकांत खरेदी

करण्याची शक्ति नाहीं, खरेदी करण्याची शक्ति नाहीं म्हणून माल खपत नाहीं, म्हणून माल निर्माण होत नाहीं, म्हणून रोजगारी वाढत नाहीं, म्हणून बेकारी हटत नाहीं. ही झाली दुसरी फेरी. आतां तिसरी–चौथी–अशा शंभर हजार–लाख फेऱ्या घातल्या तरी हें भोंडल्याचें गाणें संपत नाहीं. वाळवेचा घाणा किती फिरविला तरी तेल निघणार नाहीं आणि घाणा संपणार नाही. या अर्थशास्त्रज्ञांना थोडा वेळ विसावा देऊं व आपण साधींभोळीं प्रापंचिक माणसें हा प्रश्न सोडवू. पहा बरें कसा चुटकीसरसा प्रश्न सुटतो तो. इंग्लंड हें एक बेट आहे. याहून अधिक जगाची इंग्लंडला माहिती नाहीं असें समजा. म्हणजे काय, की इंग्लंड एवढेंच तेथील लोकांच्या दृष्टीनें जग. येथें आतां भांडवलशाही उत्पन्न झाली म्हणजे यंत्रानें संपत्ति निर्माण होऊं लागली. याचा परिणाम आपणास ठाऊकच आहे. जुने धंदे बुडाले, लोक बेकार झाले. ते मजूरांच्या बाजारांत आले. भांडवलवाल्याच्या यंत्रास मजूर कमी लागतात. तेव्हां त्यांच्यांत चढाओढ चालली व त्यांची मजूरी कमींत कमी झाली. त्यांची श्रमशक्ति कार्यक्षम राहील इतक्यापुरती मजूरी त्यांना मिळाली. मजूरांनीं काम केलें. त्यांनीं संपत्ति निर्माण केली. किती केली ? त्यांतून त्यांची श्रमशक्ति टिकविण्याइतकी म्हणजे श्रमशक्तीच्या मोलाइतकी मजूरी भागली. भांडवलाची झीज व खप हीं भरून निघालीं. आणखी–आणखी माल-काला काय मिळालें ? मालकास नफा मिळाला. पण हा हिशेब इतक्या लवकर संपत नाहीं. भांडवलासाठीं व मजूराच्या मजूरीसाठीं त्यानें पैसा खर्च केला. तो मालांतून वसूल झाल्यावर मग आपला हिशेब करूं. माल बाजारांत आला. गिऱ्हाईक कोण ? मजूर. कारण कांहीं भांडवलदार व कांहीं मजूर अशीच इंग्लंडच्या लोकसंख्येची आपण विभागणी केली आहे. गिऱ्हाइक मजूरांत कांहीं बेकार व कांहीं रोजगारी. बेकार दुकानावर येतच नाहींत; मरोत बिचारे. रोजगारी दुकानावर आले. त्यांनीं श्रमशक्तीच्या मोलाचे पैसे देऊन श्रमशक्तीच्या संरक्षणापुरता माल खरेदी केला. भांड-वलाची झीज व खप हींहि मालांतून भरून निघालीं. माल उरला. त्याला आतां गिऱ्हाईक नाहीं. बेकाराजवळ पैसा नाहीं म्हणून ते उपाशी मरतात, माल खपत नाहीं म्हणून मालक कारखाना बंद ठेवतो व पूर्वींचेहि आणखी कांहीं रोजगारी मजूर बेकार होतात. इंग्लंड हें जग असें

कल्पितांच ह्या जो संपत्ति व दारिद्र्य यांचा देखावा उत्पन्न झाला तोच आज साऱ्या जगावर उघड दिसतो आहे. तो असा कीं कारखान्यांत माल व शेतांत धान्य आहे पण त्यांना गिऱ्हाइक नाही. आणि बिनरोजगारी लोक जवळ पैसा नाही म्हणून माल खरेदी करीत नाहीत व थंडीवाऱ्यांत कुडकुडत उपाशी मरतात.

साऱ्या जगांत असेंच कसें चाललें आहे तें पाहा. आपण आपल्या कल्पित इंग्लंडाची लोकसंख्या विवेचनाच्या सोईसाठी भांडवलदार व मजूर या दोनच वर्गात विभागली. प्रत्यक्ष जगांत लहान मुलें, वृद्ध दुखणाईत हे वर्ग श्रम न करतां वरच्यांपैकीं दोन्ही वर्गांवर पोसले जातात. सरकारी रोख्यांचे अगर धंद्याच्या रोख्यांचे अथवा भागाचे मालक व्याज किंवा नफ्याचा हिस्सा खाऊन झोपून जगतात. राज्यसंस्था चालविणारे अधिकारी, डॉक्टर, वकील, मास्तर वगैरे वर्ग हे सर्व संपत्त्युत्पादनास अनुकूल परिस्थिति निर्माण करणारे असून उत्पादकावरच पोसले जातात. या सर्वांचा समाजास उपयोगहि असेल. पण, केवळ अर्थशास्त्रापुरतें बोलावयाचें म्हणजे जगाच्या आर्थिक व्यवहाराचें पृथक्करण, संपत्तीचें उत्पादन व विनिमय असेंच करावें लागेल. पूर्वीं कुंभार शेतकऱ्यास गाडगी देई व त्यापासून जोंधळे घेई. असेच आजहि. गिरणीचा मजूर एक रुपया मजूरी मिळवून त्याची दारू, भाकरी व तुकारामाचे अभंग खरेदी करतो. आणि दारू विकणारा, भाकरी विकणारा व अभंग विकणारा हे प्रत्येकी जाऊन कापड खरेदी करतात. आणि या कापडाची आलेली किंमत गिरणीवाला मजूरास देतो. यांतून सर्वांस साधारण असा पैसा काढून टाकला तर ही ऐनजिनसी देवघेवच झाली. हेंच जगांतील विनिमयाचें स्वरूप. जगांत कांहीं भांडवलाचे मालक व कांहीं मजूर, शेतकरी नाहीतर कोष्टी आपल्या भांडवलाचा आपणच मालक व आपणच मजूर असतील. पण मालक व मजूर हें आपलें पृथक्करण आपण सर्वव्यापक अर्थानेंच समजूं. (जगांतील सर्व) मजूरांस (जगांतील सर्व) भांडवलदार भांडवलावर जुपून त्यांपासून संपत्ति निर्माण करतात व मजूरांस पैशांत मजूरी देतात. मालक सर्व माल बाजारांत आणतात. मजूर तो विकत घेतात. कशानें? त्यांना मिळणाऱ्या मजूरीनें. जर त्यांना तो सर्व माल खरेदी करतां न आला तर? तर माल पडून राहणारच. कारण जगांतील गिऱ्हाइक संपल्यावर जगाबाहेर तो माल कोठें नेणार व विकणार?

## जितकें उत्पादन तितकी मजूरी द्या

जगांतील मजूरांना तो सर्व माल खरेदी कां करतां येत नाहीं ? येथें हरदासाची कथा मूळ वाढाव्याच्या पदावर आली. भांडवली अर्थशास्त्रज्ञ असें समजतात कीं बाजारांत स्वातंत्र्य असलें कीं सारख्या वस्तूंचीच देवघेव होते. पण मजूरांच्या बाजारांत आलेल्या मजूरास त्याच्या उत्पादनाच्या सामर्थ्यानें जेवढी संपत्ति निर्माण होईल तेवढ्याची किंमत मिळती तर तो बाजारांत तेवढा माल खरेदी करता व बाजारांत मालाची रास पडून राहिली नसती. सारख्याच वस्तूंचा जर बाजारांत विनिमय होईल तर मजूरानें कष्ट करून निर्माण केलेल्या संपत्तींतील त्याचा वाटा त्यास मिळेल. भांडवल व देखरेख हींहि माणसाच्या श्रमानेंच केलीं जातात व त्यांचेंहि—मोल, मजूरी—आकारलें जातें हें लक्षांत ठेवलें म्हणजे मजूरांनींच जगांतील संपत्ति निर्माण होत असून त्यांना त्यांनीं निर्मिलेल्या मालाची पूर्ण किंमत दिल्यास अखेर ते स्वतांच मालाचे गिऱ्हाइक असल्यामुळें तेच तो माल खरेदी करूं शकतील हें उघड दिसतें. पण भुकेनें नाडलेल्या मजूरास भांडवलवाला अडवून धरून त्याच्या उत्पादनाइतक्या किंमतीचें मोल त्यास न देतां कमींत कमी म्हणजे त्याच्या श्रमशक्तीच्या मोलाइतकेंच धन देतो व आपण वाढावा बळकावतो. या वाढाव्याचे पैसे झाले म्हणजे तो त्याचा ‘नफा’. पण मजूर बाजारांत जे पैसे आणतो ते त्यास कमींत कमी मिळाले तेवढेच आणतो. अर्थात् तेथला सगळा माल खपत नाहीं. जेव्हां इंग्लंड एकटेंच भांडवलवालें होतें तेव्हां हा उरलेला माल त्यानें बाहेरदेशीं विकून स्वदेशांतील मजूरांच्या रक्तांतून काढलेल्या वाढाव्याचे पैसे वसूल केले. पण स्वदेशी मजूरांच्या रक्तांतून वाढावा काढून तो विदेशांत विकून त्याचा पैसा करण्याची —‘नफा’ मिळविण्याची चट इतर राष्ट्रांनाहि लागली. यामुळें, जगांतील सर्व मजूर वाढावा मालकास बिनमोबदला अर्पण करतात व आपल्या श्रमशक्तीस टिकविण्याइतकेंच धन स्वतां घेतात हा इंग्लंडांतील देखावा आज जागतिक झाला आहे. ही वाढाव्याची संपत्ति आज कोणी खरेदी करूंच शकत नाहीं. ही खपेपर्यंत नवीन माल निर्माण व्हावयाचा नाहीं म्हटलें, म्हणजे बेकारी, उपासमारी आणि संपत्तिशेजारीं दारिद्र्य हे त्याचे स्वाभाविक परिणाम ठरलेलेच आहेत.

संपत्ति ही भोगासाठीं आहे हें तत्त्व मान्य केलें तर जे ती निर्माण करतात त्यांना इतका मोबदला मिळाला पाहिजे कीं त्यांना ती सर्व खरेदी करतां आली पाहिजे. त्यांनींच पुढील उत्पादनासाठीं कांहीचें भांडवल करावें व बाकीची संपत्ति भोगावी हेंच खरें अर्थशास्त्र होय. जगांतील एकंदर मजूरी ही भावी उत्पादनास लागणारें भांडवल व समाजाचा समाईक चालू खर्च वजा जातां उरलेल्या सर्व संपत्तीइतकी मिळाली पाहिजे. खऱ्या अर्थशास्त्रांत नफ्यास स्थानच नाही. सर्व संपत्ति, सृष्टि व मनुष्ययत्न यांच्या संयोगानेंच निर्माण होते. पुन्हां संपत्ति निर्माण करण्यासाठीं खतपाणी, बी, नांगर, यंत्रें यांसाठीं कांही संपत्ति लागते. तें भांडवल. तें माणसानें साचवावें व उरलेलें भोगावें. जी श्रमजन्य संपत्ति भांडवलांतहि जात नाहीं व श्रमकर्त्यासहि मिळत नाहीं नुसती पडून राहते तो वाढावा—नफा—संपत्तीची निर्मिती थांबवितो व श्रम-कर्त्यास उपाशी मारतो. हा नफा बंद होणार नाहीं, म्हणजे नफा मिळेल तरच भांडवलावर श्रम करूं देईन असे म्हणणारे भांडवलाचे मालक जोंपर्यंत शिल्लक आहेत—म्हणजे भांडवल ऊर्फ संपत्तिसाधनें सर्वांच्या मालकीचीं नाहींत—म्हणजे जोंवर भांडवलावर खाजगी मालकी असून समाजसत्ता नाही तोंवर संपत्तीशेजारीं आपत्ति हा कृत्रिम विरोध व तज्जन्य जगांतील बहुसंख्य समाजाचें दुःख संपणें शक्य नाहीं.

---

## प्रकरण ११ वें

# भांडवलशाहीच्या प्रतिकाराचे प्राथमिक प्रयत्न

येथवर भांडवलशाहीचा जन्म व चरित्र अवलोकन करून आपण असें पाहिलें कीं, भांडवलशाहीपूर्वीची दुबळी व मानवप्रगतीस प्रतिबंधक अशी कृषीवल समाजरचना भांडवलशाहीच्या जबरदस्त धक्क्यानें मोडून पडली आणि भांडवलशाहीचा जगभर प्रसार झाला हें इतिहासक्रमास धरूनच झालें असून त्यायोगें मनुष्यसमाज प्रगतीची पुढील पायरी चढला आहे. त्याबरोबरच आपण असेंहि पाहिलें कीं, भांडवलशाहीनें मानव-

समाजाचे दुःख एकंदरीनें वाढविलें असून समाजसत्ता स्थापन झाल्याखेरीज भांडवलशाहीनें निर्माण केलेली दुःखें नाहीशी होणार नाहीत. आतां भांडवलशाहीच्या दुःखापासून मुक्त होण्याचे उपाय कोणीं कोणते सुचविले व त्यांत समाजवाद अथवा सोशॅलिझम याचें वैशिष्टच काय हें यापुढें पाहावयाचें आहे.

## परोपकारी सरदार वर्गाचा विरोध

भांडवलशाहीस प्रतिकार करण्याचे प्रयत्न भांडवलशाहीच्या जन्माइतकेच जुने आहेत. १७८९ त फरान्समध्यें झालेली क्रांति ही भांडवलवाल्यांनीं घडवून आणलेली पहिली मोठी क्रांति होय. या क्रांतीचे पुरस्कर्ते जसे अनेक तत्त्ववेत्ते होते तसेच तिचे विरोधक असेहि विचारी लोक मतप्रसार करीत होते. या विरोधकांत लुई डी बोनाल्ड (१७५४–१८४०) हा एक प्रमुख लेखक होता. त्यास भांडवलशाहीत गुण असा कांहीच दिसला नाही. औद्योगिक क्रांति व समाजक्रांतीची तत्त्वें, मोठी शहरें, बँका, ही सर्व त्यास अरिष्टे वाटत. यंत्रें येऊं लागली की खेड्यांतील शांत व सुखमय कौटुंबिक वातावरण नष्ट होणार हें संकट त्याला स्पष्ट दिसलें. जमिनदार वर्गाच्या प्रभुत्वाखाली समाजास स्थैर्य होतें. पण व्यापारउदीम व प्रचंड उद्योग सुरू झाले की समाजाचें स्थैर्य, विनयशीलता व सुसंस्कृति या सर्वांचा नाश होणार असें त्यास वाटे. बोनाल्ड मानवजातीच्या भवितव्याबद्दल निराश झाला. "दगडी कोळसा हा" बोनाल्ड म्हणतो, "हवा धुरानें भरून टाकतो, उग्र वास पसरवितो व माणसास नाउमेद करितो. कालांतरानें हा राष्ट्राचें सर्व शीलहि भ्रष्ट केल्यावाचून राहणार नाही."

इंग्लंडांत 'यंग इंग्लंड' नामक सरदारांतील तरुणांची एक संस्था असून हे सर्व भांडवलशाहीचे असेच विरोधक होते. डिसरेली (१८०४-१८८१), बोर्थविक, फेरँड, लॉर्ड जॉन मॅनर्स व लॉर्ड अॅश्ले (१८०१–१८८१) हे या संस्थेचे प्रमुख सभासद होते. यांपैकीं डिसरेली हा एका श्रीमान् ज्यूचा मुलगा असून उत्तम लेखक होता. त्यानें 'कॉनिंग्जबी' व 'सिबिल अथवा दुभंगलेलें राष्ट्र' या दोन कादंबऱ्यांत भांडवलशाहीवर फार झोड उठविली. कार्ल मार्क्सनें (१८१८–१८८३) पुढें प्रतिपादिलेल्या 'वर्गयुद्ध' या तत्त्वाचा पुकारा डिसरेलीनें आपल्या 'दुभंगलेलें राष्ट्र' (१८४५)

या कादंबरींत मोठ्या प्रखरपणें करून ठेविला होता. डिसरेली म्हणतो "प्रचंड उत्पादनानें धनिकवर्ग व गरीबवर्ग यांत एक राष्ट्र दुभंगलें जात असून उत्पन्न होणाऱ्या दोन वर्गांत स्नेहसंबंध व सहानुभूति मुळीच राहात नाहीं. एका वर्गाच्या संवयी, विचार, भावना यांचें दुसऱ्या वर्गास मुळीच ज्ञान नसतें. दोन भिन्न ग्रहांवरील माणसें जितकी एकमेकांस अनोळखी असतील तितके हे दोन वर्ग एकमेकांबद्दल अनोळखी असतात." डिसरेली (नंतर लॉर्ड बिकन्सफील्ड) हा पुढें इंग्लंडांतील टोरी पक्षाचा प्रमुख पुढारी होऊन इंग्लंड-चा कट्टा साम्राज्यवादी मुख्य प्रधान म्हणूनहि गाजला. भांडवलशाहीनें ब्रिटिशाचें वैभव वाढतें हें लक्षांत आल्यावर त्याची मतें साहजिकच बदललीं. लॉर्ड अॅश्ले (पुढें शॅफ्ट्सबरी) यानें मात्र भांडवलशाहीशी आपला विरोध कायम ठेवून कारखान्यांत मजूरास चांगली वागवणूक मिळावी या-संबंधीं पार्लमेंटांतून कारखान्यांचे कायदे करून घेण्यासाठी फार खटपट केली. यामुळें मजूरवर्गात तो फार प्रिय झाला होता. 'यंग इंग्लंड' संस्थेसंबंधानें एंजल्स (१८२०–१८९५) लिहितो की, 'इंग्लंडांत पुन्हां सरदारशाही स्थापन करावी असा यांचा हेतु होता. अशा अशक्य व मूर्ख ध्येयासाठीं प्रयत्न करणें म्हणजे इतिहासक्रमाची ती थट्टाच होती. पण त्यांचे उद्देश थोर होते. भांडवलशाही समाजरचनेंतील वाईटपणा त्यांच्या लक्षांत आला व त्याविरुद्ध ते शौर्यानें लढले हें कबूल केलें पाहिजे." कार्लाइल (१७९५-१८८१) या प्रसिद्ध लेखकानेंहि भांडवलशाहीविरुद्ध आपल्या लेखनांत कडक टीका केली आहे. पण त्यालाहि भांडवलशाहीचें ऐतिहासिक स्वरूप कळलें नव्हतें. त्याला एकंदरीनें नवीन अस्तित्वांत येत असलेली लोकशाही नापसंतच होती. लोकांचा गलगा उठला कीं त्याचें डोकें भणाणून जाई. हिटलर व मुसोलिनी ज्याप्रमाणें 'पुढारी' ( हिरो ) म्हणजे सर्व कांही असे मानतात तसें कांहीसें त्याचें मत होतें.

इंग्लंडांतील टोरी अथवा त्या वेळच्या जमीनदार वर्गांतून मानवजातीचा कैवार घेऊन भांडवलशाहीस विरोध करणारा वर्ग निर्माण होण्याचें विशेष कारण असें होतें कीं व्हिग अथवा भांडवलदार वर्ग हा ज्या वाढत्या जोमानें मजूरवर्गास भरडून काढीत होता तितक्याच जोमानें जमीनदार वर्गासहि धक्के देत होता. यामुळें जमिनदार वर्गांत प्रतिक्रिया उत्पन्न होऊन मजू-

रांचा कैवार घेऊन भांडवलदारास विरोध करणारा वर्ग पुढें आला. कारखान्याचे कायदे करून इंग्लंडांत मजूरांची स्थिति सुधारून घेण्याचें पुष्कळसें श्रेय या टोरी पक्षास आहे.

सर्वांचेंच भलें व्हावें, सर्वांनीं सौजन्यानें वागावें, संपत्ति भरपूर वाढावी म्हणजे समाजाची भरभराट होईल असें प्रामाणिकपणें मानणारांचा एक पक्ष सर्व देशांत सर्व काळी चालू घडींत भलेपणानें वागून स्वार्थ साधीत असतो. असाहि एक पक्ष भांडवलशाहीच्या उदयकाळीहि होताच. अशा वर्गासंबंधानें मार्क्स लिहितोः– " स्वतांच्या सद् ावनेस सुखविण्यासाठी समाजांतील विरोधावर हे लोक पांघरूण घालीत असतात. ' बाबांनो जरा गंभीरपणें वागा, उद्योगी बना, मुलें जरा कमी करीत जा ' असा यांचा मजूरांस उपदेश असतो. आणि भांडवलदारास ' अतिलोभ बरा नव्हे बरें! ' असें यांचें सांगणें असतें. सिद्धांत व व्यवहार, तत्त्व आणि त्याचे व्यावहारिक परिणाम, आकार आणि सार, न्याय आणि वस्तुस्थिति, भली आणि बुरी बाजू या द्वंद्वांतील बारीक फरक अनंत काळपर्यंत, साखरेची साल काढावी त्याप्रमाणें, काढीत राहावें एवढेंच यांचें काम असतें. "

## कल्पनावादी अथवा युटोपियन पंथ

सिसमाँडी (१७७३–१८४२) हा एक फरेंच तत्त्वज्ञ भांडवलशाहीचा प्रसिद्ध विरोधक होऊन गेला. तो भांडवलशाही मोडून टाकावी असें म्हणत नाही, पण उत्पादन फार होऊं नये असें सांगतो. शास्त्रज्ञांनीं संशोधन करून नवीन शोध लावणें, हे सरकारने खाजगी धंद्यांत ढवळाढवळ करण्याइतकेंच वाईट आहे असें त्याचें मत होतें. शेतींत व उद्योगधंद्यांत लहान लहान मालक निर्माण करून मालक व मजूर हे एक करावे असें त्यानें प्रतिपादिलें.

प्राउढन (१८०९–१८६५) हा फरेंच तत्त्वज्ञ भांडवलशाहीचा प्रसिद्ध टीकाकार होऊन गेला. मजूर वर्गाचीं दुःखें त्याला तीव्रपणें भासलीं. भांडवलावरील खाजगी मालकीमुळेंच सांपत्तिक विषमता व सामाजिक दुःख उत्पन्न होतें हेंहि त्याच्या लक्षांत आलें. पण मजूरांनीं आपलीं दुःखें दूर करण्यासाठीं संप करणें, राजकीय चळवळ करणें वर्गयुद्ध माजविणें हें त्यास पसंत नव्हतें. धंदे फार मोठे वाढवूं नयेत व अखेर भांडवलदार व मजूर वर्गांनीं एकमेकांशीं सहकार्यानेंच वागावें असें तो म्हणे.

फोरीअर (१७७२–१८३७); सेंट सायमन (१७६०–१८२५) व रॉबर्ट ओवेन (१७७१–१८५८) या तिघांस भांडवलशाहीच्या प्रतिकारकांत फार महत्त्वाचें स्थान आहे. त्यांच्या काळच्या वर वर्णिलेल्या टीकाकारांहून भांडवलशाहीचे कल्याणकारक गुण यांना पुष्कळच अधिक चांगल्या प्रकारें उमगले होते. दोष काढून भांडवलशाही शाबूत ठेवून तिचा कसा फायदा करतां येईल याचीं कल्पनाचित्रें यांनीं रेखाटलीं. यांनीं मनुष्याच्या मानसिक गुणावर सुधारणेची इमारत रचिली. ऐतिहासिक क्रम कसाहि असो, अमुक एक समाजरचना चांगली असें माणसांस पटलें की बिऱ्हाड बदलावें त्याप्रमाणें नवीन समाजरचना करतां येते असें यांचें मत होतें. हा पंथ शास्त्रशुद्ध नाहीं, इतिहासक्रमास महत्त्व देत नाहीं, निवळ कल्पनाचित्रांत खेळत राहतो अशा अर्थी त्यास कल्पनावादी (युटोपीयन) अशी संज्ञा पुढील समाजवाद्यांनी दिली आहे. पण पुढें समाजवादाची शास्त्रशुद्ध उभारणी करण्याचे कामीं यांच्या कार्याचा फार उपयोग झाला असें एंजल्स यानें कृतज्ञतापूर्वक कबूल केलें आहे.

फोरियरने भांडवलशाहीवर चढविलेल्या हल्ल्यासंबंधीं एंजल्स लिहितो, "फोरियरनें भांडवलशाहीवर केलेली टीका मोठी तेजस्वी व मूलग्राही आहे. फरेंच क्रांतीपूर्वीचे धीरोदात्त तत्त्ववेत्ते व नंतरचे भांडवलवाल्यांचे स्तुतिपाठक यांच्या वचनांतील विरोध दाखवून फोरियर भांडवलवाल्यांवर मोठी प्रखर टीका करतो. 'भांडवलशाहीच्या अमदानींत विवेकाचें साम्राज्य होईल, सुखाचा प्रसार होईल व माणूस अत्युच्च पदवीस पोंचेल' हे भांडवलशाहीच्या प्राचीन ऋषींनीं दिलेले आशीर्वाद अखेर सर्व खोटे ठरून दारिद्र्य व नीतिमत्तेचा ऱ्हास यांचीच कशी वाढ झाली आहे हें फोरियरनें मार्मिकपणें दाखविलें आहे. भांडवलवाल्यांच्या स्त्रीपुरुषसंबंधाबद्दल फोरियरनें त्यांची फारच रेवडी उडविली आहे. कोणत्याहि समाजांत स्त्रीस्वातंत्र्य किती प्रस्थापित झालें आहे यावरून तो समाज किती उन्नत झाला आहे हें ठरवितां येतें, असें फोरियर म्हणतो. फोरियरनें पशुवृत्ति, रानटी वृत्ति, कौटुंबिक समाज व औद्योगिक समाज असे मानवविकासाचे चार भाग केले असून औद्योगिक समाज हा पूर्वीच्या सर्व अवस्थांतील उघड दिसणारे दोष अधिक गुंतागुंतीचे करतो, प्रखर करतो, अस्पष्ट करतो आणि त्यांना गुणाचें सोंग देतो

असें फोरियरनें म्हटलें आहे." फोरियरच्या लिहिण्याचा एंजल्सच्या मनावर फार खोल ठसा उमटला होता.

कोंट हेन्री डी सेंट सायमन हा पॅरिस मध्यें १७६० सालीं एका सरदार-कुलांत जन्मला. लहानपणापासून तो अतिशय भावनाप्रधान व श्रद्धाळू होता· त्यास एकदां स्वप्नांत असा भास झाला कीं आपला पूर्वज शार्लमेन हा 'बाळ तुझें चरित्र विशेष प्रकारचें होणार आहे' असें सांगून गेला. तेव्हांपासून 'साहेब आपणास थोर कृत्यें करावयाची आहेत' अशी रोज सकाळीं आपणास आठवण करण्यास त्याने आपल्या नोकरास बजाविलें होतें. फरान्सनें अमेरिकेस स्वातंत्र्ययुद्धांत इंग्रजांविरुद्ध मदत केली त्या वेळी सेंट सायमन अमेरिकन युद्धांत सामील होऊन अमेरिकेच्या स्वातंत्र्यार्थ इंग्रजांशीं मोठ्या शौर्यानें लढला. फ्रान्सच्या राज्यक्रांतीच्या वेळी तो परत फ्रान्सला आला क्रांतीच्या घालमेलींत त्याला बरीच जमीन मिळाली. तेव्हां या धनावर चरितार्थ चाल-वून त्यानें पुढें विद्याभ्यास केला व शास्त्रीय प्रयोग केले. पण त्याच्या सर्व जिंदगीची त्यांत वाट लागून अखेर दारिद्र्यांत त्याचा शेवट झाला. भौतिक शास्त्रांचा तो फार मोठा पुरस्कर्ता होता. पूर्वी ख्रिस्ती पुरोहित हा धनगर व जनता हीं त्याचीं मेंढरें असा संबंध श्रद्धावान् लोक मानीत. यापुढें शास्त्र-ज्ञांना ही धनगराची घोंगडी देऊन सर्व मजूरवर्ग त्यांचे स्वाधीन करावा आणि ख्रिस्ती मताप्रमाणें बंधुभावानें सर्वांनीं वागावें असें सेंट सायमननें प्रतिपादिलें. भावी समाजघटनेची कल्पना त्या वेळीं कोणास अंधुकपणेंहि येणें शक्य नव्हतें. पण सेंट सायमन यास मात्र ती आश्चर्य वाटण्याइतकी स्पष्टपणें आली होती असें दिसतें. राज्यसंस्था नष्ट करून दंडहीन कारभारपद्धति स्थापन करण्याची कार्ल मार्क्सनें नंतर मांडलेली कल्पना शास्त्रीय शोधांच्या साह्यानें पुढें मूर्तरूप पावेल असें सेंट सायमन यास आधींच दिसलें होतें. एंजल्स म्हणतो, "१८१६ सालींच सेंट सायमननें लिहिलें कीं, राज्यशास्त्र हें एक अर्थोत्पादनशास्त्रच असून पुढें हीं दोन्ही एकजीव होतील. या विधा-नांत आर्थिक परिस्थिति ही राजकीय संस्थांचा साचा असते या (पुढें मार्क्स व एंजल्स यांनीं प्रतिपादिलेल्या) तत्त्वाचें फक्त बीजच दिसून येतें. तरी पण राज्यकारभाराचें अखेर रूपांतर उत्पादनाची व्यवस्था व जडवस्तूंचें नियंत्रण यांत होईल असें स्पष्ट विधान येथें केलें गेलें आहे. आज राज्यसंस्था

नाहींशी करून टाकणें या तत्त्वाचा जाहीर पुकारा होत असतो. पण हें तत्त्व सेंट सायमननें १८१६ तच सांगून ठेविलें आहे."

## रॉबर्ट ओवेन

फोरियर व सेंट सायमन या फरेंच तत्त्वज्ञांच्या काळीं फ्रान्समध्यें प्रचंड प्रमाणावर भांडवलशाही उत्पादन सुरू झालें नव्हतें. यामुळें भांडवलशाहीची जी अधिक स्पष्ट कल्पना त्यांना येऊं शकली नाही ती रॉबर्ट ओवेन यास इंग्लंडांत प्रचंड उत्पादन प्रत्यक्ष पाहतां आल्यामुळें फार चांगल्या प्रकारें आली. तो इंग्लंडांत न्यू टाऊन येथें १७७१ त जन्मला. लहानपणापासून तो हुषार व चलाख होता. दहावे वर्षी त्यानें एका रंगाऱ्याकडे मालविक्याची नोकरी पत्करली. आपल्या हुषारीच्या बळावर तो एकोणिसाव्या वर्षी मँचेस्टर येथें एका कापसाच्या गिरणीचा व्यवस्थापक झाला. धंदेवाला या नात्यानें ओवेन फारच वाकबगार होता. त्यानें कापसाच्या कारखान्यांत पुष्कळ सुधारणा करून पूर्ववयांतच पुष्कळ पैसाहि कमावला. पुढें त्यानें आपल्या मालकाच्या मुलीशी लग्न केलें. सन १८०० सालीं त्यानें इतर भागीदारांकडून तो सर्व धंदाच खरेदी केला आणि क्लाइड नदीच्या धबधब्याचे खालीं थोडे अंतरावर त्यानें एक कापसाची गिरणी व तेथेंच मजूरांची वसाहत स्थापून या सर्व संसारास 'न्यू लानार्क' असें नांव दिलें.

निवळ नफेबाजीसाठी त्यानें हा खटाटोप केला नव्हता. भांडवलशाहीच्या आद्य पुरस्कर्त्यांनीं भांडवलशाहीचा उदय होतांच मानवजातीची सुखसमृद्धि वाढेल असें भाकित केलें. त्याचा ओवेनच्या मनावर फार अनुकूल परिणाम झाला. भांडवलशाहीच्या गुणांचा फायदा घेऊन मानवजातीचें कल्याण करावें तें सोडून भांडवलवाले संपत्तीचा अपव्यय व विध्वंस करतात व मजूरांची दुःस्थिति वाढवितात याचें त्याला फार वाईट वाटे. तेव्हां मोठ्या प्रमाणावरील धंदा स्वतां चालवून, आणि मजूरांची स्थिति व धंदा हे दोन्ही सुधारून दाखवून इतरांस उदाहरण घालून द्यावें या उच्च उद्देशानें त्यानें न्यू लानार्कची उभारणी केली. येथें सुमारें दोन हजार कामगार असून त्यांत पांचशें मुलें होतीं. या सर्वांची मूळची स्थिति अत्यंत वाईट असून त्यांना घाणेरड्या संवयी जडल्या होत्या. अशा गलिच्छ माणसांच्या साह्यानें त्यानें आपल्या उद्योगास सुरवात करून २८ वर्षांत विलक्षण क्रांति करून दाखविली. त्यानें

कामाचे तास कमी केले. कारखान्यांत आरोग्यकारक व सुखकारक परिस्थिति निर्माण केली. अगदीं लहान मुलांना कामावर नेमणें बंद केलें. कामगारांची कारागिरी सुधारली. मंदीच्या काळांत बेकार–वेतन सुरू केलें. मुलांसाठीं शाळा सुरू केल्या आणि इतकें सर्व करून धंद्याचीहि बरकत होते असें सिद्ध केलें. ओवेन जसा उत्तम धंदेवाला व कर्ता सुधारक होता तसाच चांगला विचारप्रवर्तक व निपुण लेखक होता. मजूर हे अव्यवस्थित व अविचारी असल्यानें त्यांचें दुःख वाढतें या इतर भांडवलवाल्यांच्या मताचा त्यानें मोठ्या त्वेषानें धिःकार केला. शिक्षण, उदाहरण व अनुकूल परिस्थिति यांनीं माणूस हवा तितका सुधारूं शकतो व त्यामुळें धंदाहि वाढतो हें मत मांडून आपली वसाहत हीच याचें उदाहरण आहे असें ओवेननें सांगितलें. केवळ चालू नफ्याच्या लोभानें ज्याचे डोळे अंध झाले आहेत असे भांडवलवाले मजूरांस पिळून काढून एकंदर समाजाची खराबी करतात, यामुळें दूरदृष्टीनें पाहतां पुढें धंद्याचीहि खराबी होते. म्हणून समाजानें कायद्याची मदत घेऊन कारखानदारांवर मजूरांना चांगलें वागविण्यासाठीं नियंत्रण घालावें असें ओवेन यानें प्रतिपादिलें. याच्याच प्रेरणेनें इंग्लंडांत १८१९ सालीं पहिला कारखान्याचा कायदा पास झाला. आपली वसाहत ही कारखानदारीची एक प्रयोगशाला आहे असें तो समजे. जें येथें यशस्वी होईल तें इतरत्रहि यशस्वी झालेंच पाहिजे असा त्याचा सिद्धांत होता. म्हणून त्यानें न्यू लानार्क-च्या पद्धतीनें सर्व धंद्यांची मांडणी व्हावी असें प्रतिपादण्यास सुरवात केली. त्याच्या कृतीची व प्रतिपादनाची त्या वेळीं बरीच चहा झाली. टाइम्स व मॉर्निंग पोस्ट या प्रसिद्ध पत्रांनी त्यास पाठिंबा दिला. रशियाचा झार ग्रँट ड्यूक निकोलस यानें न्यू लानार्कला भेट देऊन त्याची प्रशंसा केली. तिसऱ्या जॉर्जचा मुलगा व व्हिक्टोरिया राणीचा बाप ड्यूक ऑफ केंट हा न्यू लानार्कचा मोठा पुरस्कर्ता होता.

पण ओवेनचा हा सारा खटाटोप त्याच्या व्यवसायबंधूंना आवडला नाहीं. परोपकार हाहि दूरदृष्टीनें पाहतां स्वार्थच असतो हें समजण्याइतके ते थोर अंतःकरणाचे नव्हते. ओवेनचा उत्कर्ष व लौकिक त्यांस सहन झाला नाहीं. मजूरांस चांगलें वागविण्यासंबंधींचीं बंधनें ओवेनच्या शिकवणुकीमुळें येतात याची त्यांना चीड आली आणि कांहींहि करून ओवेनचा पाडाव करण्यास

ते टपून बसले. त्यांच्या सुदैवानें ही संधि ओवेन यानें आपल्याच लेखणीनें आणून दिली. समाजसुधारक हे सर्व जगांत प्रचलित धर्मसमजुतींना विरोध करीत असल्याचें दिसून येतें. ओवेनच्या बाबतीतहि ही गोष्ट खरी ठरली. त्यानें आपल्या लेखनांत प्रचलित धर्ममतावर सडकून टीका करून आधि-भौतिक वादाचा मोठ्या आग्रहानें पुरस्कार केला. ही संधि साधून त्याच्या विरोधकांनीं त्याचा पाखंडी म्हणून धिःकार केला. यामुळें ओवेन लोकांत अप्रिय होत चालला. न्यू लानार्कला यश आलेसें पाहून ओवेन यानें अमेरिकेंत इंडियाना येथें 'न्यू हार्मनी' नामक आणखी एक वसाहत स्थापून याहून मोठ्या प्रमाणावर प्रयोग करण्याचें ठरविलें व त्यासाठी न्यू लानार्क हें आपल्या भागीदारास विकून टाकून सगळें भांडवल अमेरिकेंत घातलें. पुढें न्यू लानार्क-मधील ध्येयवाद मावळून जाऊन तो कारखाना इतर कारखान्यांच्या वळणा-वर गेला. ओवेन याच्या प्रयत्नानें एकाद्या चांगल्या व्यक्तीस काय करतां येईल एवढें सिद्ध झालें. पण त्याबरोबरच भांडवलशाहीची घटनाच मोडल्या-शिवाय यांत्रिक उत्पादनापासून माणसास निश्चित व अखंड सुख लाभणार नाहीं हेंहि सिद्ध झालें. ओवेन यास असें दिसून आलें कीं, भांडवलशाहीच्या व्यवहारांत 'पैसा' ही फार अडचणीची बाब आहे; कारण त्याचें विनिमयमूल्य एकसारखें बदलत असतें. निरनिराळ्या घड्याळांतील तास कमीअधिक वेळाचे झाल्यास कालनियंत्रण जसें अशक्य होईल तसा पैसा मोलांत एक-सारखा बदलत गेल्यास विनिमयनियंत्रणहि अशक्य होईल असें तो म्हणे. यासाठीं त्यानें एक तास दोन तास, तीन तास, अशा कामाची तिकिटें पैशा-ऐवजीं देण्याची योजना चालू केली होती. पण तिचा मोठ्या प्रमाणावर प्रसार कधीच झाला नाही. ओवेनच्या प्रयत्नाचें वैशिष्ट्य मालकांनी थोर अंतःकरण करून मजूरांची स्थिति सुधारावी असें म्हणण्यांत होतें. मजूरांनी स्वतां झगडून आपली सुधारणा करून घ्यावी हा विचार त्यास कधीच सुचला नाही. पण भांडवलशाहीची वाढ झाली तशी ओवेनच्या हयातीतच मजूरांची संघटना सुरू झाली. इंग्लंडांत मजूरांच्या संघटनेस प्रतिबंधक असे कायदे होते ते मजूरांच्या खटपटींनीं १८२४ मध्यें रद्द होऊन मजूरसंघाच्या चळवळीस रीतसर सुरवात झाली.

मार्क्स–एंजल्स यांनीं पुढें प्रतिपादिलेल्या कांही मतांचा ओवेननेंहि कांहींसा

अस्पष्टपणें पुरस्कार केला होता. ओवेनच्या मताची मार्क्सच्या मतावर पुष्कळ सावली पडली होती. कॅपिटल् ग्रंथांत ओवेनची मार्क्सनें फार प्रशंसा केली आहे. पुढें पुढें ओवेन समाजवादीहि बनला होता असें म्हणतात. भांडवलशाही नष्ट करून समाजसत्ता स्थापण्यास जी जी विघ्नें येतात त्यांवर पुढें त्यानें आपलें टीकास्त्र चालविलें होतें. ओवेन पूर्णपणें आधिभौतिकवादी होता. माणसाच्या डोक्यांत मूळच्या अशा कोणत्याहि कल्पना अथवा गुण नसून जें प्रत्ययास येतें तें सर्व बाह्य परिस्थितीचें प्रतिबिंब आहे असें त्याचें मत होतें. 'कापड ही स्वयंभू वस्तु नसून ती जशी कारखान्यांत तयार होत असते, त्याप्रमाणें सदसद्विवेकबुद्धि हीहि स्वयंभू नसून डोक्यांत तयार होत असते' असें त्यानें लिहिलें आहे. मजूरांची स्थिति सुधारण्याचा प्रयत्न ओवेन इतका कोणींच केला नाहीं. कामगार व कारखानदार यांतील द्वंद्व मोडावें, खेडीं व शहरें यांत सहकार्य घडवून आणावें आणि अशी सुधारणा होत होत अखेर समाजसत्ता स्थापन करावी अशी त्याची विचारसरणी होती.

ओवेनची चळवळ ही मजूरांची स्वतांच्या हक्कासाठीं चळवळ नसून भांडवलवाल्यांची मजूरांसाठी चळवळ होती असें मागें सांगितलें आहे. त्याची दुसरी विशेष गोष्ट अशी की तो शांतिवादी होता. मजूरांची संघटना करून प्रतिकाराच्या मार्गानें क्रांति घडवून आणावी हें त्यास मान्य नव्हतें. इंग्लंडांत १८४०–५० चे सुमारास पार्लमेंटपुढें धरणें धरून व एक प्रकारें प्रत्यक्ष प्रतिकार करूनच पार्लमेंटांत सुधारणा घडवून आणूं पाहणारा चार्टिस्ट नांवाचा एक पंथ खास जनतेंतून निर्माण झाला होता. मजूरवर्गास व्यापक राजकीय हक्क प्राप्त करून देणें हें या पंथाचें ध्येय होतें. पण याच्या प्रत्यक्ष प्रतिकाराच्या धोरणास ओवेनचा विरोध होता. ओवेन व चार्टिस्ट यांच्या विरोधाची मीमांसा करतांना एंजल्स लिहितो, "सोशॅलिस्ट (म्हणजे ओवेनचा पंथ. मार्क्स–एंजल्स यांच्या पंथास कम्युनिस्ट म्हणत.) हे निरुपद्रवी व शांतिवादी आहेत. सद्यःस्थिति त्यांच्या दृष्टीनें कितीहि वाईट असो. तींत बदल व्हावयाचा तो शांतिमय मतपरिवर्तनानेंच घडवून आणला पाहिजे असें याचें म्हणणें होतें. यांचीं तत्त्वें इतकीं स्थूल आहेत कीं आजच्या स्थितीत त्यांस अनुयायी मिळणेंच कठीण आहे. ..... इतिहास कसा विकास पावतो या पद्धतीची यांना पर्वा नाहीं. माणसांनीं मनांत आणतांच एकदम कम्युनिझमची

स्थापना होऊं शकेल असें यांना वाटतें. राजकीय प्रगति होत होत कम्युनिझमच्या स्थापनेस अनुकूल काल येत असतो. जुनी समाजव्यवस्था परिपक्व होऊन गळून पडण्याच्या बेताला येते आणि कम्युनिझम शक्यच नव्हे तर अपरिहार्यच होतो हा इतिहासक्रम यांच्या ध्यानात येत नाही. मजूर वर्ग भांडवलदारांचा कां द्वेष करतो हें यांना समजतें. पण, असा द्वेष परिणामाच्या दृष्टीनें वांझोटा आहे असें यांचें म्हणणें असतें. त्यांना हें समजत नाही की मजूरांनीं आपलें ध्येय गांठण्याचा यत्न करण्याची प्रेरक शक्ति याच वर्गद्वेषांत आहे. आज (१८४५) इंग्लंडांत असलेल्या परिस्थितीत यांचें परोपकाराचें तत्त्वज्ञान व विश्वबंधुत्वाची घोषणा ही अगदी निरुपयोगी आहेत." (इंग्लंडांतील मजूरवर्गाची सद्यःस्थिति.)

चार्टिस्ट हेहि मजूर चळवळीच्या शास्त्राचे बाबतीत अडाणी आहेत हें एंजल्स यांस माहीत नव्हतें असें नाहीं. पण कांही असलें तरी ती मजूरांचीच चळवळ होती. म्हणून कम्युनिस्टांनी त्यांच्याशीं संबंध ठेवून त्यांना वळण द्यावें हें एंजल्स यास इष्ट वाटले. स्वत: एंजल्स असा खटाटोप करीतच होता.

## मालकीची पद्धती सदोप मानणारे अर्थशास्त्रज्ञ

ओवेन हा स्वत: भांडवलवाला असून भांडवलशाहीचा सुधारक होता. पण भांडवलशाही म्हणजे संपत्तिसाधनांचे बाबतीत खाजगी मालकीची पद्धतिच मोडली पाहिजे असें म्हणणारे अर्थशास्त्रज्ञहि त्या काळी निर्माण झाले होते. फरान्सच्या क्रांतीच्या काळींच गॉडविन यानें 'राजकीय न्याय' या आपल्या ग्रंथांत सर्व सामाजिक दुःखाचें मूळ 'खाजगी मालकींत' आहे असें म्हटलें आहे. चार्लस् हॉल हा १८०५ सालीं लिहिलेल्या 'युरोपांतील प्रजेवर खाजगी मालकीचे (सिव्हिलिझेशन) परिणाम' या आपल्या ग्रंथांत लिहितो कीं युरोपची चारपंचमांश संपत्ति लोकसंख्येपैकीं एकअष्टमांश लोकांच्या मालकीची झाली आहे.' 'संपत्तीच्या वाटणीचीं तत्त्वें' या १८२४ सालीं लिहिलेल्या ग्रंथांत विल्यम थॉम्सन हा, बेंथॅमच्या हयातींतच त्याच्या तत्त्वांची कशी धूळधाण झाली हें दाखवितांना म्हणतो की, 'माणसाच्या श्रमानें संपत्ति निर्माण होते हें अॅडॅम स्मिथ व बेंथॅम यांचें तत्त्व आज धुडकाविलें जाऊन मजूरास फक्त जगण्याइतकी मजूरी मिळते आणि त्याच्या श्रमानें वाढलेली संपत्ति सारी भांडवलदार व जमिनदार यांनाच मिळते. जॉन स्टुअर्ट मिल हा प्रथम भांडवलशाहीचा

कट्टा पुरस्कर्ता होता. पण पुढें भांडवलशाहीचे दोष दिसू लागल्यावर सोशॅलिझमकडे तो झुकू लागला. 'श्रमानें निर्माण झालेली संपत्ति केवळ जन्मसिद्ध वारसा हक्कानें श्रम न करणाऱ्यासहि मिळावी हा अन्याय आहे' असें मिल्लला पुढें वाटूं लागलें. तो म्हणतो, "संपत्तीच्या उत्पादनाचे कायदे जडवस्तुधर्मावरून बनलेले आहेत. पण वाटणीच्या पद्धति कांहीं मर्यादेच्या पलीकडे माणसांनीं आपल्या इच्छेप्रमाणें निर्माण केल्या आहेत. .... संपत्तीच्या वांटणीची हल्लींची पद्धति अगदीं वाईट आहे. जसजशी समाजपद्धतीत सुधारणा होत जाईल तसतशी वाटणीची हल्लीची पद्धति बदलली जाईल"

'सोशॅलिझम' हा शब्द १८३५ चे सुमारास प्रचारांत आला असून भांडवलशाही अथवा कॅपिटॅलिझम नामक समाजव्यवस्थेची दुःखें नाहींशी करून समाजकल्याण साधेल अशी कांहीं तरी व्यवस्था म्हणजे 'सोशॅलिझम' असा या शब्दास संदिग्ध अर्थ आला होता. ओवेन याच्या प्रयत्नासहि सोशॅलिझम असें नांव मिळालें. या सर्व प्रयत्नांहून आपल्या प्रयत्नाची भिन्नता दाखविण्यासाठीं पुढें मार्क्स व एंजल्स यांनीं आपल्या पक्षास 'शास्त्रशुद्ध सोशॅलिझम्' अथवा कम्युनिझम् असें नांव दिलें. भांडवलशाहीनें उत्पन्न केलेलीं दुःखें नाहींशी करण्याचें एकोणिसाव्या शतकाच्या अर्धापर्यंत मागें सांगितल्याप्रमाणें जे जे प्रयत्न झाले त्यांमुळें भांडवलशाही सदोष आहे या गोष्टीकडे विचारी लोकांचे लक्ष वेधलें खरें, पण भांडवलशाहीच्या चक्रव्यूहांतून मजूरवर्गास व एकंदर समाजास कसें सोडवावें व मानवजातीस सुखकारक अशा प्रकारची समाजव्यवस्था कशी निर्माण करावी याचा शास्त्रशुद्ध मार्ग कोणींच दाखविला नाहीं. हें काम पुढें कार्ल मार्क्स यानें केलें. मजूरचळवळीच्या जोरावर भांडवलशाहीला प्रतिकार करून सोशॅलिझमची स्थापना करूं पाहणारे जे जहाल–मवाळ पंथ साऱ्या जगभर आहेत ते सर्व कार्ल मार्क्सच्या विचारसरणीतून निघालेले आहेत. जे आपण मार्क्सचे अनुयायी नाहीं असें आग्रहपूर्वक सांगत असतात त्यांनाहि प्रथम मार्क्सनेंच भांडवलशाहीचें पृथक्करण व सोशॅलिझमची मांडणी शास्त्रशुद्ध पायावर केली ही गोष्ट मान्य आहे. 'कॅपिट्ल ग्रंथ, खाजगीपत्रें, टाचणें, जाहीरनामे इत्यादींतून मार्क्सनेंच प्रथम सोशॅलिझमचें पद्धतशीर विवेचन केलें' असें मॅक्डोनाल्ड म्हणतात. एच. जी. वेल्स यांच्या मतें मार्क्सनें कांहीं शब्दांची निवड केली ती सदोष असली

तरी त्यानें मांडलेल्या ठोकळ सिद्धांतांचा प्रत्यय आतां सर्वांस येत आहे. त्यानें वर्गयुद्ध उत्पन्न केलें नाहीं; पण इतरांस जें दिसत नव्हतें तें समाजांत प्रत्यहीं सर्वत्र कसें लढलें जात आहे हें मार्क्सनेंच प्रथम दाखविलें.'

मार्क्सच्या विचारासंबंधी अथवा त्याच्या श्रेष्ठतेसंबंधीं बोलतांना एंजल्स या मार्क्सच्या सहकाऱ्याचा उल्लेख अवश्य केला पाहिजे. दोघेहि जर्मन होते. ते अनुक्रमें १८१८ व १८२० सालीं जन्मले. म्हणजे ते समवयस्कहि होते. वयाच्या पहिल्या पंचविशीतच दोघांचा परिचय झाला व परिचयाचा दृढ स्नेह होऊन तो साऱ्या जन्मभर टिकला. विचारनावीन्याच्या बाबतींत मार्क्स हा कांहींसा अधिक तीक्ष्ण बुद्धीचा व संशोधक होता. एंजल्सनें मार्क्सची ही थोरवी जाणून जन्मभर त्याच्या दुय्यमाचें काम केलें, त्याला द्रव्याची अफाट मदत केली आणि मार्क्सच्या 'भांडवल' ग्रंथाचे पुढील दोन खंड व इतर वाङमय मार्क्सच्या मरणोत्तर मोठ्या मेहनतीनें संपादून छापून काढिलें. पण याशिवाय एंजल्स हा स्वतांहि फार विद्वान् लेखक होता. मार्क्सला सुचलेले कांहीं विचार एंजलसला स्वतंत्रपणें सुचलेले असून दोघांचेंहि एकत्र व स्वतंत्र असें लिखाण पुष्कळच आहे. विचाराचे बाबतींत दोघांत सूक्ष्म मतभेद असावा असें कोठें दिसतें. पण एकंदरीनें ज्याला मार्क्सिझम् अथवा मार्क्सचा पंथ असें म्हणतां येईल त्याचें जनकत्व मार्क्सप्रमाणें एंजल्सकडेहि आहे असें मानलें पाहिजे. जवळ जवळ सारखी बुद्धिमत्ता, पांडित्य, तत्त्वशोधनाची व समाजसेवेची हौस, विचार–साधर्म्य, समान कार्यक्षेत्र व मित्रप्रेम या बाबतींत इतिहासांत मार्क्स–एंजल्स ही जोडी अद्वितीय आहे. हें सर्व जाणून रायझेनॉफ यानें या दोघांचें मिळून एकच चरित्र लिहिलें आहे. मार्क्स व एंजल्स यांच्या तत्त्वांची व्यावहारिक प्रतीति रशियांत लेनिननें पाहून त्याच्या तत्वांत महत्त्वाची भरहि घातली. मार्क्स, एंजल्स व लेनिन यांचीं हीं तत्त्वें काय आहेत हें पुढील प्रकरणांत समजून घेऊं.

---

*

# प्रकरण १२ वें

# मार्क्स, एंजल्स व लेनिन यांचा कम्युनिस्ट पंथ

मार्क्सचें वैशिष्टय व श्रेष्ठत्व दाखविण्यासाठीं ईस्टमन यानें त्यास ' समाजघटनेचा एंजिनियर ' असें म्हटलें आहे. बाबिलोनचे मनोरे, आग्र्याचा ताजमहाल हे कल्पनासृष्टींत बांधून काढण्याचें काम लहान मुलेंहि फार चांगल्या प्रकारें करतात. मार्क्सच्या पूर्वीच्या भांडवलशाहीच्या सर्व सुधारकांनीं असे कल्पनेचे पुष्कळ किल्ले बांधले; पण त्यानें प्रत्यक्ष भांडवलशाहीची दुरुस्ती झाली नाहीं किंवा समाजाची हितकारक अशी पुनर्घटनाहि झाली नाही. भौतिक सृष्टींत प्रत्यक्ष किल्ला बांधण्यास नुसत्याच कल्पनेचा खेळ निरुपयोगी असून जसें एंजिनियराचें कौशल्य लागतें तसेंच कौशल्य सामाजिक पुनर्घटनेच्या बाबतीतही लागतें. तें कौशल्य मार्क्सनें दाखविलें. हें मार्क्सनें कशाप्रकारें केलें तें सांगतांना ईस्टमन लिहितो, "एकादी विद्यमान् समाजघटना बदलून अधिक चांगली करावयाची असल्यास एंजिनियर नवीन घटना कशी असावी याचें एक ठोकळ चित्र मनाशी तयार करतो. मग तो विद्यमान समाजघटना व पूर्वीच्या समाजघटना यांचें परीक्षण करून कोणत्या शक्तींनी त्या घटनांचें नियंत्रण झालें व होत आहे आणि त्यांच्या घडामोडीचे नियम काय आहेत हें पाहतो. या संशोधनानें वस्तुस्थितीचें पूर्ण ज्ञान झालें व आपणास हवी तशी नवी घटना उभारणें या परिस्थितींत शक्य आहे असेंहि त्याला वाटलें म्हणजे तो नवी घटना निर्माण करण्याच्या दिशेनें माणसांची व वस्तूंची हालचाल कशी व्हावी याचा कार्यक्रम ठरवितो." मार्क्सनें साऱ्या आयुष्यभर मुख्यतः जें केलें तें हें असें ईस्टमन म्हणतो.

### ध्येयभूत समाजव्यवस्था

भावी समाजघटनेचें ढोबळ चित्र तयार करतांना स्वातंत्र्य, समता, बंधुभाव व संपत्तीची मालकी हीं फ्रान्समधील प्रसिद्ध राज्यक्रांतीच्या पुरस्कर्त्यांनीं प्रतिपादिलेलीं तत्त्वें जास्तींत जास्त प्रमाणांत साधतील

अशी समाजव्यवस्था मार्क्सनें कल्पिली आहे. मनुष्य हा एकटा नांदूं शकत नसून समाज करूनच राहणार हें त्यास स्पष्ट दिसत होतें. सामुदायिक राहणींतच व्यक्तीसाठीं हीं तत्त्वें त्याला साधावयाचीं होतीं. या भावी ध्येयभूत समाजघटनेंत मार्क्सच्या कल्पनेप्रमाणें माणसानें सृष्टीवर संपत्त्युत्पादनाचे बाबतींत शास्त्रीय ज्ञानाच्या साहृयानें पूर्ण प्रभुत्व मिळविलेलें असेल. अर्थात् संपत्त्युत्पादनाचें काम सुकर व अल्पकालाचें होईल. समाजांत एकाचें प्रभुत्व दुसऱ्यावर राहणार नसून परस्परांस परस्परांच्या साहाय्याची सारखीच गरज लागेल आणि कोणतीहि सक्ति करावी न लागून सामाजिक व्यवहार सर्वांच्या स्वेच्छ सहकार्यानें चालेल. 'तत्त्वज्ञानाचें दारिद्र्य' या ग्रंथांत मार्क्स लिहितो– "कामगार वर्गाची प्रगति होता होता अखेरीस तो वर्ग सध्यांची समाजघटना नाहीशी करून अजिबात वर्गहीन अशा समाजाची स्थापना करील. एका वर्गानें दुसऱ्या वर्गावर बळजोरी करण्यासाठी आज स्थापलेली राज्यसंस्थाहि त्या काळी राहणार नाहीं." सहकार्य हें समाजघटनेचें मुख्य तत्त्व असेल. कोणाची कोणावर सक्ति राहणार नसल्यानें स्वातंत्र्य, समता व बंधुभाव नांदेल. उत्पादक संपत्ति ही सामुदायिक राहील आणि भोग्य संपत्ति, ज्याच्या त्याच्या गरजेप्रमाणें त्यास मिळेल. आज समाजांतील शेंकडा नव्वदांस भोग्य संपत्ति, मिळत नाहीं. पण त्या वेळीं ती सर्वांस मिळेल. 'खाजगी मालकी' ची संस्था रद्द करावी असें जें मार्क्सचें तत्त्व आहे त्याचा अर्थ असा कीं, उत्पादक संपत्ति, यंत्रें वगैरे खाजगी मालकीचीं नसावीं; तीं सामुदायिक मालकीचीं असावीं म्हणजे भोग्य संपत्तीचा वाटा जो आज सर्वांस मिळत नाहीं तो सर्वांस मिळूं लागेल.

## इतिहासाचा आर्थिक उलगडा

ध्येयभूत समाजाचा असा नमुना तयार केल्यावर या दृष्टीनें प्राचीन व विद्यमान् समाजघटनांचें नियंत्रण कोणत्या नियमांनीं होतें, समाजघटनेंत कोणते पालट होतात, त्यांचे नियम कोणते याचें संशोधन करण्यांत व विद्यमान् समाज घटनेचें स्वरूप उलगडून दाखविण्यांत शेंकडों पृष्ठें भरतील इतकें मार्क्सचें लिखाण खर्चीं पडलें आहे. माणसाच्या इतिहासांत घडणारीं स्थित्यंतरें कशामुळें होतात याबाबत मार्क्सनें सांगितलेल्या सिद्धांतानें समाजशास्त्राच्या इतिहासांत विलक्षण क्रांति केली. माणसाच्या कल्पना जशा बदलत जातील

तसतसें समाजाचें रूप व घटना बदलत जातात असें मत पूर्वी रूढ होतें. लोकांना राजसत्ता, सरदारसत्ता, लोकसत्ता जी कोणती हवी असेल ती ते निर्माण करतात व तदनुसार मग समाजघटना बदलते असें हें मत होतें. मार्क्सनें हें मत खोडून काढून असें दर्शविलें आहे कीं, "संपत्ति निर्मितीचीं साधनें ज्या प्रकारचीं असतील तदनुसार माणसाचें सृष्टीशीं कोणतें तरी नातें उत्पन्न होतें आणि संपत्ति उत्पन्न करण्याचा प्रकारहि त्यानेंच निश्चित होतो. इतकेंच नव्हे तर मनुष्याची समाजस्थिति व त्याच्या कल्पनाहि कोणत्या प्रकारच्या असतात हें त्यावरूनच समजतें." (कॅपिटल्). संपत्ति निर्माण करण्याच्या प्रकाराला इतकें महत्त्व येण्याचें अगदीं सोपें कारण एंजल्सनें म्हटल्याप्रमाणें असें आहे कीं माणसाला अन्न, पाणी, वस्त्र व आश्रय या वस्तु प्राप्त करून घेण्यासाठी अनुदार सृष्टीशी जो झगडा आज हजारों वर्षें करावा लागला आहे त्यानें स्वाभाविकच त्याचें सर्व लक्ष वेधलें असून संपत्ति उत्पन्न करण्यासाठी अधिकांत अधिक अनुकूल परिस्थिति निर्माण करून घेण्यासाठींच मुख्यतः त्यानें सर्व खटाटोप केला आहे. मार्क्सच्या या सिद्धांतास 'इतिहासाचा भौतिक अथवा आर्थिक दृष्टीनें उलगडा' (मटीरिॲलिस्टिक इंटरप्रिटेशन ऑफ् हिस्टरी) असें म्हणतात.

क्रिकेटच्या मैदानावर क्षेत्ररक्षण करण्यासाठीं जे खेळाडू उभे करतात ते आपल्याकडील पेशवाईतील सैन्याप्रमाणें हवे तसे सैरावैरा धांवत नाहींत किंवा कोठें तरी, कसे तरी वेडेवांकडे उभे राहात नाहींत. खेळणारानें मारलेला चेंडू अडविणें हें सर्वांचें ध्येय असतें. त्याप्रमाणें चेंडू कोठून, कसा जाऊं शकतो याचे नियम ठरवून त्याप्रमाणें जागजागीं खेळाडू उभे करतात. म्हणजे चेंड अडविणें. या सामान्य ध्येयासाठीं चेंडू उडण्याच्या सामान्य नियमानुसार खेळाडूंची क्षेत्रावर रचना होते. तसेंच लढणाऱ्या सैन्याचें, अथवा बांधल्या जाणाऱ्या इमारतीवरील कामगारांचें, अथवा शिकारीस वेढणाऱ्या शिकाऱ्यांचें. ह्या सर्वांची त्या त्या ध्येयानुसार कांहीं तरी रचना असते. प्रत्येकाचें वेगवेगळें काम असतें व सर्व जण मिळून तें ध्येय सिद्ध करीत असतात. त्यांत कांहीं हुकूम गाजविणारे असतात व इतरांस तो मानणें हें काम असतें. असेंच माणसाच्या समाजरचनेचें. समाजरचनेचें पहिलें ध्येय काय ? चरितार्थ संपत्ति मिळविणें. कारण 'शरीरमाद्यं खलु धर्मसाधनम्'. त्याचीं

साधनें जशीं असतील तसा त्यांचा उपयोग करण्यायोग्य समाजरचना करावी लागणार हें उघड आहे. उदाहरणार्थ, ॲरिस्टॉटलच्या काळी समाजरचना करतांना संपत्ति निर्मिण्याचीं साधनें अगदींच तोकडीं होतीं, हा मुद्दा महत्त्वाचा होता. या साधनांनीं संपत्ति निर्माण करण्यांत जी अतोनात यातायात पडे; त्यामुळें रात्रंदिवस चाबूक खाऊन राबणारे गुलाम व त्यांच्यावर हुकूम गाजविणारे नागरिक अशी समाजव्यवस्था होती. ज्या प्रदेशांत जमीन सुपीक असून नांगर, कुळव वगैरेच्या साह्यानें पीक बरें निघे. यामुळें पाठीवर कोरडा न बसतांहि संपत्त्युत्पादनास थोडासा हुरूप असे, तेथें स्वतंत्र शेतकऱ्यांचीं शेतें व त्याची खेड्यांची वमाहत असे. जुन्या पद्धतीचे नांगर, कुळव व साधीं खतें यांमुळें प्रचंड प्रमाणावर शेती शक्यच नव्हती. म्हणून लहान शेतकऱ्यांची शेती व अनेक स्वतंत्र शेतकरी असा समाज होता. मध्ययुगाच्या शेवटी इंग्लंडांत शास्त्रीय शोधांनीं प्रचंड शेती शक्य झाली तेव्हां मोठ्या जमिनीचा एक मालक व त्या जमिनीवर खपणारे अनेक मजूर अशी शेतीतील भांडवल-शाही सुरू झाली. तसेंच कोष्टीकाम, सुतारकाम इत्यादि हस्तव्यवसायांचेंहि. हत्यारें जेव्हां लहान होतीं तेव्हां धंदेहि लहान लहान म्हणून ज्याचे त्याचे स्वतंत्र मालकीचे होते. पुढें यांत्रिक शोध लागून हत्यारें फार मोठी झालीं ––यंत्रें झालीं, तेव्हां यंत्राचा मालक एक व त्यावर राबणारे मजूर हजार असा प्रकार सुरू झाला.

येथें अशी शंका घेऊं कीं क्रिकेटचे खेळाडू, लढाईचें सैन्य, शिकारवाले अथवा इमारतवाले यांच्यारचना, पूर्वी कोणीं तरी कांहीं तरी योजना आंखून व सर्व घटकांस कळवून घडवून आणीत असतात, त्याप्रमाणें ॲरिस्टॉटलनें गुलामांची सभा भरवून व जरूरीप्रमाणें त्यांचें मतपरिवर्तन करूनहि गुलाम-गिरी स्थापन केली काय? नाहीं.

मार्क्सनें याचें उत्तर असें दिलें आहे कीं, ज्या वेळीं पुष्कळांना सक्ति करून संपत्ति–उत्पादनाच्या कामीं लावणें जरूरच असते त्या वेळीं कांहीं थोडे अधिक शहाणे व शूर लोक दुसऱ्या पुष्कळ कमी शहाण्यांस व दुर्बलांस संपत्त्युत्पादनाचे कामीं राबवितात. तेहि क्रिकेटच्या कप्तानाप्रमाणें सर्वांच्या सामुदायिक कल्याणासाठीं राबवीत नाहींत. हे थोडे शहाणे व शूर स्वतांला सुख लाभावें, चैन चालावी म्हणून बहुसंख्य मूर्ख व दुर्बलांस संपत्त्युत्पादनाचे कामीं राबवि-

तात. यामुळें शूर–शहाण्या अल्पसंख्यांचा एक वर्ग व मूर्ख–दुर्बल बहुसंख्यांचा एक वर्ग होऊन यांचे दरम्यान पहिल्या वर्गाची दुसऱ्यावर बळजोरी व पहिल्या वर्गाकडून दुसऱ्यानें निर्मिलेल्या धनाची लुबाडणूक होत असते. यामुळें या दोन वर्गांचे दरम्यान जो विरोध उत्पन्न होतो त्यास मार्क्स 'वर्गकलह' असें म्हणतो. एका वर्गानें दुसऱ्या वर्गास उत्पादक श्रम करण्याची सक्ति करून त्याचें उत्पन्न धन लुबाडणें हें यांतील रहस्य होय. ॲरिस्टॉटलनें किंवा त्याच्या मुनीमानें गुलामास कोरडे मारणें हा एकच सक्तीचा प्रकार नव्हे. याहून पुष्कळ 'सुधारलेला' हल्लीचा सक्तीचा प्रकार असा आहे कीं संपत्ति निर्माण करण्याचें साधन यंत्र अथवा जमीन ही ज्याच्या मालकीची असते तो दुसऱ्या कफल्लकास त्याच्या चरितार्थापुरती मजूरी देऊन त्यास कामावर नेमतो व त्याकडून जास्तीत जास्त धन निर्माण करून घेऊन तें स्वतां बळकावतो. जमीन–यंत्र इत्यादि भांडवलाच्या मालकास कफल्लकावर कामाची कायदेशीर सक्ति करतां येत नाही खरी; पण कफल्लकाजवळ भांडवल मुळींच नसल्यानें त्यास मालकाच्या भांडवलावर काम केल्याशिवाय गत्यंतरच नसतें. आणि मग बाह्यतः स्वतंत्र पण भुकेच्या चापांत सांपडलेला कफल्लक पोटापुरत्या मजूरीवर त्याच्या दुप्पटतिप्पट धन उत्पन्न करतो व तो वाढावा मालकास मिळतो. एका वर्गानें दुसऱ्यावर उत्पादनाची सक्ति करून त्यास लुटणें हा प्रघात समाजांत सर्व काळी चालत आला आहे असें मार्क्सचें म्हणणें आहे.

उत्पादन–प्रकारावरून समाजाची इतर भौतिक परिस्थिति व संस्कृतीहि ठरते व कळते हें कसें? अहोरात्र चाबकाच्या रट्ट्याखालीं राबणारा जो गुलाम त्याची मानसिक उन्नति होणेंच अशक्य. पण ऑरिस्टॉटलच्या नागरिक वर्गास गुलामांची संपत्ति आयती मिळत असल्यामुळें त्यास सुबत्ता व फुरसत यांचा लाभ होऊन त्यांची मानसिक उन्नति झाली. पण सुबत्ता व फुरसत यांनीं जर मानसिक उन्नति होते तर हीं दोन्ही भरपूर असणारे हिंदुस्थानांतले शेंकडो संस्थानिक मूर्ख, अजागळ, नादान असे कां आहेत? याचें कारण असें कीं नुसती फुरसत व सुबत्ता यांनींच श्रेष्ठ माणुसकी प्राप्त होत नाहीं. ॲरिस्टॉटलच्या वर्गास गुलामावर 'प्रभुत्व' गाजवून त्याजकडून संपत्ति निर्माण करून घ्यावी लागे, म्हणजे त्यास प्रभुत्व गाजविण्याची संधि आणि जरूरीहि होती. आमच्या संस्थानिकांची स्थिति अशी

आहे कीं, त्यांना प्रभुत्वाची संधि असली तरी गरज फारशी नाहीं. ब्रिटिश सैन्याचा त्यांना पाठिंबा असल्यामुळें त्याच्या जोरावर यांना प्रजेबद्दल निर्भय राहतां येतें व निर्भयपणामुळें हे बेसावध, बेदरकार व मूर्ख होतात. असो. तर गुलामांना जुलूम व अतिकष्ट यांमुळें संस्कृति नव्हती आणि ॲरिस्टॉटलच्या वर्गास सुबत्ता, प्रभुत्वाची संधि व जरूरी आणि फुरसत यांमुळें संस्कृतिविकास झाला होता हें कळलें. यांत मुद्दा हा आहे कीं गुलामगिरीच्या उत्पादनप्रकारांत बहुसंख्य लोक पशुवत् असतात व अत्यल्प संख्य हे सुसंस्कृत असतात. त्यांतहि विशेष असें की सुसंस्कृत असूनहि ऑरिस्टॉटल गुलामगिरीचें समर्थन करी. कारण एरवी त्यास आयतें खावयास मिळतेंना व असें खावयास मिळाल्याखेरीज त्याचा संस्कृतिविकास होताना. हल्लींच्या भांडवलशाहीच्या उत्पादनप्रकारांत म्हणजे यांत्रिक व शास्त्रीय उत्पादनाच्या काळांत उत्पादन सुलभ झालें आहे. यामुळें पूर्वींहून पुष्कळांना सुबत्ता व फुरसत वाढली आहे. सृष्टीवर प्रभुत्व गाजविण्याचीं साधनें व जरूरीहि आहे. यामुळें बौद्धिक विकासहि वाढला आहे. आगगाड्या, छापखाने, संघटनेचीं साधनें व विचार यांनीं वर्गकलहांतील उभय पक्षांचेंहि बळ वाढत असून एकमेकांवर प्रभुत्व गाजविण्याचा झगडा तीव्र झाला आहे. यामुळें एकमेकांची कर्तबगारी व संस्कृतीहि वाढली आहे.

बौद्धिक उत्कर्ष उत्पादनप्रकारावरून ठरतो व कळतो तसेच राज्यसंस्थेचें धर्मविचारांचें व इतर समाजस्थितीचें. गुलामांचा राजकीय हक्क मागण्याइतका माणुसकीचा विकास होणें शक्य नसे व तो झालाहि नाहीं. पण ज्या काळांत प्रचंड उत्पादन नसून वाहतूकीची साधनें नव्हती तेव्हां व्यापक लोकशाहीहि नव्हती. खेड्यांतील थोड्याशा लोकसंख्येचा राज्यकारभार पंचायतींच्या द्वारां चाले. दूरच्या दिल्लींत राजा राज्य करतो कीं चोर राज्य करतो याची शेतकऱ्यांस फिकीर नसे. प्रजा अशी बेगुमान, निरनिराळ्या डबक्यांतल्या माशांप्रमाणें आपल्याच व्यवसायांत गुंतलेली. यामुळें सरदारांचीं भांडणें व सरदार वर्गाचें राज्य अशी राजवट होती. पुढें कारखान्याच्या थोड्या क्षेत्रांत पुष्कळ लोक एकत्र राहूं लागल्यावर एकमेकांचें जीवित निगडित झालें. आगगाडीनें दळणवळण वाढलें व जनतेस मतदानाचा हक्क मिळून लोकशाही सुरू झाली. पण येथेंहि संपत्तिसाधनें भांडवलवाल्यांचे हातीं

असल्यानें लोकांचें आर्थिक जीवन त्यांचेच हातीं आलें व त्यांनीं मजूरांकडून मतें मिळवून राज्ययंत्र बळकावलें. या राज्ययंत्राचा म्हणजे प्रभुवर्गाच्या संघटित बळाचा उपयोग खालच्या वर्गाची लूट करण्यासाठींच झालेला आहे. राजे व सरदार आपल्या सैन्याचे बळावर प्रजेच्या धनाची लूट करीत आणि आजचे भांडवलवाले स्वदेशांत आणि परदेशांत लूट मिळविण्यासाठी या राज्यसंस्थेच्या दंडाचाच उपयोग करतात.

कृषीवल समाजास ज्ञानार्जनाची साधनें नसून सृष्टीच्या अनिश्चित घडामोडींत त्याचें जीवित गुरफटल्यामुळें तो मूर्ख व पिशाच्चपूजक होता. पण त्या वेळींहि समाजांतील प्रभु वर्गानें ईश्वर निर्गुण व निराकार आहे व कांहींहि करीत नाहीं असें आपल्या कुशाग्रबुद्धीनें ठरवून स्वतांस निरीश्वर व स्वतंत्र करून ठेविलेंच होतें. गीतेंतील चाणाक्ष कृष्ण मूर्खास उद्देशून 'योगक्षेमं वहाम्यहं', 'मामनुस्मर' असें सांगतो व शाहण्यासाठी 'न कर्तृत्वं न कर्माणि लोकस्य सृजति प्रभु:' असें सांगतो याचा उलगडा असा आहे. धर्मपुरोहितांनीं आजवर जे प्रभु वर्ग होते त्यांच्या बाजूनें धर्माचा निवाडा दिला. ख्रिस्ती पुरोहितांनी ख्रिस्तास बासनांत बांधून ठेवून व्याजबट्टयास परवानगी दिली आणि हातांत तरवारी घेऊन व ख्रिस्ताचें नांव घेऊन परदेशीयांच्या माना कापण्यास सांगितलें. आणि गांधीनीं अनत्याचाराच्या सिद्धयर्थ हिंदी लोकांना जर्मनांचा जीव घ्यायला सांगितलें. धर्म हा प्रभु वर्गासाठीं हवी तशीं रूपें पालटतो हेंच यानें सिद्ध होतें.

## उत्पादनप्रकार कसा बदलतो

आणखी एक शंका येते ती अशी की, उत्पादनप्रकार माणसाचें जीवन नियंत्रित करतो हें खरें; पण समाजाचा पालट म्हणजे आधीं उत्पादनप्रकाराचा पालट कसा होतो ? मार्क्स या शंकेस असें उत्तर देतो कीं सृष्टीवर अधिकाधिक प्रभुत्व मिळवून माणूस आपलें हत्यार अधिकाधिक चांगलें करीत असतो. हें सुधारेल तसतसा त्याचा उत्पादनप्रकार बदलतो व तरवारी जाऊन बंदुक, तोफ, विमान उत्पन्न झालें म्हणजे जशी सैन्यरचना बदलते त्याप्रमाणें उत्पादन प्रकार बदलला कीं तदनुसार एकंदर समाजघटना, संस्कृति, चालीरीति बदलतात. याच क्रमांत गुलामगिरी जाऊन कृषीवल समाज व सरदारशाही आली. पुढें ती मोडून भांडवलशाही व लोकशाही आली. इग्लंडांत भांडवल-

शाहीची भरभराट झाली तशी लोकशाहीहि गाजली. आतां निर्यात माल कमी होऊन भांडवलशाही गांगरल्याबरोबर लोकशाहीच्याहि नाड्या आवळल्या आहेत. जर्मनींत व इटालींत भांडवलशाहीस परकीय प्रतिस्पर्ध्यांशीं अटीतटीनें झगडा करावा लागत असल्यानें तेथें लोकशाहीचा मुडदा झाला आहे व भांडवलवाल्यांनीं राज्यसूत्रें आपल्या हातीं ठेविली आहेत. रशियांत संपत्तिसाधनांची खाजगी मालकी नष्ट करावयाची असल्यानें भांडवलवाल्यांना कोणतेच हक्क नाहींत व अजून आर्थिक परिस्थिति चांगली नसल्यानें मजूरांनाहि राजकीय हक्क म्हणजे राजैश्वर्य भोगण्याआधीं कष्टांत व गरीबींत जन्म काढावा लागत आहे. रशियांत उत्पादनशक्तीची पूर्ण वाढ झाली व इतर देशांत भांडवलशाहीची उत्पादनपद्धति जाऊन सोशॅलिस्ट पद्धति उत्पन्न झाली म्हणजे मार्क्सच्या मताप्रमाणें हल्लींची समाजरचना सर्वस्वीं बदलून जाईल.

समाजव्यवस्था बदलते कशी याचा हा प्रपंच झाला. आतां प्रस्तुत भांडवलशाही मोडून नवीन समाजघटना कशी होईल व त्यासाठी माणसांनीं काय करावें यासंबंधी मार्क्सचे विचार खालीलप्रमाणें आहेत. पहिल्या प्रकरणांत 'वाढाव्या'ची जी उपपत्ति सांगितली तो मार्क्सचा फार मोठा शोध असून त्यावर त्यानें भांडवलशाहीची मीमांसा उभारली आहे. भांडवलशाहीस म्हणजे एकाची जमीन, माग, यंत्र व त्यांवर त्यानें दुसऱ्यास नेमणें हा प्रकार सुरू होण्यास प्रथम काय अत्यवश्य आहे ? भांडवलवाल्यास स्वतांचे पोट भरून काम करण्यास नेमलेल्या मजूरास देण्यासाठी कांहीं संचित धन असलें पाहिजे. हें भांडवलवाला स्वतांचे पोटास चिमटा घेऊन सांचवितो असें कोणीं वाटल्यास समजावें. पण ज्या इंग्लंडांत भांडवलशाही सुरू झाली तेथें मागें एके ठिकाणीं सांगितल्याप्रमाणें शेतकऱ्यांस जमिनींतून हुसकून लावून, उत्पादकांपासून थोड्या किंमतीस घेतलेला माल भारी किंमतीस विकून व अमेरिकेंतून सोनें आणून पहिल्या भांडवलवाल्यांनीं पहिलें भांडवल उत्पन्न केलें. पण नुसतें पहिलें भांडवल उत्पन्न केल्यानें, भांडवलशाहीची एकसारखी वाढ झाली ती कशी होऊं शकेल ? बाजारांत सारख्या वस्तूंचीच अदलाबदल होते तर भांडवलवाल्यांजवळ इतरांहून अधिक पैसा कोठून आला ? प्रत्येक माल विकणारा मालाच्या किंमतीहून अधिक मोल

घेऊन माल विकतो म्हटलें तर प्रत्येक जण एकदां दुकानदार व पुन्हां दुसऱ्या दुकानदारापुढें गिऱ्हाइक होतोच. तेव्हां फिटंफाट होऊन अखेर सर्वाजवळ सारखेंच धन राहणार. तेव्हां बाजाराच्या या गलबलींत आपल्या मूळ किंमतीहून अधिक मूल्य देणारा एकादा पदार्थ असला पाहिजे ही शंका मार्क्सला आली. ही एक पैशाचा उकिरडा फुंकून तोळाभर सोन्याचें अंडें घालणारी कोंबडी कोठें मिळते याचा मार्क्सनें शोध केला. ती त्याला मजूरांच्या बाजारांत आढळली. ही सोन्याचें अंडें घालणारी कोंबडी, हंसी कांहीं म्हणा, म्हणजे पहिल्या प्रकरणांत प्रपंचिलेली मजूराची श्रमशक्ति. ही रोज वाढाव्याचें अंडें घालते. यामुळें आणखी श्रमशक्ति, आणखी वाढावा, आणखी श्रमशक्ति, आणखी वाढावा अशी भांडवलवाल्याची संपत्ति वाढूं लागते. सहकार्य, श्रमविभाग व पुढें यंत्रें यांनीं ही संपत्ति सारखी वाढत जाऊन प्रथम लहान धंदेवाले बुडतात व मजूरांची वाढ होते. भांडवलवाल्यांत संघटन होतें, भांडवलशाहीची साम्राज्यशाही होते, माल खपत नसूनहि दारिद्र्य वाढतें. पुढें युद्धें होतात व त्यांनीं दुःखें थांबत नाहीत वगैरे विवेचन पूर्वी केलें तें मार्क्सच्या पद्धतीनेंच केलें असल्यानें येथें पुनरुक्तीचें कारण नाहीं.

भांडवलशाहीच्या या मीमांसेपासून मार्क्सनें कांही महत्त्वाचे सिद्धांत सांगितले असून जी सोशॅलिस्ट समाजघटना त्यास पुढें स्थापावयाची आहे तीस हे सिद्धांत अनुकूल आहेत. भावी समाजघटनेंत पहिली इष्ट गोष्ट ही आहे कीं, यंत्रें, शास्त्रज्ञान व माणसाची कर्तबगारी यांच्या साहचानें माणसाचें सृष्टीवरील प्रभुत्व इतकें वाढलें पाहिजे कीं, कोणावरहि असह्य सक्ती न करतां सुखानें संपत्ति उत्पन्न होऊं शकली पाहिजे. भांडवलशाहीनें हें काम उत्कृष्ट बजाविलें आहे. साऱ्या जगाच्या पाठीवर मढ्यासारखीं सुस्त राहणारीं, नाही तर गाढवासारखीं मूर्खपणें राबत राहणारीं माणसें भांडवलवाल्यांनीं लोभासाठीं कां होईना हुसकून आणून त्यांना चपळ, कर्तबगार, चतुर, दक्ष व कार्यक्षम बनविलें आहे. शास्त्रें व यंत्रें यांचे शोध इतके विलक्षण लागले आहेत व पुढें लागतीलसें वाटतें कीं माणसाची संपत्ति उत्पन्न करण्याची शक्ति अपरंपार वाढून सुखानें संपत्ति निर्मिणें आजच सहज शक्य झालें आहे.

येथें आपण अशी शंका घेऊं कीं, भांडवलशाहीनें मानवजातीची कर्तबगारी वाढवून आतां कोणासहि ददातीचें कारण शिल्लक ठेविलें नाहीं.

हें जर खरें तर भांडवलशाहींत सर्व जगांतील मानवांचा सुखानें संभाळ होण्यास काय हरकत आहे? या प्रश्नाचें उत्तर देतांना भांडवलशाही ही मनुष्यसमाजाचा असा सुखानें सांभाळ करूं शकत नाहीं असें मार्क्सनें सप्रमाण सिद्ध केलें असून भांडवलशाहीच्या गेल्या शंभर वर्षांच्या इतिहासानें ही गोष्ट इतकी अनेकवार व अनेक प्रकारें सिद्ध केली आहे की, सॉल्टर, हॉब्सन, कीन्स या भांडवलशाहीच्या पुरस्कर्त्या पंडितांची भांडवलशाहीबद्दल निराशा झाली आहे.

## भांडवलशाहीचा अंगभूत दोष

भांडवलशाहीचा अंगभूत असा मानवजातीवर संकट आणणारा दोष कोणता? या प्रश्नाचें उत्तर भांडवलशाहीचा व्यवहार आजवर कसा चालत आला याचें थोडेसें निरीक्षण केल्यानें मिळणार आहे. ज्या इंग्लंडांत भांडवलशाही प्रथम सुरू झाली तेथूनच आपण सुरुवात करूं. भांडवलवाला, समजा, एक दिवस मजूरांच्या बाजारांत आला. तेथें काम मागण्यासाठीं उभे असणाऱ्या मजूरांस तो आपल्या कारखान्यांत घेऊन गेला. मजूर हे अडलेले होते. म्हणून ते निवळ चरितार्थापुरत्या मजूरीवर कारखानदाराच्या कारखान्यांत कष्ट करते झाले. अशा अनेक मजूरांनीं कारखानदारास १०० रुपयांचा माल तयार करून दिला व मालकानें मजूरांस २० रुपये मजूरीदाखल वाटले. पुढें कारखानदार माल घेऊन बाजारांत गेला. तेथें त्याचे मजूर माल खरेदीस आले. त्यांनीं कांहीं तो सर्व माल घेतला नाहीं. त्यांच्याजवळ फक्त २० रुपयेच होते. २० रुपयांचा माल त्यांनीं घेतला. बाकीचा ८० रुपयांचा कोणीं घेतला? गांवांत इतर खाजगी लहान प्रमाणावर चालणारे जुने धंदे होते, त्यांचाहि माल बाजारांत आलाच होता. पण तो कारखान्याच्या मालापेक्षां महाग पडत होता. म्हणून खाजगी धंद्याचें गिऱ्हाइक कारखान्याच्या धंद्यास आलें व कारखान्याचा माल खपला. कारखानदारास ८० रुपये मिळाले. पैकीं २० रुपये भांडवल, कच्चा माल—यंत्रें वगैरेची झीज व खर्च वगैरेसाठीं झालेला मालकाचा खर्च भरून काढण्यास गेले. उरले रुपये ६०. हा मजूरांनीं मोबदला न घेतां कारखानदारास दिलेला वाढावा. हा खर्चून मालकानें कारखान्यांतील भांडवल वाढविलें. माल न खपल्यानें ज्यांचे लहान धंदे बुडाले ते मजूर होऊन कारखानदाराच्या वाढलेल्या भांडवलाशीं कष्ट करते झाले. आणखी मालकाचा वाढावा वाढला. आणखी जुने धंदे

बुडून मालकाचें गिऱ्हाइक वाढलें. कारखान्याच्या धंद्यांत वाढावा म्हणजे नफा खूप मिळतो म्हणून जवळची थोडीफार पुंजी असेल तिचें भांडवल करून अनेक लोक कारखानदार झाले. अनेक जुने धंदे बुडून मजूरहि अनेक झाले. हें तरी असें सुसूत्र चाललें काय ? हें सुसूत्र चालण्यास मुख्य परिस्थिति कोणती पाहिजे ? वर आपण पाहिलें कीं, कारखान्यांतील मजूरांनीं १०० रुपयांच्या मालापैकीं फक्त २० च रुपयांचा माल घेतला. बाकीच्या मालास जें गिऱ्हाइक मिळालें तें लहान, खाजगी धंद्याच्या मालाचें मिळालें व त्यामुळें ते खाजगी धंदे बुडाले. असेंच प्रत्येक खेपेस प्रत्येक भांडवलवाल्याच्या बाबतीत व प्रत्येकाच्या बाबतीत वाढत्या प्रमाणावर चालले. म्हणजे काय चाललें ? असें चाललें की कारखानी मजूरांनी एकपंचमांश माल खरेदी करावा व बाकीचा माल बाहेरच्या गिऱ्हाइकांनी घ्यावा. यामुळें लहान धंद बुडावे व कारखानदाराचें भांडवल व मजूरहि वाढावे. आणखी 'वाढावा' वाढत जावा, आणखी बाहेरचें गिऱ्हाइक यावें. माल निर्माण करणारे मजूर व त्यांच्या दुपटीतिपटीनें माल ही वाढत असतात व प्रत्येक वेळीं बाहेरचें नवें गिऱ्हाइक यावें लागतें. पण मालाची निपज ज्या वेगानें वाढते त्या वेगानें गिऱ्हाइक वाढूं शकत नाही; मग माल खपेनासा होतो व नवीन निर्माण होणें बंद होतें आणि बेकारी वाढते. माल खपविण्याच्या चढाओढींत उत्पादनाचा खर्च कमी करण्याची चढाओढ लागते व काटकसर आणि सुव्यवस्था (रॅशनलायझेशन) व उत्पादनाचा खर्च मजूरांच्या मजूरीहून कमी लागणारीं यंत्रें यांचा उपयोग वाढून आणखी बेकारी वाढते व दारिद्र्यामुळें पुन्हां गिऱ्हाइक घटतें. एका देशांत सुरू झालेली भांडवलशाही इतर देशांत सुरू झाली म्हणजे तेथेहि सर्व असेंच घडतें. गिऱ्हाइक नेहमीं वाढतें हवें म्हणून राज्यकर्ते नवीन प्रदेश जिंकतात, एकमेकांत भांडतात आणि प्रजेचा व धनाचा चक्काचूर करतात.

पण यांनीं अडचणी न संपून शेवटीं एकदां अशी वेळ येते कीं, स्थूलमानानें जगांत एका बाजूस जमिनी, कारखाने वगैरे भांडवलाचे मालक व दुसऱ्या बाजूस उत्तम, बौद्धिक काम करणारापासून निवळ हमाली करणारा येथपर्यंतचे मजूर असे दोन वर्ग राहतात. पुन्हां थोडें मागें वळूं. पहिल्या शंभर रुपये किंमतीच्या मालापैकीं २० रुपयांचा माल त्याच्या मजूरांनीं घेतला. बाकीचें गिऱ्हाइक 'बाहेरून' मिळालें. पण आतां साऱ्या जगांत

भांडवलवाल्यांचा एक पंचमांश माल साऱ्या जगांतल्या मजूरांनीं घेतल्यावर बाकीच्या चारपंचमांशासाठीं आतां जगाच्या 'बाहेरचें' गिऱ्हाइक कोठलें आणायचें? भांडवलशाहीच्या एक शतकाच्या अमदानींत घरच्या मजूरांहून अधिक असें 'बाहेरचें' गिऱ्हाइक मालाच्या वाढीच्या वेगानें न मिळाल्यानें दर ७।८।१० वर्षांनीं मालास तुब येई व नवीन माल निघणें थांबे. बेकारी वाढे व सर्व समाजावर आर्थिक संकट येई. पुढें भांडवलवाल्यांचे हस्तक राज्यकर्ते रोज नव्या मागसलेल्या जगाचीं कवाडें खोलून नवें गिऱ्हाइक भांडवलवाल्यास मिळवून देत. यामुळें 'बाहेरचें' गिऱ्हाइक मिळून मालाचा उठाव होई. पण आगींत तेल घातल्याप्रमाणें नव्या बाजारपेठांमुळें ही भांडवलाची आग सर्व जग व्यापून आतां काय खाऊं म्हणून आ वासून बसली आहे. आतां 'बाहेरचें' म्हणजे जगाबाहेरचें गिऱ्हाइक नसल्यानें नवीन माल निघणें थांबलें अथवा मजूरीहून कमी खर्चाचीं यंत्रें निघालीं म्हणजे बेकारी वाढते. जे निर्माण करतात त्यांनाच जर आतां सर्व माल खरेदी करूं दिला नाहीं तर 'बाहेरचें' गिऱ्हाइक संपल्यामुळें माल पडून राहणारच; म्हणून नवीन निपजणें बंदच होणार. मग बेकारी वाढणारच व पडून राहिलेल्या मालापुढें जगांतील बहुसंख्य लोक उपाशी पडून राहून मरणारच. पण जगांतील सर्व मजूरांना त्यांनीं निर्मिलेला माल खरेदी करूं द्यावयाचा तर भांडवलदारास वाढावा कोठून मिळणार? त्याला वाढावा मिळणार नाहीं तर तो कांहीं मजूरांस पोसण्यासाठीं धंदा करणार नाहीं. तेव्हां जगांतील बहुसंख्य समाजानें जगायचें तर भांडवलवाल्याजवळचीं संपत्तिसाधनें आपण घेऊन–कोणीं कोणासहि वाढावा अथवा नफा देण्यासाठीं नव्हे तर सर्वांच्या ऐहिक भोगासाठीं, भौतिक उत्कर्षासाठीं, चित्तशुद्धीसाठीं व आध्यात्मिक कल्याणासाठीं किंवा आणखी जें कांहीं उच्च परमोच्च ध्येय असेल त्या सर्वांसाठी चालवावीं म्हणजेच समाजसत्ता स्थापावी असें मार्क्सचें म्हणणें आहे.

## कार्ल मार्क्सचें क्रांतिशास्त्र

भांडवलशाहीनें माणसाचें उत्पादनकौशल्य वाढवून आर्थिक सुबत्तेची शक्यताहि करून ठेविली आहे. पण संपत्तिसाधनें खाजगी मालकीचीं असल्यानें लोकांस सुख मिळत नाहीं. यासाठीं भांडवलवाल्यांनीं संपत्तिसाधनें त्यापासून काढून घ्यावीं, भांडवलशाहीचा किल्ला हस्तगत करावा म्हणजे मानव-

जातीस आर्थिक व इतर दुःखांतून सुटतां येईल; असा प्राचीन व विद्यमान समाजघटनांचें परीक्षण करून मार्क्सनें निर्णय दिला. नंतर मार्क्सनें लष्करी सेनापतीप्रमाणें ही क्रांति घडवून आणण्याचें शास्त्र सांगितलें आहे.

वर्गयुद्ध (क्लास–वॉर) हा या क्रांतिशास्त्राचा पायाच आहे; ही गोष्ट एकदम कबूल करण्यास हरकत नाही. भांडवलवाला वर्ग व मजूर वर्ग यांत वैर असतेंच असतें ही गोष्ट मार्क्सपूर्वीच्या अर्थशास्त्रज्ञांनींच दर्शविली असून मार्क्सनें आपली नीति या वर्गकलहावर आधारलेली आहे. कोणत्याही वस्तूची आपणास विशेष हेतूनें हालचाल करावयाची असल्यास त्या वस्तूच्या अंगभूत गुणांवरून आपण त्या वस्तूशी कसें वागावें हें ठरवितों. इमारतीची भिंत बांधतांना पृथ्वीचा गुरुत्वाकर्षणाचा नियम लक्षांत घ्यावाच लागतो. भूमध्यापासून निघणाऱ्या त्रिज्जेच्या रेषेंत अथवा भूपृष्ठ सामान्यतः सपाट आहे असें धरून त्यावरील लंबरेषेंत पृथ्वी आकर्षण करते हें ध्यानांत घेऊन बरोबर त्याच रेषेंत विटेवर वीट रचली असतां इमारत चांगली टिकते. इमारतकार या गुरुत्वाकर्षणाच्या नियमाचा जसा उपयोग करतो तसाच वर्ग-कलहाच्या वस्तुस्थितीचा व भावनेचा मार्क्सनें मजूरांस समाजक्रांतीस उद्युक्त करण्यासाठीं उपयोग केला. कल्पनावाद्यांची चूक दाखवितांना मागें दिलेल्या एका उताऱ्यांत एंजल्स म्हणतो, "भांडवलदाराबद्दल मजूरांना कां चीड वाटते हें कल्पनावाद्यांना समजतें; पण वर्गद्वेष निरुपयोगी आहे असें त्यांना वाटतें. आपल्या ध्येयाकडे (म्हणजे समाजसत्ता स्थापण्याकडे) धांव घेण्याची नैतिक ईर्षा मजूरांना या वर्गद्वेषानेंच उत्पन्न होईल; ही साधी गोष्ट यांना समजत नाही. इंग्लंडांतील आजच्या (१८४५) स्थितींत (म्हणजे भांडवलवाले एकसारखे मजूरांना पिळून काढीत असतां) परोपकार व विश्वबंधुत्व व्यर्थ आहेत."

इतिहासांत, मार्क्सच्या मतें, हा वर्गद्वेष शतकानुशतकें सतत चालत आला आहे व तो हल्लींच्या भांडवलशाहीच्या युगांतहि कायम आहे. पूर्वीं मालक व गुलाम, वरिष्ठ वर्ग व गांवढळ, उमराव व कुळें, मालक व कारागीर व उपरी अशा अनेक, जुलुमकर्ते व जुलुमग्रस्त यांच्या जोडया झगडा चालवीत. भांडवल-शाहीचें वैशिष्टच हें आहे कीं हे अनेक विरोध वितळून साऱ्या जगभर एक

वर्ग भांडवलवाला व दुसरा वर्ग मजूर असें जागतिक एकच प्रचंड द्वंद्व हल्लीं उभें रहात आहे. इतर वर्गभेद वितळून जाण्याचें काम आजवर कोणत्याहि काळापेक्षां भांडवलशाहीच्या काळीं अतिशय अधिक वेगानें चाललें आहे. प्रचंड भांडवली धंद्याच्या धक्क्यानें लहान लहान धंदेवाले बिनबुडाच्या भांड्या-प्रमाणें कोलमडून पडून 'काम मागण्यासाठीं वर उभारलेल्या हातांचें जंगल' मजूरांच्या बाजारांत कळकाच्या बनाप्रमाणें एकसारखें मातत चाललें आहे. आणि प्रथम प्रथम कळकाएवढी जाड असलेलीं ही हातांचीं धाटें दिवसानु-दिवस काम नाही म्हणून वाळत वाळत चिपाड बनत चाललीं आहेत.

या मजूरांनीं भांडवलशाहीच्या आरंभापासूनच झगड्यास सुरवात केली. मजूरास दारिद्र्य असून त्याची उपासमार होत होती. आणि तो भोंवतालीं पाहतो तों इतर लोक चैनीत होते. श्रीमंत, ऐदी लोकांपेक्षां आपण कितीतरी अधिक कष्ट करतों, पण आपली मात्र उपासमार, असें कां, हें त्याला कळेच ना. तो त्रस्त झाला. दुसऱ्याची वस्तु घेऊं नये या नीतिनिर्बंधाबद्दलची त्याची निष्ठा पार जळून गेली व तो चोऱ्या करूं लागला. मजूराच्या विरोधाचें पहिलें स्वरूप हें होतें. त्यावर खटले झाले. जनतेंत मजूराचा सर्वत्र धिःकार झाला. हळूहळू वैयक्तिक चोरीपेक्षां भांडवलशाहीस संघटित विरोध करण्यानेंच आपलें दारिद्र्य नष्ट होईल हें त्याच्या लक्षांत आलें. अधिक पगार मागणें, कामाचे तास कमी करून घेणें यांसाठीं मजूरवर्ग आपसांत जूट करूं लागला. पहिल्यानें काम मिळविण्यासाठीं तो आपसांत चढाओढहि करी. पण जुटीचें महत्त्व त्यास पुढें कळलें व मजूरसंघांचें बळ वाढलें. आपल्या गाऱ्हाण्यांसाठीं मजूर संप करू लागले. मजूरांची संख्या गरजे-हून कमी असतां संपांनीं केव्हां केव्हां मजूरांस कांहीं गाऱ्हाण्यांचे बाबतींत यशहि येतें पण पुष्कळदां पराभव होतो. तरीहि, एंजल्स म्हणतो, संपांची उपयुक्तता मजूरांच्या शिक्षणाच्या दृष्टीनें कांहीं विशेष प्रकारची आहे. त्यामुळें मजूरांत वैयक्तिक लोभ नष्ट होऊन वर्गभावना जागृत होते. मजूरांच्या लहान लहान गटांत जूट होऊन त्यांचें बल एकवटून वाढत जातें. अखेर लढा सर्व भांडवल-वाले व सर्व मजूर यांतच होणार असल्यानें संपांच्या लहान लहान झगड्यांनीं मजूरांची जूट वाढत जाऊन त्यांना प्रत्यक्ष युद्धाचें शिक्षणहि मिळत जातें. म्हणून 'संप ही मजूरांची लष्करी शाळा आहे.'

मजूरांची संघटना सुरू झाली कीं 'एक वर्षात स्वराज्य' यासारखी एकदम राज्यक्रांतीचीच आरोळी ठोकावी असें मार्क्स सांगत नाहीं. तर मजूरांच्या दैनंदिन आयुष्यक्रमांत भांडवलवाल्यांच्या उत्पादनपद्धतीनें ज्या अडचणी उत्पन्न होतात त्या घालविण्यासाठीच पण अखंडपणें झगडा चालू ठेवावा. यश येईल तसतशी मागणी सारखी वाढती ठेवून एकएक पाऊल पुढें टाकीत व भांडवलवाल्यास मागें रेटीत आपला जमाव टिकवून चालावें असें त्याचें सांगणें आहे. अखेर भांडवलशाहीचा बालेकिल्ला म्हणजे संपत्तिसाधनांची मालकीच समाजाच्या हातीं पूर्णपणें घ्यावयाची असल्यानें मजूरांनी आपल्या मागण्यांस घालण्यासारखी नैतिक मर्यादा कोणतीच नाहीं. डावपेचाच्या दृष्टीनें वेळोवेळीं योग्य ती मर्यादा पत्करून पिछेहाट करावी, जागीच राहावें, वळण घ्यावें किंवा चढाई करावी.

जो वर्ग वरचढ असतो तोच आपल्या हातीं राज्यसत्ता ठेवून खालच्या वर्गास चेपत असतो. तेव्हां संपत्तिसाधनें काबीज करण्यासाठी मजूरांनी निवळ आर्थिक लढा चालू न ठेवतां राजकीय हक्कासाठींहि झगडलें पाहिजे. या दृष्टीनें मार्क्स–एंजल्स यांनीं इंग्लंडांत १८४०–५० चे काळांत मजूरास राजकीय हक्क मिळावे म्हणून जी चार्टिस्ट चळवळ झाली तिला पाठिंबा दिला. कम्युनिस्टांच्या प्रसिद्ध जाहीरनाम्यांत मजूरचळवळीचा राजकीय व आर्थिक कार्यक्रम दिला असून हल्ली कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्षानें याच धोरणानें आपला कार्यक्रम आंखला आहे. जुन्या सरदार वर्गाशीं, राजाशीं अथवा परकीय सत्तेशीं भांडवलदार वर्ग जो सनदशीर झगडा चालवीत असतो त्यांत मजूर वर्गानें आपला मतभेद कायम ठेवून व जाहीर करून खुशाल पुढारीपणानेंहि भाग घ्यावा असें मार्क्स व लेनिन यांचें स्पष्ट मत आहे. 'मजूरास स्वदेश असा नसतोच' असें मार्क्सनें कम्युनिस्ट जाहीरनाम्यांत म्हटलें आहे. त्याचा अर्थ असा कीं भांडवलवाले हे मजूरांची पिळणूक करतांना स्वदेशी मजूर व परदेशी मजूर असा भेद करीत नाहींत. इंग्लंडचे भांडवलवाले परदेशांत भांडवल गुंतवून स्वदेशांत बेकारी उत्पन्न करतात. तसेंच हिंदी भांडवलवाले स्वदेशांत धंदा वाढवून बेकारी कमी न करतां इंग्लंड व जपान या देशांतील भांडवलवाल्यांना हिंदी बाजारांत भागी देतात. म्हणून परदेशी व स्वदेशी अशा दोनहि भांडवलदारांचा पाडाव

मजूर वर्गास सारख्याच निकरानें करावा लागतो. पण त्यांतल्या त्यांत पर-कीय सत्तेशीं भांडवलवाले झुंझत असतां त्यांचे पाय मागें ओढूं नये. त्यांस पुढें रेटावें व राष्ट्रीय झगड्यास तीव्रता येऊन अखेर परदेशी भांडवलवाल्यां-बरोबर स्वदेशी भांडवलवाल्यांचीहि सत्ता कमी करण्यासाठीं राष्ट्रीय स्वरा-ज्याच्या झगड्यांतहि मजूरांनीं पुढारीपणानें झगडावें असें मार्क्सचें मत आहे.

मार्क्स व एंजल्स यांचे मागून लेनिन व ट्राट्स्की या रशियन कम्युनिस्टांनीं मार्क्स–एंजल्सच्या कम्युनिस्ट पंथाची प्रगति केली व त्या धोरणानें रशियांत क्रांतिहि घडवून आणली. त्यासाठीं त्यांनी मार्क्स–एंजल्स यांचें राज्यक्रांति–शास्त्र अधिक तपशीलवार आखलें. हें आंखतांना लेनिननें मजूरांची संघ-टना करून व टिकवून धरून मजूरांच्या सैन्यास क्रांतीच्या मार्गानें रेटीत नेण्यासाठीं मजूरसंघटनेखेरीज क्रांतिकारक कम्युनिस्ट पक्षाची आवश्यकता मोठ्या आग्रहानें प्रतिपादिली आहे. लेनिनचें पक्षसंघटनेच्या संबंधींचें मत स्पष्ट करून सांगतांना स्टॅलिन लिहितो, "मजूर संघटनेंतील हुषार मजूरांना एकत्र आणण्यासाठीं कम्युनिस्ट पक्षाची फार आवश्यकता आहे. या हुषार कामगारांना मजूरसंघाचा पुढाकार घेऊन चळवळ चालविण्याचें शिक्षण पक्षसंघटनेच्या शाळेंत देता येतें. कामगार पुढाऱ्यांची शाळा या दृष्टीनें निरनिराळ्या कामगारसंघावर पक्षसंघटनेस अधिकार चालवितां येतो. आपल्या युद्धानुभवाच्या जोरावर त्यास आपलें पुढारीपण एकमुखी करतां येतें आणि सर्व वेगवेगळे मजूरसंघ एकाच वर्गयुद्धाचीं सैन्यें बनवितां येतात." राजकीय व आर्थिक क्षेत्रांत जरूर त्याप्रमाणें कायद्याच्या मर्यादेंत राहूनच वर्गयुद्ध चालू असतां केव्हां तरी मजूरांना बंड उभारावें लागतेंच हें लेनिनलाहि मान्य आहे. लेनिननें तसें तें रशियांत उभारलेंहि; पण निरनिराळ्या देशांत निरनिराळी परिस्थिति असूं शकते हें ओळखून मार्क्सनें व लेनिननेंहि कांहीं सावधगिरीच्या सूचना दिल्या आहेत. लेनिन म्हणतो, "बहुसंख्य समाजाचा पुढारी असा मजूरवर्ग एकट्याच्या बळावर वर्गयुद्ध जिंकेल हें खरें नाहीं. सामान्य जनतेचा पाठिंबा अथवा निदान तटस्थपणाचें आश्वासन मिळाल्याखेरीज अखेरचा लढा पुकारणें हा मूर्खपणाच नव्हे तर गुन्हा आहे. निवळ क्षोभकारक मतप्रचारानें जनतेची चढाईस जरूर इतकी तयारी होत नाहीं. दैनंदिन राजकीय हक्कांच्या झग-

डयांत त्यांना चढाईचें शिक्षण मिळालें पाहिजे." "बंड करणें म्हणजे" लेनिन सांगतो, "पोरखेळ नव्हे." एकदां तें सुरू केलें कीं माघार घेतांच येत नाहीं. म्हणून पूर्णपणें पूर्वसिद्धता करणें हें अगत्याचें असतें व त्यासाठीं नित्याचा वाढत्या राजकीय हक्कांचा झगडा अवश्य चालवावा लागतो. क्रांतीस अनुकूल परिस्थिति कोणती तें सांगतांना लेनिन म्हणतो, "खालचे वर्ग त्याचप्रमाणें वरचे वर्ग या उभयतांनाहि विद्यमान् परिस्थिति असह्य झाली पाहिजे. वेगळ्या शब्दांत सांगायचें म्हणजे राष्ट्रांत वरचढ व दलित वर्ग हे दोघेहि आर्थिक संकटांत (क्रायसिस) सांपडले पाहिजेत."

यशाची पुष्कळशी खात्री असल्याशिवाय लढाई पुकारूं नये हा युद्धशास्त्राचा नियम कोणत्याहि झगडयास लागू आहे. आणि यश येण्यास नेमकें काय हवें हें कोणीच ठाशीवपणें सांगू शकत नाही; पण रशियांत लेनिनला राज्यक्रांतीचे कामीं यश येण्यास कोणती परिस्थिति कारण झाली याचें टाचण खुद्द लेनिननें दिलें आहे तें या दृष्टीनें बोधप्रद असल्यानें येथें देतों. लेनिन सांगतो रशियन कम्युनिस्टांस यश येण्यास अनुकूल अशा मुख्य चार गोष्टी घडल्या. (१) मजूर व शेतकरी महायुद्धांत थकून गेल्यामुळें कम्युनिस्ट क्रांतीच्या सुरवातीबरोबर जर्मनीशी रशियाचें चाललेलें युद्ध थांबवितां आलें व रशियास पुनर्घटनेस अवसर मिळाला. (२) इतर भांडवलशाही राष्ट्रांचें युद्ध आणखी पुढें एक वर्षभर चालू राहिलें यामुळें त्यांना रशियाच्या कम्युनिस्ट क्रांतीवर हल्ला करतां आला नाही. या मुदतींत रशियास आपली विस्कटलेली घडी थोडीतरी सावरता आली. (३) अफाट देश व दळणवळणाचीं साधनें थोडीं यांमुळें अंतर्गत शत्रूंना कम्युनिस्ट सरकारचा मोड करतां आला नाही व कम्युनिस्ट सरकार विजयी झालें. (४) मध्यम वर्गाच्या क्रांतिकारक चळवळीचा शेतकऱ्यांत इतका जोरानें फैलाव झाला होता कीं मजूरपक्षाच्या कांहीं क्रांतिकारक मागण्या शेतकऱ्यांनींहि आपल्या कार्यक्रमांत घातल्या होत्या.

हिंदुस्थानांत वेळीं अवेळीं क्रांतीची हांक देणाऱ्यांनीं लेनिनचे हे अनुभवाचे शब्द नेहमीं ध्यानांत धरावे.

कम्युनिस्ट क्रांति साऱ्या जगभर एकदमच होणें अवश्य आहे काय? ज्या देशांत कम्युनिस्ट क्रांति झाली त्या देशांची इतरांस काय मदत होईल? या व अशा प्रश्नांसंबंधीं लेनिनचें मत सांगण्यासाठीं येथें फक्त लेनिनचा एक

उतारा देतों. १९१५ च्या ऑगस्टमध्यें लेनिन लिहितो, "भांडवलशाहीची राजकीय व आर्थिक वाढ सर्वत्र एकसारखी नाहीं. यामुळें पहिल्यानें कांहीं थोड्या भांडवलशाही राष्ट्रांत किंबहुना अगदींच एकट्या राष्ट्रांत सुद्धां प्रथम सोशॅलिस्ट क्रांति होऊं शकेल. सोशॅलिस्ट क्रांति यशस्वी झालेल्या या राष्ट्रांतील मजूरांनीं प्रथम आपल्या भांडवलवाल्यांचा अगदीं बीमोड केला पाहिजे व सोशॅलिस्ट पद्धतीची उत्पादनपद्धति सुरू केली पाहिजे. मगच हें यशस्वी राष्ट्र इतर भांडवलशाही राष्ट्रांतील दलित वर्गाची मदत घेऊन त्या त्या राष्ट्रांतील भांडवलवाल्यांच्या विरुद्ध उठाव करील आणि जरूर तर दुसऱ्या भांडवलशाही राष्ट्रांतील सरकारशीं व वरचढ वर्गांशीं दलित वर्गाच्या उद्धारासाठीं युद्धहि पुकारील. असें करणें सोशॅलिस्ट राष्ट्राचें कर्तव्यच आहे."

मजूरवर्गानें क्रांति घडवून आणल्यावर पूर्ण लोकशाही न स्थापतां मजूरवर्गानें आपली मुखत्यारी (डिक्टेटरशिप ऑफ धी प्रोलेटॅरियट) स्थापावी व भांडवलशाहीचें राज्ययंत्र आमूलाग्र बदलून खालपासून वरपर्यंत कम्युनिस्ट मताच्या माणसांच्या व क्रांतिकारक मजूरांच्या ताब्यांत घ्यावें असें मार्क्स व लेनिन यांचें मत आहे. भांडवलदार व मोठे शेतकरी यांच्या दौलती सक्तीनें हिसकून घ्याव्या. पण आपल्या लहानशा भांडवलावर अथवा जमिनीवर आपणच राबणारे लहान धंदेवाले व शेतकरी यांचें हळूहळू शिकवणीनें व उदाहरणानें मतपरिवर्तन करावें; नाइलाज तरच शेवटीं सक्ति करावी व मग त्यांचें भांडवल व जमीन सामुदायिकांत मिसळावी असें मार्क्सनें व लेनिननें सांगितलें आहे. एकदां राज्यक्रांति करून राज्यसंस्था काबीज केल्यावर कम्युनिस्ट समाजरचना क्रांतीनें अथवा हळूहळू विकासक्रमानेंहि करावी असेंहि कम्युनिस्टांचें म्हणणें आहे.

कम्युनिस्टांनीं राज्यक्रांति करतांच स्वतां राज्यपद न पत्करितां एकदम अराजक म्हणजे शासनरहित समाजव्यवस्था स्थापावी असें म्हणणारा बकुनिन नामक एक क्रांतिकारक होऊन गेला. मार्क्स व बकुनिन यांच्यांत या मुद्यावर तीव्र मतभेद झाले. बकुनिन यास मार्क्सचें उत्तर असें होतें कीं राज्यक्रांति होतांच एकदम अराजक निर्माण केलें तर भांडवलवाले पुन्हां प्रतिक्रांति करून मजूरांचा पराभव करतील. यासाठीं मजूरांनीं राज्यसत्ता आपल्या हातीं ठेवून जमिनदार व भांडवलवाले या सर्वांचा बीमोड करावा, प्रचंड

प्रमाणावर सामुदायिक उत्पादन करून संपत्तीची ददात नाहींशी करावी, शिक्षणाचीं सर्व साधनें हातीं घेऊन कम्युनिस्ट मताबद्दल लोकांत दृढ निष्ठा उत्पन्न करावी. असें करतां करतां एकदां असा काळ येतो कीं कोणींहि कोणावर कोणतीच सक्ति करण्याची जरूरी राहात नाही. एका वर्गानें दुसऱ्या वर्गास पिळून काढण्यासाठी संघटित केलेलें बळ म्हणून आजवर अस्तित्वांत असलेलें सरकार, बळजोरीची गरजच नाहींशी झाल्यामुळें गरज नसलेल्या तरवारीप्रमाणें गंजून पिचून मोडून जाते. अशा प्रकारें एकदां राज्य संस्था नष्ट झाली म्हणजे मग मार्क्स व बकुनिन या उभयतांसहि संमत असलेली स्वातंत्र्य, समता व बंधुभाव यांनीं युक्त अशी समाजव्यवस्था निर्माण होते. त्या वेळीं मनुष्य सृष्टीचा पूर्णपणें प्रभु होईल. थोड्या व आवडीच्या श्रमांनीं त्यास सुबत्ता प्राप्त होईल आणि सांस्कृतिक व बौद्धिक उत्कर्षास सोयी व फुरसतहि भरपूर मिळेल.

---

## प्रकरण १३ वें

# रशियांतील कम्युनिस्ट क्रांति

मार्क्सनें प्रतिपादिल्याप्रमाणें १८७० सालीं फरान्समध्यें मजूरांनीं राज्य-संस्था जिंकून 'मजूरांची मुखत्यारी' स्थापन केली. हें राज्य 'पॅरिस कम्यून' या नांवानें प्रसिद्ध आहे. या कम्यूननें भांडवलवाल्यांच्या सत्तेचा पूर्ण नायनाट न केल्यानें भांडवली सरकारनें पुढें या कम्यूनचा पाडाव केला. ही क्रांति मार्क्सच्या हयातींत झाली असल्यानें त्यानें तिच्या यशापयशाचें सूक्ष्म परीक्षण करून, मजूरांनीं आपली मुखत्यारी तर स्थापिली पाहिजेच पण भांडवली सत्तेचें बीजसुद्धां उरूं देतां उपयोगी नाहीं, हा क्रांति-शास्त्रांतील मार्क्सचा प्रसिद्ध सिद्धांत त्यानें प्रतिपादिला. भस्म करून टाकलेल्या मुसळाच्या चुकून बाजूस राहिलेल्या बारीक तुकड्या-पासून अखेर तरवारीचें बन माजलें व त्यानें यादव कुळाचा संहार केला त्या-प्रमाणें भांडवलवाल्यांची थोडीशी सत्ताहि अवशिष्ट राहिली तरी पुन्हां

प्रतिक्रांति करून मजूरांस उलथून पाडूं शकते ही सूचना या पॅरिस कम्यूनच्या अनुभवावरून मार्क्सनें आपल्या अनुयायांस दिली.

मार्क्सच्या मागून त्याचें समाजवादाबद्दलचें आर्थिक तत्त्व रूढ झालें; पण क्रांतीची विचारसरणी मागें पडली. १८६४ सालीं मार्क्स व इतर कांहीं कम्युनिस्ट पुढारी यांच्या प्रयत्नानें 'आंतरराष्ट्रीय मजूर संघ' नांवाची संस्था स्थापन होऊन तिनें निरनिराळ्या देशांत कम्युनिस्ट क्रांति घडवून आणण्याचें ठरविलें होतें. या संघानें मतप्रसार पुष्कळ केला. पण सभासदांत कधीच मतैक्य नव्हतें. अखेर दुहीचें पर्यवसान १८७२ साली हा संघ मोडण्यांत झालें. १८८३ सालीं मार्क्स मृत्यु पावला. मार्क्सनंतर दुसरा 'आंतरराष्ट्रीय मजूर संघ' स्थापन झाला. याचें ध्येय शांततेच्या मार्गांनी समाजसत्ता म्हणजे सोशॅलिझम सर्व देशांत स्थापन करणें व भांडवलवाल्यांच्या युद्धांत आपापल्या देशांतील सरकारशीं असहकार करणें हें होतें. पण पुढें भांडवलशाहीची वाढ अनेक देशांत झपाट्यानें झाली. औद्योगिक राष्ट्रांत मजूरांची स्थितीहि सुधारली. यामुळें सोशॅलिझमबद्दलचा पुढाऱ्यांचा उत्साह पूर्णपणें मावळला व १९१४ सालीं भांडवलवाल्यांच्या युद्धांत मजूर पुढाऱ्यांनीं आपापल्या सरकारशीं सहकार्य करून दुसरा आंतरराष्ट्रीय मजूरसंघहि मोडून टाकला. यामुळें मार्क्सच्या पंथाचा कायमचा मोड झाला, असेंच महायुद्धाच्या सुरवातीस वाटलें.

## बोल्शेव्हिक पक्षाचा जय

पण चोहोंकडून निराशा होत असतां रशियांतील लेनिन, ट्रॉट्स्की वगैरे मार्क्सच्या अनुयायांनीं, रशियांतील सरकारचा महायुद्धांत खूप पाडाव होत होता ही संधि साधून, तेथें कम्युनिस्ट क्रांति घडवून आणली. १९१७ च्या फेब्रुवारींत केरेन्स्की या पुढाऱ्यानें झारला पदच्युत करून लोकशाही स्थापन करण्याचा प्रयत्न केला. पण जर्मनीशीं चालू असलेलें युद्ध थांबविणें त्यास इष्ट वाटेना. यामुळें देशांत वाढलेलें दारिद्र्य, उपासमार व असंतोष यांचा एका बाजूनें मारा व दुसऱ्या बाजूनें जर्मनीकडून होणारा पराभव यांमुळें केरेन्स्कीचें सरकार जेरीस आलें आणि सैनिक, कामकरी व शेतकरी या सर्व वर्गांनीं केरेन्स्कीच्या सरकारविरुद्ध बंड उभारलें. लेनिन व ट्रॉट्स्की या कम्युनिस्टांनीं या बंडाचा पुढाकार घेऊन १९१७ च्या नोव्हेंबरांत केरेन्स्कीच्या सरकारचा पाडाव

केला व मजूरांची सत्ता स्थापित केली. १९०३ सालीं रशियांतील सोशॅलिस्ट मताच्या डेमोक्रॅटिक पक्षांत दुमत होऊन बंड करून राज्यक्रांति करावी असें म्हणणाऱ्या पक्षास बहुमत मिळालें. म्हणून त्यास बहुमतवाला पक्ष या अर्थी बोल्शेव्हिक हें नांव मिळालें व विरुद्ध पक्षास अल्पमतवाले या अर्थी मेन्शेव्हिक हें नांव मिळालें. १९१७ च्या नोव्हेंबरांत यशस्वी झालेला लेनिन याचा पक्ष हा यांपैकी बोल्शेव्हिक पक्ष असल्यानें रशियांतील सरकारास बोल्शेव्हिक सरकार व त्या सरकारच्या कम्युनिस्ट मतास बोल्शेव्हिझम हें नांव वाक्प्रचारांत रूढ झालें आहे.

पॅरिस कम्यूनच्या अनुभवावरून मार्क्सनें जे सिद्धांत बांधले त्यांचा लेनिननें पूर्ण उपयोग करून रशियांत एकदम मजूरांची राज्यसत्ता स्थापन केली व जमिनदार, भांडवलवाले, पुरोहित आणि राजपक्षीय या सर्वांवर एकदम शस्त्र धरलें. त्यानें प्रथम जर्मनीशी तह घडवून आणला. यामुळें मजूर व सैनिक यांचें नवीन सरकारास पाठबळ मिळालें. तसेंच जमिनदारांच्या जमिनी कुळांना देऊन त्यांचाहि पाठिंबा लेनिननें मिळविला. इतर भांडवलवाल्या राष्ट्रांचें युद्ध जर्मनीशी पुढें एक वर्ष चाललें असल्यानें लेनिनला पहिले वर्षी कम्युनिस्ट सरकारचें आसन बरेंच मजबूत करतां आलें. पुढें चार वर्षेपर्यंत झारपक्षीय वर्ग व भांडवलवाल्या राष्ट्रांकडून पैसे खाणारे सेनापति या सर्वांशीं ट्रॉट्स्की व लेनिन यांना स्वदेशांतच घनघोर संग्राम करावा लागला पण ट्रॉट्स्की या शूर सेनापतीच्या नेतृत्वाखालीं कम्युनिस्टांनी सर्व प्रतिपक्षांचा मोड करून कम्युनिस्ट राज्य रशियांत दृढमूल केलें.

कम्युनिस्टांनीं लेनिनच्या नेतृत्वाखालीं रशियांतील राज्यसत्ता काबीज केल्यावर मार्क्सच्या मताप्रमाणें राजकीय व आर्थिक क्रांतीस एकदमच हात घातला. विदेशी भांडवल व कर्जें एकदम खालसा केल्याचें सरकारनें जाहीर केलें. सर्व मोठे कारखानेहि सरकारनें हस्तगत केले. फार मोठ्या भांडवलवाल्यांच्या दौलती अशा प्रकारें एकदम हिरावून घेतां आल्या तरी लहान भांडवलवाले व व्यापारी यांचें उच्चाटण एकदम होणें शक्यच नव्हतें. पण त्यांना नवीन राज्यघटनेंत कोणतेहि हक्क देण्यांत आले नाहीत. यादवीचीं पहिलीं तीन वर्षे कम्युनिस्टांना फार आणीबाणीचीं गेलीं. रशिया आधींच मागसलेला देश. त्यांत युद्धांत विध्वंस फारच झाला होता. पुनर्घटनेचें काम करीत असतांच

स्वदेशांतील प्रतिपक्षीयाशी सरकारला अहर्निश झुझावें लागलें. यामुळें कम्युनिस्ट सरकारनें या काळांत अगदीं रुद्ररूप धारण केलें होतें. शेतकऱ्यांना जमिनीची मालकी दिली होती, तरी पण सालोसाल त्यांच्या गरजेपुरतें पीक ठेवून बाकीचें सरकारला दिलें पाहिजे अशी शेतकऱ्यांवर सक्ति होती. याचा दुष्परिणाम होऊन शेतकरी आपल्यापुरतेंच पीक काढूं लागले. त्यामुळें सैन्याला व कारखान्यांतील कामगारांना अन्नाचा तुटवडा पडूं लागला. तेव्हां १९२३ पासून आपली कम्युनिस्ट मतें कांहीं काळ बाजूस ठेवून लेनिननें 'नवीन आर्थिक धोरण' सुरू केलें. या धोरणाप्रमाणें शेतकऱ्यांस आपलें पीक विकून पैसे मिळविण्याची परवानगी मिळाली. यामुळें शेतीचें उत्पादन वाढूं लागलें. यादवी थांबल्यामुळें पुनर्घटनेचे प्रयत्न जारीनें चालू झाले. १९२४ सालीं लेनिन मृत्यु पावला. त्याची जागा स्टॅलिननें घेतली. १९२८ चे सुमारास कम्युनिस्ट सरकारास आत्मविश्वास वाटूं लागतांच पुन्हां कम्युनिस्ट मताचा अंमल सुरू करण्याचें सरकारनें ठरविलें. मोठ्या जमिनदारांच्या जमिनी यापुढें मोठ्या सक्तीनें जप्त करण्यांत आल्या. लहान लहान शेतकऱ्यांचीं शेतें समाइकींत आणून शास्त्रीय पद्धतीनें शेती करावी व हळूहळू सर्व जमिनी सरकारच्या मालकीच्या करणें व शेतींत प्रचंड उत्पादन करणें ही योजना जाहीर झाली. १९२९ सालीं कारखाने, शेती, आगगाड्या वगैरे सर्व क्षेत्रांत पांच वर्षांत अमुक इतकी प्रगति करावयाची असा कार्यक्रम ठरविण्यांत येऊन तो कार्यक्रम पांचऐवजीं चार वर्षांतच पार पाडण्यांत आला. हल्ली दुसरी पंचवार्षिक योजना अमलांत आहे.

## कम्युनिस्टास आर्थिक योजनांत यश कां येतें

या सर्व योजनांची आंखणी व ती पार पाडण्याची तऱ्हा या गोष्टी मानवी इतिहासांत अद्भुत आहेत. रशियाची लोकसंख्या १६ कोटी; पण एवढ्या प्रजेच्या संसारास खाणेंपिणें, वस्त्रप्रावर्ण, इमारती, आगगाड्या, करमणुकी वगैरे सर्व पुढील वर्षी किती लागेल, नवीन उत्पादन वाढविण्यासाठीं यंत्रसामुग्री बाहेरून कोणती आणावी लागेल, त्या सर्वांचा हिशेब करून त्याप्रमाणें सर्व देशांत प्रत्येक मालाचें उत्पादन हिशेबानें केलें जातें व बाहेरून आणावयाचा माल स्वदेशांतून बाहेर पाठवावयाच्या मालाच्या मोबदल्यांत आणला जातो. आंखीव योजनांनीं एवढ्या प्रचंड देशाचा कारभार हांकण्याची पद्धति इतकी

यशस्वी झाली आहे कीं जगाच्या सर्व पेठांतून आतां रशियन माल येऊं लागला असून भांडवलशाही राष्ट्रें आर्थिक संकटाच्या समुद्रांत गटंगळ्या खात असतां रशियांत एकंदर उत्पादन व वैयक्तिक सुबत्ताहि सारखी वाढत आहे.

रशियास आंखीव योजनांमुळें येत असलेलें यश पाहून आपणहि आर्थिक योजनांनीं यश मिळवावें असें स्फुरण भांडवलवाल्या राष्ट्रांतील कांहीं लोकांना आलें आहे व रोज नवनव्या योजना जाहीर होत आहेत. पण एकहि सार्व राष्ट्रीय योजना कोठें यशस्वी झाल्याचें ऐकिवांत नाही. रशियास सार्व-राष्ट्रीय आर्थिक योजनेंत यश कां येतें व भांडवलवाल्या राष्ट्रांस कां येत नाही हें समजून घेणें फार अगत्याचें आहे. याचें उत्तरहि सोपें आहे. भांडवलशाहीचें राष्ट्र हें डिझरेलीनें म्हटल्याप्रमाणें 'दुभंगलेलें राष्ट्र' असतें. उत्पादन करा-वयाचें तें नफ्यासाठीं हें भांडवलवाल्यांचें जीवनतत्त्व. नफा हा एकानें दुस-ऱ्यास पिळून घेतल्यासच मिळतो. त्याचा जास्तीत जास्त लाभ व्हावा म्हणून भांडवलवाल्यांत चढाओढ लागते व सर्व भांडवलवाले मिळून मजूरांचे वैरी असतातच. एकाचा फायदा तो इतरांचा तोटा अशी स्थिति असते. यामुळें राष्ट्राच्या संसारांत एकमुखीपणा असत नाही. नफा मिळत नसला, कीं उत्पादन थांबवावयाचें ही भांडवलवाल्यांची रीति. पण सर्व देशाची आंखीव योजना अमलांत आणावयाची तर भांडवलवाल्यास नफा कसा मिळणार? एकानें दुसऱ्यास पिळणें हेंच नफ्याचें उगमस्थान तर सार्वराष्ट्रीय आंखीव योजना व नफेबाजी यांचें गोत कसें जमावें?

रशियांत नफेबाजी व पिळणूक बंद झाली आहे; जें निर्माण करायचें त्यानें राष्ट्रांतील लोकांचा सांभाळ झाला पाहिजे, हें सर्व उत्पादनाचें ध्येय आहे. भावी उन्नतीसाठीं भांडवल म्हणूनच आज पुष्कळशी संपत्ति राखून ठेवावी लागत आहे. त्यामुळें लोकांचे हाल होतातहि; पण जी परिस्थिति आहे ती सर्वांसच आहे. ती सुधारत आहे व उत्पादन पुरेसें झालें तर त्याचें ध्येय खाजगी नफा नसून सार्वजनिक भोग हेंच असल्यानें संपत्तिशेजारीं आपत्ति हा विक्षिप्त प्रकार रशियांत कधींच उत्पन्न होणार नाहीं. सर्व प्रकारच्या शास्त्रीय प्रयत्नांनीं उत्पादन एकसारखें वाढत असल्यानें रशियन लोकांचें दारिद्र्य कायमचें संपलें आहे. संपत्त्युत्पादनाप्रमाणें शिक्षण, सुखसोयी व आरोग्य या क्षेत्रांतहि कम्युनिस्टांनीं विलक्षण प्रगति केली असून, अगदीं पंधरा

वर्षांपूर्वींपर्यंत जगांत अतिशय मागसलेल्या या लोकांत एकदम उदय पावलेलें हें कर्तृत्व पाहून जग आश्चर्यानें थक्क झालें आहे.

रशियांत कम्युनिस्टांनीं कसकसें वैभव उभें केलें आहे याची माहिती या लहानशा पुस्तकांत देतां येत नाहीं. सर्व विदेशी भाषांत या विषयावर पर्वत-प्राय वाङ्मय निर्माण झालें असून मराठींतहि मासिकें व वर्तमानपत्रें यांतून आज पंधरा वर्षें सर्व प्रकारची माहिती प्रसिद्ध होत आहे. पण कांहीं तरी भडक दिसलें म्हणजे त्याकडे मुलांचें लक्ष आधीं वेधतें त्याप्रमाणें रशियांतील आंखीव आर्थिक योजना, स्त्रियास विवाह व घटस्फोटाचें मिळालेलें स्वातंत्र्य व धर्माविरुद्ध हल्ला याच गोष्टी जगांतील शहाण्यासुर्त्या लोकांसहि विशेष महत्त्वाच्या वाटतात. रशियानें संपत्तिसाधनें सार्वजनिक मालकीचीं केलीं असून उत्पादनाचें ध्येय नफा नव्हे तर समाजाचा सांभाळ व समृद्धि हें ठेविलें आहे इकडे कोणी फारसें लक्ष देत नाहीं. यामुळें आश्चर्यानें थक्क होणें एवढेंच सर्वांना साधतें. उपायचिंतन करणें शक्य होत नाहीं. पण सोशॅलिस्ट मत स्वीकारून त्याचा अंमल केला तर इतरहि राष्ट्रांना रशियाचें वैभव प्राप्त करून घेणें अशक्य नाही. ज्याना सोशॅलिझम म्हणजे काय हेंच कळत नाही त्यांनी रशियात एक वर्षात धान्य किती पिकलें, किती लोक फांसावर लटकले व किती बायकांनीं नवरे टाकले यांचे आंकडे 'राउंड टेबल' त्रैमासिकांतून घोकून पाठ केले तरी त्यांना रशियांतील क्रांतीचा कांहीहि बोध होणार नाहीं. उलट सोशॅलिझमचें रहस्य ज्याला समजलें तो आश्चर्यचकित न होतां आधीं सोशॅलिस्ट सरकार आपणास हिंदुस्थानांत कसें निर्माण करतां येईल याचाच प्रथम विचार करूं लागेल.

---

## प्रकरण १४ वें

# सारासार विचार



आतांपर्यंत भांडवलशाहीपूर्वीची समाजव्यवस्था, भांडवलशाहीचा उदय व विकास, तिचें सामान्य स्वरूप, गुण–दोष तसेंच भांडवलशाहींतील दोषांच्या प्रतिकारासंबंधीं निरनिराळीं मतें यांची माहिती दिली असून मार्क्स–

एंजल्स–लेनिन यांच्या कम्युनिस्ट पंथाचा व रशियांत चालू असलेल्या कम्युनिस्ट प्रयोगाचाहि आपण अल्पसा परिचय करून घेतला आहे.

मार्क्सचें मत स्थूल मानानें कोणत्या प्रकारचें आहे याबद्दल सामान्यतः एकमत असूनहि तपशीलाचे बाबतींत अतिशय तीव्र मतभेद झाले आहेत. सर्व देशांत स्वतांस मार्क्सचे अनुयायी म्हणविणारे पंथ एकमेकांस मार्क्सचे प्रामाणिक अनुयायी मानीत नसून कट्टे शत्रु लेखतात. या सर्वांची त्रोटक माहिती द्यावयाची म्हटलें तरी एक स्वतंत्र ग्रंथ लिहावा लागेल. शिवाय हिंदुस्थानांत मार्क्सची विचारसरणी अखेर कोणतें रूप धारण करते हें इतिहासानेंच अजून ठरवावयाचें आहे. स्वतांस समाजवादी अथवा सोशॅ-लिस्ट मानीत असून मार्क्सचें अनुयायित्व न पत्करणारीहि पुष्कळ माणसें आहेत. या सर्व मनामतांचा विचार या लहानशा प्राथमिक पुस्तकांत शक्य नाहीं. पण सोशॅलिस्ट अथवा समाजवादी मतपंथाचें स्वरूप स्पष्ट कळून येण्यासाठी मार्क्सच्या मताबद्दल–तें जसें आहे असें मला वाटतें त्याबद्दल– येथें थोडा सारासार विचार करावयाचा आहे.

## कांहीं शब्दांचा खुलासा

प्रथम कांहीं शब्दांचा खुलासा करतों. 'तुम्ही सोशॅलिस्ट कीं कम्युनिस्ट ?' असा एक प्रश्न नेहमी सोशॅलिस्टांस विचारण्यांत येतो. पण याचें ठाम उत्तर देणें नेहमीं सोपें असत नाहीं. कारण हे शब्द अतिशय सरमिसळपणें वापरले जातात. सामान्यतः सोशॅलिस्ट हा शांतता व क्रमविकास यांचा पुर-स्कर्ता असून कम्युनिस्ट हा क्रांतिवादी असतो असें मानलें जातें. इंग्लंडांतील 'स्वतंत्र मजूरपक्ष' हा या अर्थानें सोशॅलिस्ट असून रशियांतील सरकार हें कम्युनिस्ट आहे. या दोनहि पंथांच्या मताप्रमाणें जमिनी, खाणी, बँका, कारखाने, आगगाड्या वगैरे संपत्ति निर्मिण्याचीं साधनें हीं सार्वजनिक माल-कीचीं झालींच पाहिजेत. याहून वेगळ्या अर्थानें म्हणजे मजूरांना भरपूर वेतन देऊन त्यांच्या सुखसोई वाढविणें पण भांडवल खाजगीच राहूं देणें यासहि सर कावसजी जहांगीर हे 'सोशॅलिझम्' म्हणतात. अंशतः याच अर्थानें रॉबर्ट ओवेन यांसहि सोशॅलिस्ट मानलें जात असे असें मागें सांगितलें आहे. या अर्थानें भांडवलशाही कायम राहूनहि सोशॅलिझम् येऊं शकतो अथवा उदार भांडवलशाही म्हणजेच सोशॅलिझम् असें म्हणावें लागेल. दुसऱ्या टोकास

जाऊन असें म्हणतां येतें कीं क्रांतिकारक मताचा पुरस्कार करून तें आचरूनहि दाखविणारे जे रशियांतील कम्युनिस्ट त्यांनी आपल्या राज्यसंस्थेस 'यूनियन ऑफ सोशॅलिस्ट सोव्हिएट रिपब्लिक्स' म्हणजे 'सोशॅलिस्ट' सोव्हिएट प्रजासत्ताक राज्यांचा संघ असें नांव दिलें आहे; या अर्थीं सोशॅलिस्ट हा शब्द क्रांतिकारकांसहि लावण्यास हरकत नाही. कार्ल मार्क्स, लेनिन यांना ध्येयभूत वाटणारी जी राज्यहीन समाजव्यवस्था तिला 'कम्युनिस्ट' समाजव्यवस्था असें म्हटलें जातें व हल्लीं मजूरांची मुखत्यारी हें जें रशियांत असलेलें ध्येयाच्या मार्गावरील म्हणजे संक्रमण कालांतील सरकार त्यास 'सोशॅलिस्ट' असें मानलें जातें. तरी विदेशी पत्रकार रशियांतील हल्लींच्या सरकारास कम्युनिस्ट सरकार असेंच संबोधितात. अर्थासंबंधींच्या या अनिश्चयामुळें मीं 'सोशॅलिझम्' हा शब्द वापरतांना 'संपत्तिसाधनें सार्वजनिक मालकीचीं करावी' असें प्रतिपादणारा मतपंथ; असा अर्थसंकेत ठरविला आहे. आपल्याकडे या मतास माझ्या दृष्टीनें निश्चित स्वरूप येण्यास आजवर घडून गेलेला इतिहास अपुरा आहे. इतिहास घडेल तेव्हां बारीक बारीक भेद दर्शविणारे शब्दहि निर्माण होतील. यासाठी 'सोशॅलिझम्' यास मराठी शब्द म्हणून मी सोशॅलिझम् या इंग्रजी शब्दाप्रमाणेंच पुष्कळ ठिकाणीं 'समाजवाद' हा मराठी शब्द वापरला आहे. पुस्तकास इंग्रजींतून बहुतेकास परिचयाचें असलेलें 'सोशॅलिझम्' हें मुख्य नांव दिलें असून 'समाजवादाचा ओनामा' असें दुसरें मराठी नांवहि पुस्तकास दिलें आहे. तेव्हां या पुस्तकांत 'सोशॅलिझम्' अथवा समाजवाद याचा 'संपत्तिसाधनें सार्वजनिक मालकीचीं असावीं' असें मानणारा मतपंथ असा अर्थ समजावा.

## कायद्याची सक्तिच कां हवी

संपत्तिसाधनें कायद्याच्या म्हणजे सरकारी बळाच्या जोरावर खाजगी मालकीचीं करण्याविरुद्ध कांहीं धर्मवाद्यांचा असा आक्षेप आहे कीं भांडवलवाल्यांचीं संपत्तिसाधनें बुचाडून न घेतां त्यांची धर्मबुद्धि वाढवून त्यांकडूनच समाजकल्याण कां साधून घेऊं नये ? जमिनदार, कारखानदार हे आपल्या संपत्तीचे विश्वस्ते म्हणचे निवळ ट्रस्टी असून त्यांनीं आपल्या संपत्तीचा समाजाच्या कल्याणाच्या दृष्टीनें उपयोग करावा अशी महात्मा गांधींची शिकवण आहे. पूर्वीं खेडेगांवांतून समाजांतील वरिष्ठ वर्गास खालच्या वर्गाबद्दल

आपुलकीची भावना असून वात्सल्यानें अथवा धर्मबुद्धीनें ते सर्व समाजास आपल्या संपत्तीचा वापर करूं देत. आज धर्मलोप झाला असल्यानें वरिष्ठ वर्ग लोभी झाला आहे, त्यास धर्मप्रसारानें ताळ्यावर आणावें म्हणजे झालें असें या धार्मिकांचें मत असतें.

जुन्या समाजाबद्दलचें धार्मिकांचें मत गृहीत धरूनहि त्या वेळच्या व आजच्या परिस्थितींत जो फरक पडला आहे त्यामुळें धार्मिकांची विचारसरणी फोल ठरते. मागें आपण पाहिलें आहे की ज्या वेळी आगगाडी, आगबोट, मोटार वगैरे वाहतूकीचीं प्रचंड साधनें नव्हती तेव्हां एका गांवच्या धनिकाचें त्यानें भोगून उरलेलें धन दूर परदेशी नेऊन विकून फायदा मिळविणें अशक्य होतें साहजिकच 'पैसा' या कृत्रिम पण शाश्वत धनप्रकारास महत्त्वहि नव्हतें. डाळ, तांदूळ, कापड हें जें प्रत्यक्ष धन तें विनाशी–थोड्या काळांत भोगून खपविलें नाही तर सडून नष्ट होणार. तसेंच धनसंचय करून सुरक्षित ठेवण्यास जें कायद्याचें व शांततेचे शासन असावे लागतें तेंहि त्या वेळीं नव्हतें. दिल्लीत अवरंगजेबाचा दरारा केवढाहि भयंकर असो. तेथून फार दूर असलेले खेड्यांतील सरदार, जमिनदार, अधिकारी हे सर्व गांवकऱ्यांच्या सद्बुद्धीवरच सुरक्षित असत. गांवांत दारिद्र्य माजलें तर गांवकऱ्यांच्या संतोषासाठी धनिकांस आपल्या पेवांची कवाडें खोलावीच लागत; नाही तर लुटीचें भय असे. सरकारी अधिकाऱ्यांना सुद्धां अशा वेळीं सरकारी धान्याचा सांठा वरिष्ठ सरकारच्या अनुज्ञेवाचून प्रजेस वाटावा लागे आणि वरिष्ठ सरकारपासून या 'अधिकारी दामाजी पंतांचें' रक्षणहि प्रजा स्वतां करी. 'विठू महारा'ची कांही गरज नव्हती.

आज पालटलेल्या काळांत धनिकाचें शिल्लक धन–धान्य, कापड वगैरे– वाटेल तेवढ्या दूर अंतरावर नेऊन विकून शाश्वत व आटोपशीर असें कृत्रिम धन म्हणजे 'पैसा' मालकास मिळविता येतो व कायद्याचा अंमल सर्वत्र जारी असल्यामुळें लक्षावधि लोकांच्या उपासमारीच्या क्षोभापासून धनिकाच्या धनाचें रक्षण केलें जातें. यामुळें एकंदर समाजांत परस्परावलंबनाची भावना पूर्वी कधी असलीच तर ती आज नाहींशी झाली आहे. पूर्वी जर धर्मबुद्धि असली व आतां लोपली असली तर त्या दोहोंचेंहि कारण असें परिस्थितींत सांपडतें. आज जमिनदाराच्या व कारखान-

दाराच्या कायदेशीर मालकी हक्कामुळें त्याचें भांडवल समाजास निरुपयोगी होऊन समाजाचा सांभाळ होणें अशक्य झालें असलें तर 'तूं विश्वस्ता हो व समाजाचा सांभाळ कर' हा गांधींचा केवळ उपदेश ऐकून तो समाजास आपलें धन भोगूं देणार नाहीं.

बरें; त्याचें धन कायद्यानें हिरावून न घेतां त्यास 'विश्वस्ता' कल्पिलें तरी विश्वस्ताच्या कायद्याप्रमाणें म्हणजे ट्रस्ट ॲक्टप्रमाणें त्यावर विश्वस्तेपणाची जबाबदारी लादतां येते काय? आणि 'विश्वस्तेपणा' जर मोहबतीवर ठेवावयाचा तर जमिनदाराची व कारखानदाराची आपल्या जमीन–भांडवलावरील मालकी ही तरी कायदेशीर कशास हवी? त्यावर गोरगरिबांनीं अतिक्रमण केलें असतां पोलीसाची मदत न घेऊन केवळ मतपरिवर्तनाच्या बलावर गोरगरिबास परतविण्यास धनिक वर्ग राजी आहेत काय? सारांश कायदा अथवा धर्मबुद्धि परस्पर असूं शकतात; केवळ एकतर्फी असूं शकणार नाहींत. आजच्या कायद्याच्या जगात कायद्यानें होणाऱ्या अन्यायाविरुद्ध कायद्यानेंच समाजास संरक्षण मिळालें पाहिजे.

धर्मबुद्धि अथवा परोपकार या वाईट भावना आहेत असे कोणीच मानीत नाहीं. सर्व समाजाच्या सांभाळासाठी आत्मार्पण करा असें समाजवाद्यांस शिकविणारा मार्क्स परोपकाराविरुद्ध होता हें संभवतें कसे? रशियांत धर्मप्रसारास जो विरोध आहे त्याचें विशेष कारण समजून घेतलें पाहिजे. युरोपच्या इतिहासांत धर्मसंस्थेचा समाजास फसविण्याचे कामींच केवळ उपयोग झाला यामुळें समाजरक्षणार्थ 'धर्म' संस्थेस कम्युनिस्टांचा विरोध आहे. पण एकानें इतरांच्या हितार्थ झटावें हें मत ज्या रशियांत पढविलें जातें तेथें 'धर्म' बुडाला असें कसे म्हणता येईल?

## मजूर कोण? समाजक्रांतिच कां हावी?

मजूर कोण? भांडवलवाला कुणाला म्हणावयाचें? 'मजूरहो उठा, क्रांति करा' असें मार्क्स कोणास उद्देशून बोलतो? असे प्रश्न पुष्कळांकडून विचारले जातात. ज्याला स्वतांच्या श्रमशक्तीखेरीज मालकीचें संपत्तिसाधन कांहीहि नसतें म्हणून जो आपल्या चरितार्थासाठीं भांडवलवाल्यास श्रमशक्ति विकूनच जगूं शकतो तो मजूर, अशी एंजल्सनें मजूराची व्याख्या केली आहे. या अर्थानें कारखान्यांतील व शेतावरील सामान्य मजूराप्रमाणें

कारखान्यांतील मोठमोठे अधिकारी, सरकारी कारकून, शाळामास्तर अगदीं गव्हर्नर–व्हाइसरॉय हे सर्व मजूरच ठरतील. पण मार्क्सला समाजक्रांतीच्या दृष्टीनें उपयुक्त असा मजूर वर्गच नेहमीं अभिप्रेत आहे. वाक्यपृथक्करण करणाऱ्या व्याकरण–शिक्षकाप्रमाणें समाजपृथक्करण करीत बसणें एवढेंच मार्क्सचें ध्येय नव्हतें. तो क्रांतिकारक होता. कुस्तींतील गड्याप्रमाणें प्रतिपक्षास म्हणजे भांडवलशाहीस कोठें, केव्हां शक्ति लाविली असतां तिचा पाडाव होईल हें त्यास पाहावयाचें होतें. म्हणून त्यानें प्रथम समाजघटनेचें मर्म शोधलें व तें आर्थिक उत्पादनप्रकारांत आहे हें तत्त्व सांगितलें. भांडवलशाहीचा उत्पादनप्रकार मुख्यत: प्रचंड कारखाने व आगगाड्या यांच्या बळावर आधारला असल्यानें, आगगाड्या, कारखाने इत्यादि चालविणारे मजूरच हीं उत्पादनसाधनें जिंकून घेतील असें मार्क्सनें ताडलें व कारखान्यांतील मजूरांस क्रांतीची हाक दिली. आगगाड्या व कारखाने यांत काम करणाऱ्या कामगारांनीं संप केल्यास समाजक्रांति व राज्यक्रांतिही होईल. कारकून व शाळामास्तर यांच्या संपानें असंतोष व्यक्त झाला तरी राज्यक्रांति होऊं शकत नाही. यामुळें यांत्रिक कारखान्यांतील मजूरवर्ग हा अखिल कष्टजीवि समाजाचा पुढारी वर्ग होय असेंहि मार्क्स व लेनिन यांचें मत आहे.

आपल्या मजूरसंघाच्या द्वारां मजूरांनीं फक्त आपली आर्थिक परिस्थिति सुधारून घ्यावी, राज्यक्रांति व समाजक्रांतीच्या भरीस पडूं नये असें कांहीं मजूर चळवळीचे पुढारी म्हणत असतात. यास वर लिहिलेल्या मार्क्स व लेनिन यांच्या मतांतच उत्तर दिलेलें आहे. एकंदर लोकसंख्येच्या प्रमाणांत कारखान्यांतील मजूरवर्ग अतिशय अल्पसंख्य असतो. कारखान्यांतील मजूरांची लोकसंख्या जेथें सगळ्या जगांत अधिक त्या इंग्लंडांतील सहा कोटी लोकसंख्येपैकी फक्त एक कोटी साठ लक्ष लोकसंख्या कारखान्यांतील मजूरांची आहे. हिंदुस्थानांत तर ३५ कोटींपैकी फक्त १४ लक्ष लोक कारखान्यांत मजूर आहेत. पण भांडवलशाहीचें दुःख फक्त यांनाच भोगावें लागतें काय ? एकदां आगगाडीचा रूळ ज्या प्रदेशांत शिरला त्या प्रदेशांत धनाची लूट व कष्टजीवि वर्गांची पिळणूक सुरू होते. कायद्याचा अंमल जारी होतो. थोडथोडक्या लोकांच्या हातांत संपत्तिसाधनें जाऊं लागतात. नफा वाढविण्याच्या व सांचविण्याच्या सोयी वाढल्यानें लोभहि बळावतो. अशा

लोभी व बळी अल्पसंख्य वर्गाच्या हातीं सर्व संपत्तिसाधनें गेलीं म्हणजे सर्व समाजाचें जीवित गळास अडकलेल्या माशाप्रमाणें भांडवलवाल्यांच्या चिमटयांत सांपडतें. यामुळें भांडवलशाही मोडून संपत्तिसाधनें सर्वांच्या मालकीचीं केल्याशिवाय अखिल समाजाचा सांभाळ होऊंच शकत नाहीं. पण, ही सामाजिक क्रांति करण्यास कारखान्यांतील मजूराखेरीज बाकीचा बहुसंख्य समाज अगदी दुबळा असतो. कारकून, प्रोफेसर, शेतकरी, व्यापारी इमारत–कंत्राटदारांचे लक्षावधि मजूर, घरकाम करणारे मजूर या सर्वांचें भांडवलशाहीमुळें अव्याहत रक्तशोषण चालत असूनहि सापाच्या तोंडांत सांपडलेल्या बेडकाप्रमाणें हे आपल्या दुःखापुढें अवश असतात. हा बेडूक साप आपणास खात असतांच आपणहि 'माशिया जिभा वेटाळीत' असतो, त्याप्रमाणें हे सर्व लोक भांडवलशाहीच्या चिमटयांत तडफडत असतांहि एकमेकांची पिळणूक करीतच असतात. पण, भांडवलशाहीचें वर्मस्थान म्हणजे यांत्रिक कारखाने वगैरे यांच्या हातीं नसल्यानें भांडवलवाल्यांविरुद्ध नुसतीं मनगटें चावण्यापलीकडे यांना कांहीहि करतां येत नाहीं. उलट कारखान्यांतील मजूर व भांडवलवाले यांचा लढा लहान मुलांच्या पुस्तकांतील साप व मुग्या यांच्या लढ्याप्रमाणें आहे. सापानें गर्वभरानें मुंग्यांची एक रांगची रांग चिरडून टाकली खरी; पण भितीवर चढत असतां कांचेनें अंग कापलें तेथें मुंग्यांनी नेमकें डसून सापाचा नाश केला. त्याप्रमाणें भांडवलवाले एरवी मजूरास भरडून काढीत असले तरी आर्थिक संकटाच्या काळीं मजूर हे एकजुटीनें वर्मावर आघात करून भांडवलशाही उलथून पाडूं शकतात. बेडकाचें सापापुढें कधींच चालत नाहीं त्याप्रमाणें कारकून, मास्तर व शेतकरी यांचें भांडवलवाल्यांपुढें कांहीं चालत नाहीं. म्हणून या एकंदर समाजाचीं संकटें निवारण्यासाठीं केवळ आपल्या आर्थिक फायद्यावर दृष्टि न ठेवतां मजूरांनीं समाजक्रांतिच घडवून आणली पाहिजे. त्यांनाच हें शक्य आहे; म्हणून त्यांच्यावरच ही जबाबदारीहि आहे असें समाजवाद्यांचें म्हणणें आहे.

## 'चरितार्थापुरत्या मजूरी' चा सिद्धांत

मजूरांस केवळ 'चरितार्थापुरतीच मजूरी' (सब्सिस्टन्स वेज) मिळतें असें मार्क्सनें म्हटलें असून प्रस्तुत पुस्तकांतील सर्व युक्तिवाद आरंभापासून त्यावर आधारला आहे. 'मजूर हे संघटना करून मजूरी वाढवून घेतात, अमेरिकेंत

मजूरांना मोटारी आहेत, मोठमोठे अधिकारी हेहि मजूर म्हटले तर त्यांना पगारांचीं ओझीं उचलतहि नाहींत आणि इंग्लंड–अमेरिकेंतील मजूरांनी भांडवलाचे मोठमोठे भाग खरेदी केलेले असतात' अशीं अनेक उदाहरणें घेऊन मार्क्सचा हा 'चरितार्थापुरत्या मजूरीचा सिद्धांत' चूक आहे असें कोणी म्हणतात. यास पहिलें उत्तर असें आहे की निरनिराळ्या देशांची तशीच व्यक्तींचीहि राहणी कमी अधिक उच्च दर्जाची असते व त्याप्रमाणें 'चरितार्थास' लागणाऱ्या संपत्तीत फार मोठी तफावत असू शकते हें मार्क्सनें कॅपिटलमध्यें अनेकवार स्वतांच दाखविलें आहे. तें त्यास अमान्य नाही. पण एकंदर मजूरवर्गासंबंधी बोलतांना त्यांतील बहुसंख्यांची स्थिति काय होते हें पाहणें हेंच इष्ट असतें. इंग्लंडांतील मजूर सुखी आहेत असें म्हणताना भांडवलशाहीनें सर्व जग एक केलें असून इंग्लंडांतील एका मजूराच्या सुखासाठीं हिंदुस्थानांतील दहा घरांची होळी होते हें आपण लक्षांत घेतलें पाहिजे. बी. ए. झाल्याबरोबर पाऊणशें रुपयांची नोकरी वाढून येत होती तेथें आता पन्नास रुपयांस दोन बी. ए. मिळतात तरी त्यांचा खप नाही. तेव्हां सुशिक्षित व विद्वान् यांनाहि येथें चरितार्थापुरतेंहि मिळत नाहीं हें खरें नव्हे काय? कारखान्यांतून एखाद्या कसबी कारागिरास चांगलें वेतन मिळालें तरी इतर दहांना फुटाणे फाकावे लागतात त्याची काय वाट?

मार्क्सनें 'चरितार्थापुरत्या मजूरी'च्या तत्त्वाचा उपयोग आपल्या युक्तिवादांत कशासाठीं केला आहे तेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. मार्क्सला हें दाखवावयाचें आहे कीं मजूरांच्या बाजारांत मजूरी जी ठरते ती मजूरानें भांडवलाशीं आपल्या श्रमशक्तीचा संयोग करून निर्माण केलेल्या संपत्तींतील श्रमाचा भारंभार वाटा त्यास मिळाला पाहिजे या तत्त्वावर ठरत नाही; तर, कारखानदाराला वाढावा मिळविण्यासाठीं मजूराच्या श्रमशक्तीची नेहमीं जरूरी असते व ती टिकून राहील इतकेंच श्रमभांडवलसंयोगजन्य संपत्तींतील फल तो त्यास देतो; याहून अधिक राहणारा वाढावा भांडवलदारास आयता मिळतो; असा वाढावा मिळूं लागला कीं संपत्ति निर्मिण्याचें ध्येय समाजाचा संभाळ हें न राहून वाढाव्याची प्राप्ति हें होतें; चरितार्थापुरती मजूरी वाटून भांडवलदारानें वाढावा मिळविला तरी तो त्यास विकून मग त्याचा नफा करावा लागतो; पण, उत्पन्न झालेल्या मालाची विक्री होईल

इतकी खरेदीशक्ति मजूरीच्या रूपानें वाटली न गेल्यानें माल न खपतां शिल्लक राहतो म्हणून निर्मिती बंद होते व संपत्तीजवळ बेकारी व दारिद्र्य वाढतें. मजूरांनीं केलेल्या श्रमाबद्दल जी मजूरी द्यावयाची ती त्यांची उत्पादनशक्ति टिकविणें याच ध्येयानें न देतां उत्पन्न झालेल्या संपत्तीचा भरपूर भोगवटा त्यांस मिळावा हें मजूरी वाटण्याचें ध्येय असलें पाहिजे तरच समाजांत सुव्यवस्था व सौख्य नांदेल. म्हणून वाढाव्यासाठी झगडणारी भांडवलशाही मोडून, नवी व्यवस्था निर्माण करावी हें मार्क्सचें प्रतिपाद्य आहे. हेन्री फोर्ड आपल्या मजूरांस अधिक मजूरी देतो त्यांत मजूरांची उत्पादनशक्ति वाढविणें, श्रमशक्ति अधिक समर्थ करणें म्हणजेच त्यास उत्पादनासाठीं जगविणें हेंच त्याचें ध्येय असतें. गाईस उत्तम वैरण खातांना आनंद होतो त्याप्रमाणें फोर्ड यांच्या मजूरास मोटारीत बसून मोज वाटत असेल. पण गाईला आनंद व्हावा म्हणून नव्हे तर उत्तम वैरणीहून पुष्कळ अधिक किंमतीचें दूध तिनें द्यावें म्हणून गवळी वैरण घालतो त्याप्रमाणें आपल्या मजूरांनीं उच्च दर्जानें राहून त्या प्रमाणांत खूपच वाढावा द्यावा हें ध्येय मजूरांस मोटारी देण्यांत फोर्ड यांचें असतें. या ध्येयांत चूक अशी कीं जों-पर्यंत वाढावा हें ध्येय शिल्लक आहे व तो विकून नफा मिळावयाचा आहे तोंपर्यंत जगांतील सर्व मजूर व सर्व भांडवलदार अशा जागतिक दृष्टीनें पाहि-ल्यास, निर्माण झालेल्या मालास खरेदी करण्याइतकी खरेदीशक्ति वाटली जाणार नाहीं म्हणून माल पडून राहणार, कारखाने बंद पडणार व बेकारी व उपासमार वाढणार. या अनर्थाचा शेवट होण्यास संपत्तिसाधनें खाजगी मालकांचे हातून निघून समाजसत्तेंत आलीं पाहिजेत.

## ‘संपत्ति श्रमांतूनच निपजते’

‘संपत्ति ही श्रमामुळेंच निर्माण होते’ याचा अर्थ फक्त शारीरिक श्रमानेंच संपत्ति निर्माण होते असें म्हणण्याचा मार्क्सचा आशय नाही. सर्व प्रकारच्या बुद्धिजीवी वर्गांचा समावेश मार्क्सनें उत्पादकांत केला आहे. कारखान्यांतील मजूरांवरच त्याचें विशेष लक्ष असण्याचें कारण याच प्रकरणांत वर दिलें आहे.

श्रमानेंच संपत्ति निर्माण होते हें तत्त्व मार्क्सनें प्रथम शोधून काढलें नसून त्याच्यापूर्वीं भांडवलशाहीच्या अर्थशास्त्रज्ञांनीं त्याचा शोध लाविला आहे. तोहि अशासाटीं कीं भांडवलवाल्यांना धनोत्पादनासाठीं जमिनीची गरज

होती; पण जमिनदारांच्या हातांत जमिनी होत्या. त्यांना अर्थशास्त्रज्ञांनीं सांगितलें की 'तुमची मालकी ही कांहीं संपत्ति निर्माण होण्याचें कारण नव्हे. तुम्ही मालक असलां अथवा नसलां तरी जमिनीचे गुणधर्म आहेत तेच आहेत. धनप्राप्तीसाठीं त्यावर श्रमच केले पाहिजे. यासाठी तुमची जमीन समाजानें तुम्हांकडून घेणें हा समाजाचा हक्कच आहे.' हाच युक्तिवाद भांडवलवाल्या-वर उलटवून मार्क्स भांडवलवाल्यांस विचारतो कीं 'भांडवलाचे मालक या नात्यानें तुम्ही वाढावा लाटतां हें खरें. पण तुम्ही मालक असलां अगर नसलां तरी भांडवलाचे गुणधर्म आहेत ते आहेतच. संपत्ति निर्माण होणार ती श्रमामुळेंच होणार. मग तुमचें भांडवल तरी सार्वजनिक मालकीचें कां करूं नये?'

संपत्ति श्रमामुळेंच निर्माण होते, कारण प्रथम भांडवलहि सृष्टीवर कष्ट करून निर्माण होतें. या सिद्धांतापासून 'म्हणून प्रत्येक मजूरास त्यानें जें निर्माण केलें तें दिलें पाहिजे' असा निर्णय मार्क्स काढीत नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. उलट समाजांत श्रमविभागपद्धति हजारों वर्षे रूढ असून कुंभारानें गाडगीं व शेतकऱ्यानें धान्य निर्मून आपापल्या मालाच्या विनिमयानेंच जगलें पाहिजे हें समाजस्वरूप मार्क्सनें पुनः पुनः विशद करून सांगितलें आहे. भांडवलशाहींत हें सामाजिक उत्पादन अवाढव्य होत असल्यानें कोणा-सहि आपल्या श्रमाचें नेमकें फळ निवडून मापून वेगळें काढणें अशक्य. म्हणून 'सर्वांनीं आपल्या शक्तीनें खपून निर्मावें व मग प्रत्येकास त्याच्या गरजेप्रमाणें त्याचा उपभोग मिळावा' (फ्रॉम ईच अ‍ॅकॉर्डिंग टु हिज कपॅसिटी टु ईच अ‍ॅकॉर्-डिंग टु हिज नीड्स्) हें श्रम व भोग यांचें नीतितत्त्व मार्क्सनें प्रतिपादिलें आहे.

## उत्पादन व उपभोग यांचें नीतिशास्त्र

'प्रत्येकानें शक्तीप्रमाणें निर्मावें व जेवढें कमीअधिक निर्मूं तेवढेंच भोगावें असें न म्हणता गरजेप्रमाणें भोगावें असें मार्क्स म्हणतो, यांत नीतिशास्त्र तें काय आहे? उच्च दर्जाच्या कामाचा मोबदला उच्च दर्जाचा व हलक्या दर्जाच्या कामाचा मोबदला हलक्या दर्जाचा असें असणें हेंच सुनीतिशास्त्र होय,' असा मार्क्सच्या मतावर एक आक्षेप असतो; त्याचा येथें थोडा विचार करूं.

येथें ही गोष्ट ध्यानांत ठेविली पाहिजे कीं मार्क्सला हवी त्या प्रकारची समाजव्यवस्था जेथें बांधिली जात आहे तेथें वर सांगितलेलें मार्क्सचें नीति-

तत्त्व अजून अमलांत नाहीं. तें हळूहळू अमलांत आणण्याचें रशियन सरकारचें ध्येय आहे. कधीं काळीं तरी हें तत्त्व अमलांत यावयाचें असेल तर तें सुनीतितत्त्व ठरलें पाहिजे हें मात्र खरें आहे. तसें तें ठरतें कीं नाहीं हें पाहूं.

आधी हल्लींच्या समाजरचनेंत उच्च दर्जाच्या कामास उच्च मोबदला व हलक्या दर्जाच्या कामास हलका मोबदला हें नीतितत्त्व पाळलें जातें काय ? ब्रिटिश अमदानींत एक काळ असा होता कीं, बी. ए., एल्. सी. ई., एल्. एम्. एस्. वगैरे लठ्ठ लठ्ठ पदव्या मिळाल्या कीं फार मोठ्या पगाराची नोकरी सांगून येई आणि थोरामोठ्याची सुरेख मुलगी मूळच्या गरीबासहि नोवरी मिळे. त्यामुळें असा समज पसरला होता की अंगीं करामत असल्यास ब्रिटिश राज्यांत मोठी नोकरी व सुंदर नवरी हीं निश्चितपणें मिळतात. न्या. रानडे, प्रि. आपटे, रँ. परांजपे, सि. वि. पटवर्धन हीं माणसें 'कमिटीच्या कंदिलावर बुकें घोकून' मोठीं झालीं म्हणे. सीताराम विश्वनाथांची तर अशी गोष्ट सांगतात कीं ज्या खुटीवर त्यांनीं विद्यार्थीदशेंत मधुकरीची झोळी नेहमीं ठेवावी त्याच खुंटीवर पुढें फार मोठे झाल्यावर ते एक दिवस आपलें पागोटें ठेवीत असतां आपण केवढ्याशाचे केवढे झालों म्हणून त्यांच्या डोळ्यांना आपलेंच कौतुक वाटलें व टच्कन पाणी आलें. याप्रमाणें इंग्रजी राज्यांत त्या वेळीं गुणाची पारख होती म्हणून गुणाचें पूर्ण मोल नेहमीच मिळतें असा भाबडा समज सगळेच जण उराशीं बाळगून बी. ए., एल्. सी. ई., एल्. एम्. एस्. या पदव्यांकडे, पिकल्या झाडाकडे पाखरांनीं धावावें त्याप्रमाणें, तरुणांनीं धांव घेतली आणि भांडवलशाहीचा माल जसा ढिगांनीं निर्माण होतो तशी बी. ए.,–एम्. एं.ची गर्दी उडाली. कित्येकांनीं विलायतेच्या सफरी मारून मारुतीच्या शेपटाएवढ्या लांब पदव्या आणल्या. पण भांडवलशाहीच्या मालाप्रमाणें या पदवीधरांचा हल्लीं भाव उतरला आहे. रावण खुर्ची देईना म्हणून अंगदानें आपल्या शेपटाचा डोंगर रचून त्यावरच आसन ठोकलें त्याप्रमाणें पदवीधरांना न्यायाधीशाची खुर्ची, निदान बाक, प्रोफेसरचें व्यासपीठ, निदान मास्तराची छडी असें कांहींच न मिळाल्यानें पदव्यांचे शेपटावर आसन मांडून फाके मारीत बसण्याचा प्रसंग आला आहे. वाचक म्हणतील हा उनाड सोशॅलिस्ट आपली कुचेष्टा करतो. सद्गृहस्थहो, ही कुचेष्टा मी करीत नाहीं. तुमची व माझी सग-

ळयांचीच होणारी चेष्टा तुमच्या ध्यानीं आणतों आहे. देशभक्तीसाठीं अवतरलेल्या शिक्षणसंस्थांत तेरा तेरा वर्षांत नोकरी कायम होत नाहीं, प्लेगच्या दिवसांत मुलांची फी येऊनहि 'टेंपरवारी' मास्तरांचे पगार मिळत नाहींत, पूर्ण वय व पूर्ण शिक्षण होऊनहि लग्न करण्याची ऐपत येत नाहीं, परीक्षा पास झाल्यावर 'आतां पुढें काय' म्हणून डोळयाला अंधेरी येते, ही सगळी सुशिक्षितांची टवाळी कोणीं चालविली आहे? गुणाची पारख होते हें म्हणणें आजतरी खोटें ठरलें ना? पण तें कधींच खरें नव्हतें. जें खरें होतें तें भांडवलवाल्यांचें 'मागणी व पुरवठा' हें 'नागडें नीतितत्त्व.' सिताराम विश्वनाथ एक होते व सरकारला दोन हवे होते तेव्हां त्यांची झोळी खुंटीवरून उतरली आणि पगडी खुंटीवर चढली. पण आतां सीताराम विश्वनाथ झाले पन्नास आणि सरकारला हवेत फार तर चार, पाच, दहा. तेव्हां आतां बाकीच्यांना सीताराम विश्वनाथांच्या पगडीचे धन्यवाद न मिळतां त्यांनीं गाळलेल्या अश्रूंचा अभिषेक मात्र स्वतांवर करून घ्यावा लागत आहे. उच्च दर्जाच्या कामाला उच्च दर्जाचें वेतन व हलक्या दर्जाच्या कामाला हलकें वेतन हें आज कोठेंहि अमलांत नाहींच. पण, काम करूं म्हटलें तरी कोणाला त्याची गरज नाहीं. शाळा, हपीसें, कारखाने, हटेलें येथें 'नोकर नको' अशा पाट्या झळकत आहेत. आणि बुद्धिवान, विद्वान व कर्तबगार तरुणांच्या कपाळावर 'जगास तुम्ही नको' हे शब्द कोणी तापलेल्या ठशांनी मारल्याचा तरुणांना भास होत आहे. 'माझी जगांत कोणासच गरज नाहीं' असें समजून येणें याहून अधिक दुःखद जगांत कांहीं तरी आहे काय?

पूर्ण सोशॅलिस्ट समाजरचनेंतहि उच्चनीच दर्जा अखेर ओळखला जाणार नाहीं हें निश्चित आहे. कारण अमुख एक काम उच्च दर्जाचें व दुसरें हलक्या दर्जाचें हें ठरविण्याची कसोटीच मिळूं शकत नाहीं. समजा पुण्याहून मुंबईस आगगाडी गेली तर तिच्या कामीं कांहीं तरी १०० माणसांचे श्रम खर्ची पडले. यांचें वेतन आतां कसें ठरवायचें? अमक्यानें अमुक अंतर गाडी ढकलली असें का आपल्याला प्रत्येकाचें काम मापता येणार आहे? नाहीं. बरें अमक्या माणसानें जें केलें तें त्यानें नसतें केलें तर जी उणीव पडली असती तें आणि तेवढें काम त्याचें, असें तरी आपणास म्हणतां येईल काय? समजा, मुंबईच्या बोरीबंदर स्टेशनांत गाडी शिरली आणि तिथें

सांधे बदलणाऱ्यानें सांधे बदलले नसते तर किती नुकसान झालें असतें असा आपण विचार केला, तर आपणाला काय आढळेल ? गाड्यांची टक्कर झाली असती. पाच पन्नास माणसें मेलीं असतीं आणि हजारों रुपयांची संपत्ति नाश पावली असती. मग काय प्रत्येक सांधे बदलणारास प्रत्येक वेळीं एवढ्या किंमतीची मजूरी देणार ? मग हेन्री फोर्ड आपले कारखाने बंद करून बोरीबंदरावर सांधे बदलायलाच येऊन राहील.

कोणी म्हणतात कीं अहो, ज्याच्या शिक्षणाला खर्च, वेळ व मेहनत फार पडली त्यास शिक्षण झाल्यावर इतराहून श्रेष्ठ मानून अधिक वेतन दिलें पाहिजे. पण यास उत्तर असें कीं शिक्षणाच्या खर्चाच्या रकमेचा प्रश्न असेल, तर भावी समाजवादी सरकार सर्वांच्या शिक्षणाचा खर्च सोसेलच. ठीक. वेळ व मेहनत यांचें काय ? येथेंहि प्रश्न असा कीं खुर्चीवर बसून अतीशय बुद्धिमत्ता लागणारीं गणिताचीं प्रमेयें सोडविणारा रँगलर व त्याच्या खिडकीखालींच रस्त्यावर केर उपसणारा झाडू या दोघांच्या मेहनतींत श्रेष्ठ कनिष्ठ ठरविण्याचें काय साधन आपल्याजवळ आहे ? मनावरील पूर्वसंस्कारामुळें ही तुलना एकदम अगदीं कशीशीच वाटतो. पण तात्त्विक दृष्टीनें पाहतां त्यांत कांहीं तरी श्रेष्ठकनिष्ठपणा आहे काय ? रँगलर बुद्धीनें श्रेष्ठ म्हणून त्याची बुद्धि पोसण्यासाठीं त्याला लोणी, साजुक तूप, गहूं असें खाद्य घाला. झाडूवाल्याला ताकद फार पाहिजे असेल तर त्याला मांस खायला घाला. हें ज्याच्या त्याच्या गरजेप्रमाणें देणें झालें. पण झाडूवाल्याला उद्यांची ददात पडेल एवढें थोडें वेतन आणि एकाद्या रँग्लरला नाहीं तर गिरणींतील रसायनशास्त्रज्ञाला नातवंडापर्यंत बँक संपणार नाहीं एवढा पगार आज मिळूं शकतो तो कशासाठीं ? पण इतकें थोडेसें दिग्दर्शन करून हा मुद्दा वाचकांना पुढें विचार करण्यासाठीं येथेंच सोडून देतों. उद्यां समाजवादास हवी तशी क्रांति झाली तर एकदमच मार्क्सचे श्रम व भोग यांचें वर सांगितलेलें नीतितत्त्व अमलांत येईल अशी भीति कोणींहि बाळगूं नये. प्रथम ददात कोणासच राहणार नाहीं ही मात्र खबरदारी घेतली जाईल खास. जगांत जन्मलेल्या कोणाच्याहि कपाळीं ‘कोणासच नको’ हा शिक्का कधींहि मारला जाणार नाहीं.

## समाजसत्तेत उत्पादन कसें होईल

समाजवाद्यांविरुद्ध नेहमीं असा एक आक्षेप घेण्यांत येत असतो की भांडवलशाही नष्ट करून नफ्याची पद्धति बंद केली तर संपत्तीचें उत्पादनच बंद होईल; कारण नफा नाहीं तर श्रम कोण करणार? शेतकरी स्वतांच्या देखरेखीखालीं मजूरास राबवून घेतो तेव्हांच तो कांहीं तरी काम करतो. शेतकरी गड्यावर काम सोपवून निघून गेल्यास तो परत येईपर्यंत गड्यानें चुकारपणानें वेळ गमावून फक्त आपली मजूरी लागू केली पण कामाचा उठाव मुळींच झाला नाहीं असें घडणें हा अनुभव अगदी नेहमींचा आहे. पण शेतकरी देवघेव करील ती नफ्यावांचून कां करील?

शेतकऱ्यास लहानशा शेतावर येणारा हा अनुभव भांडवलशाहीच्या प्रचंड उत्पादनास मुळींच लागू नाहीं. भांडवलशाहीच्या एकाद्या प्रचंड कारखान्याचें अथवा अनेक कारखान्यांचें उत्पादन कसें चालतें? याचे मालक, व मजूर कोण व कोठें असतात? हे धंदे बहुधा हजारों भागीदारांच्या भागीनें उभारलेले असतात. हे हजारो भागीदार सगळ्या जगभर पसरलेले असून दरसाल त्यांना जो नफा येत असतो त्यापलीकडे धंद्याची त्यांना कांहीच माहिती नसते. धंद्याचे डायरेक्टर्स म्हणून आठ दहा मोठ्या भागीदारांचें मंडळ काय करीत असतें? हें मंडळ धंदा कसा चालवितें? कारखाना प्रचंड असतो. असे कारखाने एका ठिकाणीं अगर एका देशांतहि नव्हे तर अनेक देशांत एकाच कंपनीचे एकाच वेळीं चाललेले असतात. स्वतां भागीदार व चालक मंडळ यांनीं यांवर देखरेख करणें केवळ अशक्य आहे. शिवाय प्रचंड प्रमाणावरील धंद्यांतलें कौशल्य इतकें विविधता पावलें आहे व सूक्ष्म झालें आहे कीं तें संपादण्यास अनेक बुद्धिमान माणसांना अनेक वर्षें शिक्षणसंस्थांत मेहनत करून तें मिळवावें लागतें. अर्थात् चालकांना हें सर्व कौशल्य असूं शकणें बहुधा अशक्यच आहे. मग प्रचंड भांडवली धंदा कसा चालतो? केवळ पगारी माणसांच्या कर्तृत्वावर, हें याचें उत्तर आहे. प्रचंड धंद्यांत निरनिराळ्या शाखांचें विशेष ज्ञान असलेले अनेक तज्ज्ञ असतात. अशा तज्ज्ञांच्या हवालीं धंदा केलेला असून चालक मंडळ हे तज्ज्ञ सांगतील तसें वागत असतें. या तज्ज्ञांच्या हाताखालीं हजारो माणसें राबत असतात व त्यांतहि लहान मोठ्या तज्ज्ञांचीच भरती झालेली असते.

यांत्रिक व हिशेबी उत्पादनपद्धति हा प्रचंड उत्पादनाचा प्राण होय. अमुक यंत्रापासून अमुक पद्धतीनें, अमुक इतकें व अमुक जातीचें काम होतें हें निश्चित असतें. देखरेखीचें व हिशेबाचें शास्त्र इतकें बिनचूक झालें आहे कीं चारदोन तपशील पाहिल्यास हजार तपशीलांचा अंदाज बिनचूकपणें समजतो. झालेल्या कामाची नोंद खुद्द यंत्रावर होऊं शकते आणि महिनाभर चाललेल्या कामाचा अडाखा एक मिनिटांतहि सांगता येतो. अचूक बेरजा करणारीं यंत्रें निघालीं आहेत यामुळें हिशेबांत लबाडी अथवा चूक होऊं शकत नाहीं. विशिष्ट पद्धतीनें वर्षानुवर्ष कामाचें शिक्षण घेत असतांना शरीरास कामाचा असा सराव होतो कीं खुर्चीवर बसून पाय हालवितांना जसें सुख वाटत असतें तसें धंद्यांतलें रोजचें नियमित काम करीत राहण्यांत वाटत असतें. अशा प्रकारें देखरेखीचें शास्त्र, कर्तृत्वाचें शिक्षण व यांत्रिक नियमित उत्पादन यांमुळें, ज्यांना नफ्याची प्रेरणा नाही पण लहान अथवा मोठी मजूरी मिळते अशा मोठ्या ऑफिसरापासून तो लहानशा हमालापर्यंतच्या लहान मोठ्या हजारो मजूरांनीच एक एका मालकाचे इंग्लंड, हिंदुस्थान, चीन इतक्या दूरदूरच्या देशांतले कारखाने चालविले आहेत. या मजूरांत अजून पगाराची व कार्यक्षमतेचीहि विषमता पुष्कळच आहे खरी. पण, शिक्षणाच्या सोई अफाटपणें वाढत असून वाकबगारींत सारखेपणा येत आहे. यामुळें मजूरीहि सारखी होण्याकडे कल आहे. सारांश, नफ्याशिवाय धंद्यांतील कर्तृत्वास प्रेरणा नाहीं हें म्हणणें प्रचंड भांडवली धंद्यास भांडवलशाहीतच लागू पडत नाहीसें झालें आहे. उत्पादनपद्धति आजच पूर्णपणें सामुदायिक झाली असल्यानें सर्व उत्पादक भांडवलाची मालकीहि सामुदायिक होण्याला अडचण कांहींच राहिली नाहीं. भांडवलशाही नष्ट करणें म्हणजे यांत्रिक उत्पादन बंद करणें असा त्याचा अर्थ नसून हीं सर्व यंत्रें खाजगी मालकीतून काढून सार्वजनिक मालकींत घेणें असा आहे.

## हिंदी संस्कृति व सोशॅलिझम

या सर्व विवेचनावरून हिंदुस्थानच्या संस्कृतीस सोशॅलिझम् जुळणार नाही, हा व असले इतर आक्षेप हास्यास्पदच ठरतात. भांडवलवाल्यांच्या कर्तृत्वावर जें प्रचंड उत्पादन होऊं लागलें तें हिंदी संस्कृतीस खपलें ना? सोशॅलिझम् यांत्रिक उत्पादन बंद करणार नाहीं. आज समाजास खरेदीशक्ति पुरेशी

न वाटली गेल्यामुळें म्हणजे मजूरी पुरेशी न मिळाल्यामुळें यांत्रिक उत्पादनाचा अफाट माल पडून राहून नवीन उत्पादन थांबतें व बेकारी वाढते. म्हणून ही नफापद्धति ऊर्फ भांडवलशाही बंद करावी व उत्पादन सार्वजनिक करावें; जितका माल उत्पन्न होईल तितक्या मालाची किंमत मजूरीच्या रूपानें अथवा शाळा, बागा, आरोग्यकारक घरें, औषधें वगैरे मोफत सोईच्या रूपानें–समाजास वाटावीं व पुरेसें उत्पादन झाल्यावर फुरसतीचा वेळ वाढवावा; हें सोशॅलिस्टांना साधावयाचें आहे. जेथें भांडवलशाही राहूं शकली तेथें त्याहून श्रेष्ठतर अशी समाजवादी घटना कां नांदू शकणार नाहीं? स्त्रीस्वातंत्र्य, धर्मस्वातंत्र्य वगैरे प्रकार भांडवलशाहीबरोबरच आले आहेत. सांपत्तिक सुबत्ता व व्यावहारिक स्वातंत्र्य यांबरोबर समाजसुधारणेचे हे प्रकार येणारच असल्यानें त्यासंबंधीं येथें अधिक लिहीत नाहीं. आर्थिक क्षेत्रांत समाजवाद पत्करण्याचें आपण ठरविल्यास इतर सामाजिक बाबतींत कसें वागावें याची स्वतंत्र चर्चा करण्यास देखील हरकत नाही.

## मार्क्सनें वर्गकलह माजविला काय?

मार्क्सनें वर्गकलह माजविला हा आक्षेप आतां शिळा झाला असून समाजांत माजत असलेला फक्त वर्गकलह स्पष्टपणें दाखविण्याचें काम मार्क्सनें केलें, ही गोष्ट मार्क्सचे प्रतिपक्षीहि आतां मान्य करीत आहेत. एच्. जी. वेल्स म्हणतात, "गरीब व भांडवलहीन अशा सर्व वर्गांत ऐक्यभावना व धनवंताबद्दल विरोधी भावना हल्लींच्या जगांत एकसारखी वाढत आहे..... जुने वर्गभेद मोडत चालले असून सर्व भांडवलहीन लोकांची राहणी एकाच प्रकारची व शिक्षण एकच प्रकारचें होत आहे आणि शरीरसंबंध व शिक्षण सरमिसळ होऊं लागलीं आहेत. सामान्य वर्गांतील माणसांना वरच्या दर्जांत चढणें अधिकाधिक अशक्य होत आहे." भांडवलाचें केन्द्रीकरण वाढत असल्यानें 'रावाचे रंक' पुष्कळ होत आहेत पण 'रंकांचे राव कोणीच होत नसून' भांडवल शाही सर्व समाजास 'रंक' करीत आहे. "मार्क्सनें" वेल्स म्हणतात "वर्गकलह माजविला नाहीं तर कसा वाढत आहे तें दाखवून दिलें. मार्क्सनंतर घडलेल्या इतिहासानें त्याचें म्हणणें खरें करून दाखविलें आहे." (औटलाइन ऑफ हिस्टरी)

इतिहासांत आगाऊ असलेल्या वर्गकलहाचा मार्क्सनें समाजक्रांतीसाठीं उपयोग करून घेतला व वर्गयुद्धाच्या पायावर आपली क्रांतिशास्त्राची इमारत उभारली हें मात्र खरें आहे. याचें कारण, मार्क्सच्या मतें, एका वर्गानें दुसऱ्या वर्गावर चढाई करून प्रभुत्व मिळविणें हा इतिहासक्रमच होता. कल्पनावाद्यांनीं भांडवलवाल्यांनीं उदार अंतःकरणाचें व्हावें असें प्रतिपादिलें; त्यांस मार्क्सचें म्हणणें असें कीं प्राचीन समाजघटना भांडवलवाल्यांनीं बळजोरीनें उलथून पाडल्या असून संपत्तिसाधनें स्वतांच्या फायद्यासाठीं त्यांनीं लढाई करून काबीज केलीं आहेत. ती ते सुखासुखी देतील असें मानणें इतिहासास धरून नाहीं. शिवाय आपली उन्नति करण्यासाठीं स्वावलंबनानें प्रतिपक्षाशीं झगडण्यांत मजूरांची जी कर्तबगारी, संघटना, ऐक्यबुद्धि व युद्धकौशल्य ही वाढत असतात तीं वाढण्यास त्यांच्या अंतःकरणांत आगाऊच वसत असलेल्या वर्गकलहाच्या भावनेस चालना देऊन त्यावरच आपले डावपेच उभारले पाहिजेत. पण मार्क्सच्या शिकवणींत द्वेष हा तमोगुणच फक्त भरला आहे हें खरें नाही. भांडवलवाले संपत्तीचा लोभ धरतात हें कांहीं विपरीत नसून इतिहासक्रमास तें धरूनच आहे असें मार्क्स म्हणतो. भांडवलवाल्या व्यक्तींचा द्वेष करा असे तो सांगत नसून संपत्तीची मालकी सार्वजनिक करा, सर्वच मजूर व्हा, स्वतां कष्ट करून जगण्यांतील पावित्र्य व श्रेष्ठ नीतितत्त्व ओळखा, संपत्तीचा उपयोग तिचा योग्य व्यय हाच आहे, लोक उपाशी मरत असतांहि केवळ लोभबुद्धीनें तिचा सांठा करीत राहणें हा नव्हे, हें मार्क्सचें सांगणें आहे. मात्र अतिअल्पसंख्य भांडवलवाल्यांचें जगाच्या अंतापर्यंत मतपरिवर्तन करीत राहणें हें कल्पनावाद्यांचें मत मार्क्सला पसंत नाहीं. भांडवलवाल्यांना हजारों वर्षांनी हें मत पटेपर्यंत बहुसंख्य समाजास जें दुःख भोगावें लागेल तें दुःख, व बहुसंख्य समाजानें भांडवलवाल्यांवर सक्ति करण्यांत अल्पकाल जें दुःख मानवजातीस भोगावें लागेल तें दुःख यांची तुलना करतां दुसरें साहजिकच फार थोडें आहे हें मार्क्सला पटलें असावें. भांडवलवाल्यांचीं ध्वनिप्रसारक यंत्रें एकाद्या भांडवलवाल्याचें एवढेंसें दुःख जगजाहीरपणें रडून दाखवितात. पण कोटयवधि गरीबांच्या अरण्यरोदनाचा स्वर सुखवंतांच्या मधुरालापांत कोठच्या कोठें बुडून जातो.

### शांतिमार्गानें प्रगति करण्याची आवश्यकता

क्रांति करतांना शहाणपणाची व आत्मनिग्रहाची किती जरूरी आहे यासंबंधीं मार्क्सचें मत मागें सांगितलेंच आहे. पण शांततेचाहि मार्ग नेहमींच त्याज्य आहे असें नव्हे, असेंहि एंजल्सनें लिहून ठेविलें आहे. 'कम्युनिस्ट प्रश्नोत्तरें' या पत्रकांतील "खाजगी मालकी शांततेच्या मार्गांनीं रद्द करतां येईल काय ?" या सोळाव्या प्रश्नास उत्तर देतांना एंजल्स म्हणतो "ही अतिशय इष्ट गोष्ट असून तसें घडून येण्यास कम्युनिस्ट कधींहि विरोध करणार नाहींत. क्रांति-कारक कटांची व्यर्थता व घातकपणा त्यांना पूर्णपणें माहीत आहे. क्रांति ही करीन म्हटल्यानें वाटेल तेव्हां करतां येत नाही. क्रांति होते तेव्हां ती कोणताहि वर्ग अथवा पक्ष यांच्या नियन्त्रणापलीकडील परिस्थितींतून जन्म पावते ही गोष्ट कम्युनिस्ट पूर्णपणें जाणून असतात. पण कम्युनिस्टांना हेंहि दिसतें कीं मजूर वर्गाच्या उन्नतीस भांडवलशाहीमुळेंच अडथळा होतो व त्यामुळें कम्युनिझमचे शत्रुच क्रांतीची परिस्थिति उत्पन्न करीत असतात. जुलूमग्रस्त मजूर वर्ग अखेर बेफाम होऊन क्रांतीस प्रवृत्त झाला म्हणजे मग मात्र कम्युनिस्ट लोक मजूरांची बाजू घेऊन आपली क्रांतिकारक मताच्या प्रसारांतील तत्परता कृतींत उतरवून दाखवितात." इंग्लंडांत शांततेच्या मार्गांनीं भांडवलशाहीचा पाडाव होईल असें मार्क्सला वाटलें होतें. पण भांडवल-वाल्यांच्या नफ्यांतील वाटा वाढत्या मजूरीच्या रूपानें मिळू लागल्यामुळें इंग्लंडांतील मजूरवर्ग लाचार झाला असून त्याची क्रांतिप्रवृत्ति मावळत चालली असल्याचें मार्क्सला दिसलें असावें असें त्याच्या प्रसिद्ध झालेल्या पत्रव्यवहारावरून दिसतें. शांतिमय प्रगति शक्य झाली तर मार्क्सला ती इष्टच होती.

---

## प्रकरण १५ वें

# हिंदुस्थान आणि सोशॅलिझम

सोशॅलिझम् अथवा समाजवाद या तत्त्वाची येथवर जी फोड केली तींत हिंदुस्थानचा उल्लेख वारंवार आलाच आहे. या प्रकरणांत हिंदु-स्थानच्या भवितव्याचा सोशॅलिझम्च्या दृष्टीनें विचार करूं.

१९१७ सालीं रशियांत कम्युनिस्ट क्रांति होऊन तिची धग साऱ्या जगाचे कोनाकोपऱ्यापर्यंत पोंचली आणि हिंदुस्थानांत समाजवादी विचारास तेव्हां-पासूनच सुरुवात झाली. मुंबईस गेल्या तेरा वर्षात ज्या मजूर चळवळी झाल्या त्यांच्या तरुण पुढाऱ्यांनीं आपण सोशॅलिस्ट, कम्युनिस्ट आहों असें जाहीर करून त्या विषयाची समजूत देणारें मराठी व इंग्रजी वाङमयहि प्रसिद्ध केलें. या सोशॅलिस्ट पुढाऱ्यानी मुबईस मतप्रसार व चळवळ करून जी दंगल उडवून दिली तिचा वर्तमानपत्रांतूनहि वेळोवेळी गाजावाजा झालाच होता. पण सरकारनें डांगे–प्रभृति कम्युनिस्टांवर दोनदां खटले भरून अनिच्छेनें कां होईना पण सोशॅलिझमची नौबत हिंदुस्थानांत अगदी कानठळ्या बसतील इतक्या मोठ्यानें वाजविली. तिकडे रशियांत कम्युनिझमला वाढतें यश येत राहून चीनमध्येंहि कम्युनिस्टांचें बंड उठलें. आणि महायुद्धाच्या मारानें जर्जर झालेल्या पराभूत व यशस्वी अशा दोन्ही प्रकारच्या राष्ट्रांत मजूरांच्या असंतोषास भरती येऊन पुरस्कर्ते व विरोधक या दोघाच्याहि यत्नांनीं कम्युनिझमचा फारच गवगवा झाला. कम्युनिझमच्या अनुयायांची संख्या वाढली असा याचा अर्थ नव्हे. सगळ्या हिंदुस्थानांत ४०।५० तरुणांहून या पंथास अधिक अनुयायी १९२७–१९२८ सालापर्यंत नसावे. पण या सुमा-रास पंडित जवाहरलाल यांनी युरोपांत सफर करून रशियासहि भेट दिली. रशियांत घडत असलेल्या कम्युनिस्ट समाजघटनेचा त्यांच्या मनावर फार अनुकूल परिणाम झाला व इकडे परत आल्यावर आपण सोशॅलिस्ट आहो असें जाहीरपणें बोलण्यास त्यांनी सुरवात केली. तथापि १९३० सालची कायदेभंगाची चळवळ चालू होईपर्यंत कॉंग्रेसवाल्यांत समाजवादाचा फारसा शिरकाव झाला नव्हता. पुढें गांधी–आर्यावन करार होऊन गांधी गोलमेज परिषदेस विलायतेस गेले. तेथें त्यास अपयश येऊन ते हिंदुस्थानांत येतांच कायदेभंग पुन्हां सुरू झाला; गांधी, जवाहरलाल व कॉंग्रेसचे हजारों स्वयंसेवक यांची तुरुंगांत रवानगी झाली. या वेळीं कायदेभंगाची चळवळ व गांधींचें राजकारण हें फसत आहे अशी अंधूक जाणीव कॉंग्रेसच्या तरुण स्वयंसेवकांत उत्पन्न झाली. १९२९ नंतर आर्थिक संकटाची साऱ्या जगभर जी छाया पसरली त्या निमित्तानें इंग्रजींत भांडवलशाहीची चिकित्सा करून समाज-वादाचा पुरस्कार करणारें पुष्कळ वाङमय प्रसिद्ध झालें. यांतील पुष्कळसें

वाङमय काँग्रेसच्या स्वयंसेवकांस तुरुंगांत वाचावयास मिळालें. एकदम पुष्कळसे स्वयंसेवक एका ठिकाणीं राहिल्यामुळें सर्वांनीं चर्चा करून कांहीं वाङमय वाचलेंहि. यामुळें १९३२ सालच्या कायदेभंगांत शिक्षा झालेलीं माणसें बाहेर सुटून येऊं लागलीं तसतसा काँग्रेसमध्यें समाजवादाचा बराच शिरकाव झाला आहे ही गोष्ट स्पष्ट होऊं लागली. पंडित जवाहरलाल यांनी आपल्या सुटकेनंतर 'हिंदुस्थानचा पुढील मार्ग' या नांवाची एक लेख-माला लिहून तीत समाजवादाचा पुरस्कार केला. त्यास अनुसरून आतां काँग्रेसमध्यें 'कॉंग्रेस सोशॅलिस्ट पक्ष' नांवाचा एक स्वतंत्र पक्षच स्थापन झाला आहे. त्याच्या प्रांतिक शाखा व कार्यक्रमहि जाहीर झाले असून रोज नवीन नवीन तरुण या पक्षांत सामील होत असल्यानें सोशॅलिस्टांच्या वाढत्या बळाची आतां कॉंग्रेसमध्यें व बाहेरहि तीव्र जाणीव होत आहे. इतिहास, समाजरचना, समाजाचें भवितव्य या सर्व बाबतींत सोशॅलिस्टांची विचार-सरणी प्रचलिताहून मूलतःच भिन्न असल्यानें हिंदी राजकारणास व समाज कारणासहि यापुढें अगदीं वेगळें वळण लागूं पहात आहे. आपणांस येथें फक्त राजकीय व आर्थिक परिस्थितींचाच विचार कर्तव्य आहे.

## ब्रिटिश अमलाबद्दल तीन भिन्न दृष्टिकोन

हिंदुस्थानांत ब्रिटिशांचा अमल सुरू झाला ही फार विलक्षण अशा प्रका-रची क्रांति झाली हें मत सर्वमान्य असलें तरी या क्रांतीचें नेमकें स्वरूप काय, यासंबंधीं तीव्र मतभेद झाले आहेत. इंग्रजी अंमल गेल्या शतकांत थोडा स्थिर झाल्यानंतर सुधारकांची जी एक पिढी उत्पन्न झाली तिनें प्रातःकाळीं ब्राह्मणांनीं अर्घ्यप्रदानानें सूर्याचें स्वागत करावें त्याप्रमाणें आपणांस अज्ञा-नांधकारांतून बाहेर काढण्यासाठी ईश्वरी योजनेनेंच इंग्रज येथें आले असें समजून त्यांचें स्वागत केलें. यामुळें राजकीय पारतंत्र्य आलें असलें तरी इंग्रज हे सुधारलेल्या राज्यपद्धतीचे हिंदी लोकांस धडे देण्यासाठीं येथें आले आहेत, आपली राज्य करण्याची तयारी झाली कीं ते वयांत आलेल्या मुलाचे हवालीं बाप आपली दौलत देतो त्याप्रमाणें हिंदुस्थानचें राज्य आपल्या हवालीं करून निघून जातील असा यांना मेकॉलेच्या एका उद्गारावरून विश्वास वाटला होता. ही राज्यकर्तृत्वाची तयारी म्हणून प्रथम मूर्तिपूजा, जातिभेद, बालविवाह वगैरेंचा नाश केला पाहिजे असें मत सुधारकांनीं प्रतिपादन केलें.

महाराष्ट्रांत गेल्या शतकाचे शेवटीं टिळक, चिपळूणकर वगैरे तरुण मंडळींनीं या सुधारकांविरुद्ध प्रतिक्रिया सुरू केली. समाजसुधारणा करूं नये असें यांचें मत नव्हतें. पण समाजव्यवस्था बरीवाईट कशीहि असली तरी व स्वदेशी राजसंस्थाहि कशीहि असली तरी परकी सरकारच्या अंमलानें कोणत्याहि राष्ट्राचें कधीहि हित होणार नाहीं हा सिद्धांत टिळक–चिपळूणकरांनीं मोठ्या त्वेषानें प्रतिपादन केला. चिपळूणकर अल्पवयींच वारले; पण टिळकांनीं ऐन तारुण्यापासून सतत चाळीस वर्षे देहपातापर्यंत सर्व तऱ्हेच्या हालअपेष्टा सोसून स्वकीय राज्यसत्ता हवी, या मताच्या प्रसारार्थ चळवळ केली. देशांत जीं नाना प्रकारचीं दुःखें लोकांस भोगावीं लागतात या सर्वांचीं तात्कालिक कारणें कांहीहि असोत पण सर्व कारणांचें कारण परराज्य आहे ही गोष्ट टिळकांनीच प्रथम सांगितली; व या मुद्द्याचें नुसतें तात्त्विक विवेचन न करतां त्यांनीं प्रचारक पाठवून, वर्तमानपत्रांत लिहून, परिषदा भरवून, परकी राज्याबद्दल तीव्र क्षोभ उत्पन्न केला. बॉम्बगोळ्यांच्या अत्याचारांना टिळकांनीं उत्तेजन दिलें ही गोष्ट साफ खोटी. पण हिंदुस्थानांत इंग्रजी राज्याबद्दल टिळकांनीं अगदी पिनल कोडांतल्या अर्थानें द्वेषभाव उत्पन्न केला हें सरकारचें व चिरोलचें म्हणणें खरेंच होतें असें–टिळकांचा इतिहास आतां पूर्णपणें हातावेगळा झाला असल्यामुळें–कबूल करण्यास कांहींच हरकत नाहीं. भांडवलशाहीच्या शीघ्र गतीमुळें टिळकांचें राजकारण मागें वळून पाहणारास अतिशय दूर, व म्हणून अस्पष्ट दिसत असलें तरी महाराष्ट्रांतील गांधींच्या कित्येक अनुयायांनाच काय पण पुष्कळ सोशॅलिस्टांनाहि समाजसेवेची व राजकारणाची स्फूर्ति टिळकांच्या शिकवणीपासून व उदाहरणापासूनच मिळाली आहे यांत संशय नाही.

टिळकांच्या मागून महात्मा गांधींनीं जें राजकारण केलें त्यांत त्यांनीं टिळकांची स्वराज्याची चळवळच पुढें चालविली. शिवाय, परकी राज्य आपल्याच सहकार्यानें चालत असून आपण सहकार्य बंद केल्यास तें राज्य मोडून पडेल त्यासाठीं आपण सहकार्य बंद केलें पाहिजे, सरकारचे कायदे मोडले पाहिजेत असें प्रतिपादन करून मोठ्या प्रमाणावर हें शस्त्र सरकारवर चालवूनहि दाखविलें. तथापि गांधींच्या राजकारणाचें एक वैशिष्ट्य असें आहे की त्यांत अहिंसा, आत्मत्याग या व्यक्ति गुणावर

फार भरंवसा आहे. गांधींच्या मतें हिंदूंच्या संस्कृतीनें पाश्चात्य संस्कृतींत ही भर घालावयाची आहे. टिळकांनाहि पौर्वात्य आर्यांची संस्कृति ही दैवी आहे, ती पाश्चात्याप्रमाणें पाशवी नसून जगांत शांतीचा संदेश पोंचविण्याचें कार्य हिंदी संस्कृतीस करावयाचें आहे असें वाटत असावें असें दिसतें.

हिंदुस्थानांत ब्रिटिशांच्या अंमलानें घडून आलेल्या क्रांतीची सुधारकांनीं व टिळक–चिपळूणकरांच्या राष्ट्रीय पक्षानें वेगवेगळी मीमांसा केली व तदनुसार वेगवेगळ्या उन्नतीच्या मार्गास हात घातला; त्याहून सोशॅलिस्टांची मीमांसा व त्यांचे उन्नतीचे मार्गहि आमूलाग्र भिन्न आहेत. इंग्रजांच्या आग-गाड्या, तारायंत्रें, छापखाने, हिशेबीपणा, करडी शिस्त हीं सर्व केवळ पाश्चात्य संपत्ति व संस्कृति आहे हें म्हणणें खरें नसून इंग्लंडांतहि समाजविकास होत होतच एकदां केव्हां तरी म्हणजे भांडवलशाहीच्या काळीं ही संपत्ति व संस्कृति प्राप्त झालीं आहेत. इंग्रजांच्या कर्तबगारीपुढें मराठे लोक व मुत्सद्दी नादान होते म्हणूनच पराभूत झाले ही गोष्ट महाराष्ट्रांत 'लोकहितवादीनीं' फार जोर देऊन सांगितली. पण मराठ्यांत भांडवलशाहीची वाढ झाली असती तर तेहि कर्तबगार झाले असते. उलट भांडवलशाहीच्या पूर्वी इंग्लंडांतील जनताहि नादानच होती हें आतां सोशॅलिस्टांना दिसून आलें आहे. औद्योगिक क्रांतीपूर्वी म्हणजे इंग्लंडांत भांडवलशाहीचा विकास होण्यापूर्वी इंग्लंडांतील कोष्ट्यांचें वर्णन करतांना एंजल्स लिहितो, "…. पण बौद्धिक उन्नतीच्या दृष्टीनें पाहतां हीं माणसें जिवंत असून मढ्यासारखी होतीं. लहानसा हातमाग व मालकीची लहानशी जमीन या क्षुद्र स्वार्थापलीकडे त्यांची दृष्टि गेली नव्हती. त्यांच्या संकुचित क्षितिजापलीकडे अखिल मानव-समाजांत जी क्रांति घडून येत होती तिचें त्यांना कांहींच गुमान नव्हतें. हरळीप्रमाणें एकाच जागीं वर्षानुवर्ष शांतपणें वाढणाऱ्या जीवनांतच त्यांना सुख वाटे. या जीवनांत एक प्रकारें मोहकपणा होता हें खरें. पण माणुस-कीच्या दृष्टीनें हें जिणें कमी दर्जाचें होतें. खरें म्हणजे हीं माणसें माणसेंच नव्हतीं. मूठभर सरदारांचीं सेवा करणारीं भावनाहीन अशीं तीं यंत्रें होतीं. माणसांचा म्हणून जो इतिहास घडे तो सरदारांचा. या निर्जीव आयुष्यक्रमांतून औद्योगिक क्रांतीनेंच या लोकांची सुटका केली." (इंग्लंडांतील मजूरांची परिस्थिति.)

हिंदुस्थानांत इंग्रजांचें राज्य आलें तें परकीय या दृष्टीनें त्यास महत्त्व नसून भांडवलशाहीचें राज्य या दृष्टीनें त्यास महत्त्व आहे. अकबर व अवरंगजेब यांची राज्यें परकीं असलीं तरी इंग्रजी भांडवलशाहीनें जी राजकीय, सामाजिक, आर्थिक व सांस्कृतिक क्रांति घडवून आणली आहे ती मोगली राज्यानें घडून आली नाही. जुन्या समाजव्यवस्थेंतील जडत्व खणून काढण्याचें सामर्थ्य इंग्रजी राज्यांत होतें असें सुधारकाना दिसलें. पण परकी राज्याचें भांडवलशाही हें स्वरूप त्यास कळून न आल्यानें हें परकी राज्य हिंदुस्थानचें रक्त आजवरच्या कोणत्याहि परकी राज्यानें शोषिलें नाहीं इतक्या क्रूरपणें, सतत व वाढत्या प्रमाणावर शोषीत राहणार आहे याचें आकलन सुधारकांस झालें नाहीं. तसेंच ज्या टिळक–चिपळूणकरांना परकी सत्ता आपलें रक्तशोषण करते हा सिद्धांत सुचला होता त्यांनाहि या परकी सत्तेचें भांडवलशाही हें स्वरूप कळलें होतें असें दिसत नाहीं. राजकीय पारतंत्र्य हा समाजव्यवस्थेंतील कोणत्याहि एक वा अनेक दोषांपेक्षां दुष्टतर दोष होय, हा सर्वच शूर पुरुषांना साजणारा सिद्धांत त्यांनीं मनांत बाणला होता व कोणत्याहि अर्थानें ब्रिटिश राज्य हें स्वकीय सत्तेपेक्षां–संस्थानिकापेक्षाहि वाईट अशी त्यांची अमूर्त भावना असावी असें वाटतें. इंग्रजांनीं आगगाडी आणली याचें कौतुक चाललें असतां एकदां टिळकांनीं उत्तर दिलें, म्हणतात कीं, 'यांत विशेष तें काय, आज शिवाजी असता तर तोहि सायकलवर बसून गेला असता. हें कालमाहात्म्य आहे. यांत इंग्रजांचेंच विशेष असें कांहीं नाहीं ?' पण कालमाहात्म्य म्हणजे तरी काय ? हल्लींच्या कालाचें विशेष लक्षण कोणतें ? हा काल कधीं सुरू झाला ? पूर्वीं कोणता होता ? एकांतून दुसरा काल कसा निर्माण होतो ? या प्रश्नांचीं उत्तरें टिळकांना सुचलीं नाहींत इतकेंच नव्हे तर हे प्रश्नच त्यांना कधीं सुचले नाहींत. टिळकांनीं वर्तमान कालांतून मागें पाहिलें तें स्वातंत्र्याची स्फूर्ति देणाऱ्या शिवाजीकडे, मग कर्मयोग शिकविणाऱ्या कृष्णाकडे व नंतर हिंदूंच्या संस्कृतीचें वैभव केवढें श्रेष्ठ आहे हें दाखविण्यासाठीं ४००० वर्षीपूर्वींच्या नासदीय सूक्ताकडे. सल्फ्यूरिक ॲसिड तोंडांत ओतल्यानें जिवंत शरीर नाश पावतें त्याप्रमाणें आगगाडी ज्या समाजांत शिरली त्या समाजाची घटना ती मोडून टाकते ही गोष्ट टिळकांना कधींच आकलन करतां आलीसें दिसत नाहीं. लॉर्ड

डलहौसीनें आपलें धोरण तडीस लावून संस्थानें खालसा केलीं असतीं तर बरें झालें असतें असें प्रत्यक्ष अनुभवावरून सर्वांना मनांतल्या मनांत वाटत असतें. कोल्हापुरापेक्षां साताऱ्यांत ईस्टेट करणें अधिक सुरक्षित असेंहि सर्वांस वाटतें. पण संस्थानापेक्षां खालसा राज्य हें श्रेष्ठ कां ? तर भांडवलशाहीपूर्वीच्या राज्यपद्धतीपेक्षां भांडवलशाही राज्यपद्धति अधिक व्यवस्थित, सुयंत्र असते म्हणून; असा विवेक अजून प्रसिद्ध पुढाऱ्यांनाहि सुचत नाहीं. हें म्हणण्यांत कोणाची खोडी काढण्याचा येथें हेतु नाही; किंवा झालें हें कांहीं तरी विपरीत अथवा आश्चर्यकारक असेंहि नाहीं. माणसाच्या डोक्यांत येणारे विचार त्यास ज्ञानेंद्रियांच्या द्वारां भौतिक जगाची जी प्रतीती येत असते तदनुसार बनत असतात. भांडवलशाहीचें आकलन होण्यास भांडवलवाल्यांच्या आगगाडीनें गांवांत शिरून माल पळवून नेला एवढी घटना अपुरी आहे. हें आकलन होण्यास स्वतंत्र अशा मजूरवर्गास मजूरीच्या बाजारांत भुकेच्या चिमटयांत पकडून कारखानदार यंत्रास जुंपतो, वाढावा मिळवितो, स्वस्त माल बाजारांत आणतो, जुने धंदे बुडवितो, बेकारी वाढवितो व संपत्तीशेजारीं दारिद्र्य उभें करतो हा देखावा पाहण्यास मिळणें जरूर असते. मार्क्सला इंग्लंडांत हें सर्व समक्ष पाहून भांडवलशाहीचें जें आकलन झालें तें त्यास तो अठराव्या शतकांत जन्मला असता तर झालें नसतें. तसेंच टिळक–चिपळूणकर यांना, तसेंच राजवाड्यांनाही, भांडवलशाहीचें उत्पादन व त्याच्या प्रत्यक्ष परिणामानें घडत असणारी समाजक्रांति यांचें प्रत्यक्ष अवलोकन करतां येईल एवढें भांडवलशाहीचें उत्पादन त्यांच्या काळीं येथें त्यांच्या भोंवतीं सुरु झालेंच नव्हतें. टिळक आज असते तर त्यांना सोशॅलिझम् सुचला अथवा पटला असता असें नव्हे. गांधींना तो सुचतहि नाहीं व पटतहि नाहीं. माणसाच्या मनांत शिक्षणसंस्कार, पूर्वग्रह वगैरेंचें दडपण बाह्य परिस्थितीमुळें उत्पन्न होतें. पण बाह्य परिस्थितीप्रमाणें तें झटपट बदलत नाहीं. समाजांत माणसामाणसांत, वर्गावर्गांत व विशेषत: नव्याजुन्यांत जे झगडे होतात व जे अपरिहार्यहि दिसतात त्यांचें हेंच कारण आहे कीं विशिष्ट बाह्य परिस्थिति, शिक्षण, उदाहरण यांनीं एकदां मनावर घडलेले संस्कार व जडलेले ग्रह हे बाह्य परिस्थिति बदलली असतां त्याबरोबर न बदलून तिच्याशीं झगडत राहतात व हा झगडा, ज्यांच्या मनावर बदललेल्या

परिस्थितीचा नव्यानें पगडा बसत असतो त्यांच्याशीं चालतो. आज समाजवादाचा प्रसार तरुणांत लवकर कां होतो व प्रौढांत तो कां होत नाहीं, तसेंच इतर ठिकाणापेक्षां मुंबईतच तो कां होतो याचें कारण वरील विवेचनावरून समजून येईल.

## राष्ट्रीय पक्षाचें राजकारण

टिळक अथवा हल्लीं गांधी यांच्या नेतृत्वाखालीं असलेला राष्ट्रीय पक्ष हिंदुस्थानांतील ब्रिटिश सत्तेकडे ती परकी सत्ता या दृष्टीनें पाहतो आणि समाजवादी मनुष्य ही भांडवलशाही आहे या दृष्टीनें पाहतो. या भिन्न दृष्टींमुळें राष्ट्रीय पक्ष व समाजवादी पक्ष यांचे कार्यक्रम व ध्येयें अगदीं भिन्न व क्वचित् परस्परविरोधीहि होत आहेत ही गोष्ट यापुढील हिंदी राजकारण समजून घेतांना प्रथम लक्षांत घेतली पाहिजे. राष्ट्रीय पक्षाचें म्हणणें असें आहे कीं साऱ्याच हिंदुस्थानची लूट परकी सरकार करीत आहे. आपण सर्वजण ही लूट एकजुटीनें प्रथम थांबवूं व मग आपसांतील भांडणें भांडूं. समाजवादीपक्षाचें म्हणणें असें आहे कीं भांडवलशाही—मग ती स्वदेशी असो कीं विदेशी असो—बहुसंख्य समाजाची लूट ती करीत राहणारच. यासाठीं हिंदुस्थानचें परकी भांडवलशाहीकडून होणारें शोषण जसें बंद केलें पाहिजे तसेंच स्वकीय भांडवलशाहीकडून बहुसंख्य समाजाचें होणारें शोषणहि त्या वेळींच बंद केलें पाहिजे. या दोन पक्षांत हा फरक कसकसा व कां पडतो हें आतां पाहूं.

हिंदी राजकारणांत 'राष्ट्रीय' या नांवानें ओळखला जाणारा जो पक्ष आहे त्याचा पुष्कळसा भरणा राष्ट्रीय सभेंतच असून सामान्यतः गांधीजींकडे या पक्षाचें आज नेतृत्व आहे. फार मोठे जमिनदार अथवा भांडवलवाले यांचा यांत समावेश होत नाहीं. पण मुख्यतः लहान मोठा व्यापारी वर्ग, दुय्यम दर्जाचा भांडवलदार, डॉक्टर, वकील, एंजिनियर वगैरे मध्यम वर्ग यांचा या पक्षांत कार्यकर्ता या नात्यानें समावेश होत असून हिंदी भांडवलशाहीस विदेशी भांडवलशाहीविरुद्ध रक्षण द्यावयाचें व स्वातंत्र्यासाठीं चळवळ करावयाची हें या राष्ट्रीय पक्षाचें धोरण आहे.

इंग्रजांचें राज्यच येथें असल्यामुळें ब्रिटिश भांडवलशाही व हिंदी भांडवलशाही यांच्या लढ्यांत ब्रिटिशांना राज्यसत्तेचें पाठबळ मिळतें. यामुळें

ब्रिटिश भांडवलशाहीची राजकीय सत्ता नाहींशी करून त्या जागीं हिंदी सत्ता आल्याशिवाय हिंदी भांडवलशाहीस विदेशीयांशीं आर्थिक क्षेत्रांतहि चढाओढीत टिकून राहणें शक्य नाहीं हें राष्ट्रीय पक्षाचें म्हणणें अगदीं खरें आहे. आज कापसाचें सूत व कापड एवढयाच मोठया धंद्यांत काय तो हिंदी भांडवलवाल्यांचा शिरकाव झालेला आहे. टाटांचा लोखंड व पोलाद यांचा कारखाना पुष्कळसा स्वदेशी आहे खरा. पण त्यांत मुख्यत: आगगाडीचें सर्व सामान तयार होतें. हिंदुस्थानास लढाईच्या वेळीं स्वदेशांतील बंडाळी मोडण्यासाठीं व सैन्याची आणि मालाची ने–आण करण्यासाठीं येथल्या येथें रेल्वेचा भरपूर पुरवठा असणें जरूर आहे; म्हणून टाटांच्या कारखान्यास ब्रिटिश सरकार संरक्षणहि देण्यास तयार असतें. याहि धंद्यांत आतां अर्धवट अशी नवी कंपनी टाटाशीं स्पर्धा करण्यासाठीं कलकत्त्यास निघाली आहे. बाकीचे म्हणजे जहाजांचा धंदा, दगडी कोळसा, इतर खाणी, ज्यूट, चहा, बँकिंग, विदेशी हुंडणावळ हे सर्व प्रचंड धंदे ब्रिटिश भांडवलवाल्यांच्या हातीं असून सरकारशीं निरनिराळ्या मार्गांनी यांचा हात पोंचतो. आणि हिंदी भांडवलवाल्यांस राजकीय सत्तेच्या बळावर हे सहज मागें रेटूं शकतात. यामुळें हिंदी भांडवलवाल्यांना आपल्या आर्थिक झगडयांत यश येण्यासाठी राजकीय झगडा तीव्र करावा लागतो आणि साहजिकच त्यास जनतेचा पाठिबाहि मिळवावाच लागतो. म्हणून बहुसंख्य समाजाचीं दु:खें नाहींशीं करणारा कार्यक्रमहि त्यांनीं आपल्या समजुतीनें योग्य असा आंखला आहे.

सर्व हिंदी लोकांचे हितसंबंध एकसारखेच आहेत ही कल्पना या कार्यक्रमांत मध्यवर्ती आहे. (१) व्यापार, पगार वगैरे निरनिराळ्या मार्गांनीं सुमारें २०० कोटी रुपये ब्रिटिश लोक दरसाल इंग्लंडांत नेतात, ही हिंदुस्थानची लूट थांबविणें; (२) विदेशी व फार खर्चिक अशी नोकरशाही पोसण्यासाठीं व अवाढव्य लष्करी खर्च चालविण्यासाठी फार मोठा जमीनधारा सरकार घेते तो निदान निम्मा कमी करणें; (३) डोईजड सरकारधारा व इतर कर यांमुळें शेतकऱ्यास होणारें कर्ज कमी करणें; (४) खेडयापाडयांतून बँकांची वाढ करून शेतकऱ्यांमागचा सावकारांचा कांच कमी करणें; आणि (५) हुंडणावळीचा भाव वाढवून शेतकऱ्यांच्या मालाची सरकार परदेशांत किंमत कमी करते म्हणून हुंडणावळीचा भाव उतरविणें–वगैरे गोष्टी राष्ट्रीय

अथवा भांडवलवाल्या पक्षानें आपल्या कार्यक्रमांत घातल्या असून त्या मिळविण्यासाठीं सरकारशीं झगडण्यांत जनतेचें पाठबळ त्यास हवें असतें. या सर्वांपेक्षां प्रचंड भांडवलाचे धंदे विदेशी धंद्याशीं चढाओढीत टिकून राहावे म्हणून यांना स्वदेशी धंद्यांस जकातीचें संरक्षण हवें असतें. यामुळें मालास पडणारी भारी किंमत सामान्य जनतेस द्यावी लागते खरी, पण स्वदेशी धंदा भरभराटीस आल्यास लोकांची मजूरी वाढेल व अखेर सर्व पैसा स्वदेशांतच राहील असा यांचा युक्तिवाद असतो. सोशॅलिस्टांस भांडवलवाल्यांचा असा सवाल आहे कीं भांडवलशाही ही जर मानवी समाजाच्या प्रगतीची पुढली पायरी आहे तर हिंदुस्थान ती चढत असतांना मजूरांना भांडवलवाल्यांविरुद्ध चिथावून भांडवलवाल्यांना व पर्यायानें हिंदुस्थानाला प्रगतीच्या मार्गावरून मागें कां खेचतां? एकदां स्वदेशी भांडवलशाही येथें उभारली जाऊं द्या; मग मजूरांना काय अधिक हिस्सा मागायचा असेल तो तुम्ही मागा.

## सोशॅलिस्टांचे आक्षेप

सोशॅलिस्ट पक्षास या सर्व युक्तिवादांतील भोळेपणा अथवा धूर्तपणा कळून आला असून त्यांना राष्ट्रीय पक्षाचा कार्यक्रम आहे या स्वरूपांत जनतेचें कल्याण करणार नाहीं हें ठाऊक झालें आहे. हिंदुस्थानांतील सर्व वर्गांचे हितसंबंध परस्परास अनुकूल आहेत हें राष्ट्रीय पक्षाचें गृहीत कृत्य सोशॅलिस्टांस मुळींच मान्य नाहीं. व्यापाराचा व धंद्याचा नफा, पगार, पेन्शनें, कर्जाची व व्याजाची फेड इतक्या अनेक मार्गांनीं जे २०० कोटी रुपये परदेशांत जातात ते आधीं भांडवलशाहीच्या पिळणुकीच्या पद्धतीनें जनतेच्या खिशांतून बाहेर पडतात. विदेशी भांडवलशाही जाऊन स्वदेशी भांडवलशाही येथें अधिकारारूढ झाली तरी व्यापार-धंदा, नोकऱ्या व बँका यांचें अस्तित्व कायमच राहणार असून या मार्गें स्वदेशी भांडवलशाहीकडून लोकांची पिळणूक चालूच राहील. यांत आज परदेशी भांडवलवाल्यांना मिळणारे दोनशे कोटी रुपये आपणास मिळावेत ही स्वदेशी भांडवलवाल्यांची इच्छा फक्त सफल होईल. विदेशीं जाणारे २०० कोटी रुपये स्वदेशांत राहतील हें खरें, पण ते परत जनतेस मिळण्याची काय आशा आहे? आज जीं स्वतंत्र राष्ट्रें आहेत व जेथें भांडवलशाही भरभराटलेली आहे तेथेंहि संपत्ति निर्माण करणाऱ्या

श्रमजीवी वर्गास मजूरीच्या रूपानें पुरेशी खरेदीशक्ति वाटली जात नसल्यानें मालाचे गठ्ठे पडून राहतात, पण श्रमजीवी वर्गास त्यांतला वाटा मुळींच मिळत नाहीं. हीच गत येथल्या स्वातंत्र्यांतहि होणार. परदेशी भांडवलशाहीपेक्षां स्वदेशी भांडवलशाही कमी बलिष्ठ अथवा कमी जुलमी अथवा कमी स्वार्थी असते असें कांहींच म्हणता येत नाहीं. इंग्लंडांत वरिष्ठ वर्गाजवळ जो फाजील नफा गेल्या शंभर वर्षांत साचला तो त्यांनीं सर्व मागसलेल्या देशांत भांडवलांत गुंतवून व तेथील कमी मजूरीमुळें अधिकाधिक मिळणारा नफा पुन्हां पुन्हां तेथेंच गुंतवून त्याचें व्याज खात ते इंग्लंडांत चैनींत राहतात. या बाहेरच्या पैशाच्या जोरावर इंग्लंडांतील राज्ययंत्र आपल्या काबूंत ठेवतात, इंग्लंडांतील धंद्यान्तें भांडवल तोडून मजूरांची राहणी कमी दर्जाची करतात आणि राजकीय सत्तेच्या बळावर तेथील असंतोष दडपून टाकतात. महायुद्धानंतरच्या १२ वर्षांत जर्मन कामगारांची उत्पादनशक्ति पूर्वींहून दहा पटीनें वाढली पण याचें बक्षीस त्यांना काय मिळालें? जर्मन मजूरांस जास्त मजूरी द्यावी लागते म्हणून पूर्व–प्रशियांतील जमिनदार, पोलंडच्या मजूरास कामावर नेमतात. विदेशांतील बाजार कमी होतांच आतां उत्पादन कमी झालें असून त्यामुळें मजूरांचे पगार काटले गेले आहेत व जगांत कोठल्याहि देशांत होत नसेल अशी जबर दडपशाही जर्मनींत होत आहे. इंग्लंड, जर्मनी सारख्या सुधारलेल्या व स्वतंत्र भांडवलशाही राष्ट्रांत श्रमजीवी वर्गाची स्थिति अशी गुलामगिरीची असून भांडवलवाला वर्ग स्वदेशार्थापेक्षां स्वार्थास अधिक किंमत देतो. तेव्हां हिंदुस्थानचा भांडवलदार वर्ग याहून वेगळा वागेल असें मानण्यास काय आधार? अगदीं अलीकडे झालेले इंडो-जपानी करार व बॅाम्बे–लँकाशायर करार यांवरून जर कांहीं सिद्ध होत असेल तर भांडवलवाला स्वदेश ओळखीत नसून फक्त नफा तेवढा जाणतो हेंच. अशा स्थितींत पृथ्वीस जवळ असलेल्या मंगळावर सोन्याच्या खाणी आहेत हें ऐकून हिंदी माणसास जितकें समाधान वाटेल तितकेंच स्वातंत्र्य मिळाल्यावर आज विदेशास जाणारे २०० कोटी रुपये स्वदेशांत राहतील याबद्दलहि वाटेल. कारण दोन्हीहि त्यांस सारखींच अलभ्य आहेत.

जमिनधारा कमी करण्याच्या चळवळीचा फायदा सामान्य जनतेस किती आहे? बंगालमध्यें कायमधारा पद्धति असून हा धारा तिकडे फार कमी

प्रमाणांत सरकारास पोंचतो यामुळें जमिनदारास खंड खूप मिळतो. मुंबई व मद्रास या इलाख्यांत जमिनधारा कमी झाल्यास खंडानें जमिनी लावण करणाऱ्या मालकांचा खंड त्यास वाढून मिळणार आहे. जमिनधारा कमी करण्याच्या चळवळीबरोबर खंड कमी करण्याची भाषा राष्ट्रीय पक्ष बोलत नसतो त्याचें इंगित हें आहे. ज्यांनीं खंड कमी करण्याच्या भाषा वापरल्या त्यांनींहि खंडाविरुद्ध शेतकऱ्यांनी चळवळ केली त्या वेळीं सरकारी सामर्थ्यास जमिनदारांच्या रक्षणाबद्दल आवाहन केलेंच.

ज्यांच्या जमिनी अगदीं लहान आहेत त्यांना जमिनधाऱ्यापेक्षां कर्जाचें ओझेंच भारी असून त्याखालीं शेतकरी चिरडला जात आहे. शिवाय जमिनधारा हा प्रश्न शेतकऱ्याच्या इतर परिस्थितीपासून अलग काढून विचारांत घेतां येत नाहीं. भांडवलशाहीच्या लोखंडी चौकटींत शेतकरी सर्व बाजूंनीं सारखाच चेपला जात आहे आणि हें दुःख शेतकरी जितका लहान तितकें अधिक मोठ्या प्रमाणावर आहे. खंड आणि जमिनधारा पैशांत भरावा लागतो. त्यासाठीं पीक विकण्यास शेतकरी बाजारांत शिरला कीं वाघाच्या गुहेंत शिरल्यासारखी त्याची स्थिति होते. बाजारांत त्याच्याच सारख्या इतर शेतकऱ्यांची माल विकण्यास चढाओढ चाललेली असून घेवारी बहुधा अधिक धूर्त, अधिक संघटित व अधिक धनवान असल्यामुळें आपसांत चढाओढ करणारे शेतकरी क्रमाक्रमानें सर्वजण घेवाऱ्याच्या दाढेंत सापडतात व त्यांना त्यांच्या मालाचें मोल कमी मिळतें. हुंडणावळीच्या वादांतला एक नेहमींचा युक्तिवाद असतो कीं ब्रिटिश सरकार हुंडणावळींत रुपयाचा भाव वाढवून हिंदी शेतकऱ्याच्या मालाचें स्वदेशांत व परदेशांतहि मोल कमी करतें. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं हुंडणावळीचा भाव कांहींहि असला तरी हिंदी शेतकरी आपसांतील चढाओढीमुळें संघटित घेवाऱ्यांकडून केव्हांहि नाडला जातोच. पुढें तंटा येतो तो निर्यात व्यापारी व इंग्लंडांतील आयात व्यापारी यांच्यामध्यें. मरून गेलेल्या बकरीला आपल्या मांसाचा खाटकास भाव येत नाहीं म्हणून जेवढा विषाद वाटेल तेवढा विषाद शेतकऱ्यासहि भारी हुंडणावळीबद्दल वाटेल.

राष्ट्रीय पुढारी ज्या भांडवलवाल्यांसाठीं या हुंडणावळीबद्दल झगडत असतात, त्या राष्ट्रीय पुढाऱ्यांची भांडवलवाल्यांना मुळींच मुर्वत नसते

राष्ट्रीय पुढाऱ्यांनी स्वदेशी चळवळ करून भांडवलवाल्यांच्या घरांत गरीबांचा पैसा घातला, त्यावर गबर होऊन भांडवलवाल्यांनीं अधिकाधिक मजूरांना पिळून काढलें व थोडा कमी नफा घेऊन कांहीं दिवस धंदा चालविण्याची व तो सुधारून वाढविण्याची वेळ आली तेव्हां राष्ट्रीय पुढाऱ्यांना न विचारतां भांडवलवाल्यांनीं जपान व इंग्लंड यांना स्वदेशी बाजारांत भागी देऊन उघड उघड देशद्रोह केला.

## हिंदी शेतकऱ्याचें खरें दुखणें

वीतभर जमिनीचा मालकीचा तुकडा हा हिंदी शेतकऱ्याचा अन्नदाता नसून त्याला जिवंतपणीं पुरणारा त्याचा खड्डा आहे. मागें आपण पाहिलें आहे कीं या वीतभर जमिनीनें त्याचें जिणें दुर्बल, असंस्कृत, मूढ, बकरीच्या देहाप्रमाणें लुटारूचें धन, करून टाकलें. यांतून त्याची सुटका झाल्याखेरीज जमिनधारा, कर्ज व इतर अनेक मार्गांनीं होणारी त्याची लूट थांबणें अशक्य आहे. भांडवलशाहीपूर्वी हल्लींचीं पद्धतशीर लुटीचीं साधनें नव्हतीं व लुटलेलें धनहि हातापलीकडे जात नव्हतें. मोठ्या प्रमाणावर चढाओढ नव्हती. पण आज लहान शेतीचें दुःख पूर्वीच्या अनेकपट वाढलें आहे. भांडवलशाहीच्या प्रचंड संघटनेच्या बाजारांत चरकांतल्या उसाप्रमाणें लहान शेतकरी पिळला जात आहे. आज जगाचा बाजार कापूस, गहू, गळिताचीं धान्यें यांसारख्या वस्तूंचे बाबतींत एकजीव होत आहे. अमेरिका, कानडा, ऑस्ट्रेलिया, ईजिप्त या देशांतील, ज्यांचें उत्पादन व मालाची ने–आण, प्रचंड प्रमाणावर, यांत्रिक साधनांनीं, एकाच पद्धतीनें व म्हणून पुष्कळ होत आहे; ज्यांच्या मालाची विक्री हीहि प्रचंड प्रमाणावर, चढाओढ थांबवून उत्पादनाच्या खर्चाहून अधिक अशा ठराविक किंमतीनें होत आहे; अशा सुधारलेल्या भांडवलवाल्या शेतकऱ्यांशीं चढाओढींत आमचा अशिक्षित, एकलकोंडा व अडलेला असा शेतकरी पहिल्या धडाक्यांत कोलमंडून पडतो.

लहान शेतींत कोणतीहि यांत्रिक अथवा शास्त्रीय प्रगति होत नसल्यानें उत्पादनहि अगदींच थोडें होतें. शेतीखेरीज बाकीचे ज्यांचे धंदे यंत्राशीं चढाओढींत पराभूत होतात ते बेकार धंदेवालेहि या अनुत्पादक शेतीवर भार घालतात. गांधी म्हणतात सूत कातण्यानें आणि कापड विणण्यानें बेकारीचा प्रश्न सुटेल. जणूं कांहीं कापड खरेदी करावें न लागलें कीं शेतकऱ्याची लूट

संपलीच. शेतकऱ्याची बाजारांत होणारी लूट, नाण्यांच्या किंमती बदलण्यानें होणारी लूट, कापडाखेरीज इतर शेकडो प्रकारच्या यांत्रिक उत्पादनाच्या वस्तूंनीं होणारी लूट सुतानें कशी थांबणार हें कळत नाहीं. एक गोष्ट मात्र शक्य दिसते कीं सर्व बाजुंनीं गांजलेला शेतकरी दंग्यास प्रवृत्त होण्याऐवजीं रोज तीन पैसे देऊं म्हणणाऱ्या चरक्याच्या नादांत गुंगून जाऊन भांडवलवाल्याच्या लुटींत विघ्न आणणार नाहीं.

उद्यां आमचे भांडवलवाले कांहीं चमत्कारानें स्वतंत्र झाले व जपाननें हिंदुस्थानावर स्वारी केली तर यांत्रिक उत्पादनामुळें ज्यांची युद्धशक्तिहि वाढली आहे अशा जपान्यांपुढें आमचा नांगऱ्या शेतकरी कांकडीसारखा मोडून निघेल. चीनमधील कोटयवधि शेतकऱ्यांची आज जपानी हल्ल्यापुढें कोण दुर्दशा होत आहे हें पाहिलें म्हणजे आमच्या भवितव्याविषयीं फारसे तर्क करीत बसण्याची जरूरीच रहात नाहीं. सारांश, आमच्या शेतकऱ्याचें खरें दुःख शेतसारा, कर्जवाम, विदेशी लूट हें नसून लहान शेती या भयंकर रोगाचीं तीं अनेक लक्षणें आहेत.

पण मोठमोठ्या राष्ट्रीय पुढाऱ्यांचें या बाबतींत अगाध अज्ञान पाहिलें म्हणजे एवढ्या प्रचंड देशाचीं राज्यसूत्रें यांच्या हातीं देण्यानें राष्ट्रास खचित धोका आहे असें वाटूं लागतें. पंधरा एकर मालकीची जमीन असली म्हणजें एक बैलजोडी व एक नांगर ठेवून शेतकरी स्वावलंबी होऊं शकतो असें डॉ. मॅन म्हणतात. दोन बैलांबरोबर खपून संपत्तीचें उत्पादन करणारा तिसरा बैल, इतकी शेतकऱ्याची योग्यता वाढली म्हणजे डॉ. मॅन यांचें समाधान होतें. भांडवलशाहीच्या संघटित बाजारांत त्याला पिळतां यावें हें त्यांना अनिष्ट नव्हतें आणि तो उत्तम सैनिक होऊं नये यासाठीं तर डॉ. मॅनच्या भाईबंदांना रात्रंदिवस काळजी होती. पण आमचे राष्ट्रीय पुढारीसुद्धां जेव्हां या पंधरा एकर जमिनीचें कौतुक करितात तेव्हां आपल्या देशाचें भवितव्य फार खडतर आहे असें वाटूं लागतें. म. गांधी आपल्याला बोलून चालून 'शेतकरी व कोष्टी' म्हणवितात, पण आमचे सोशॅलिझम्चे सध्याचे पुढारी पं. जवाहरलाल नेहरू काय म्हणतात पहाः ज्या लाहोरच्या राष्ट्रीय सभेच्या अध्यक्षस्थानावरून त्यांनी आपण सोशॅलिस्ट आहों असें जाहीर केलें त्या अध्यक्षीय भाषणांत पं. जवाहरलाल सांगतात, "आम्हांमध्यें मोठमोठे जमिनदार आहेत त्यांचें

आम्ही स्वागत करतों. पण त्यांनीं हें लक्षांत ठेवावें कीं त्यांची जमिनदारी ही जुन्या सरदारपद्धतीची अवशेष असून हा प्रकार आतां जगांतून भराभर नाहीसा होत आहे. मोठमोठ्या भांडवली राष्ट्रांतहि जमिनीचें तुकडे करून ते कुळांत वाटले जात आहेत. आपल्याहि देशांत लहान शेतकऱ्यांच्या मालकीच्या जमिनी असून सर्वच देशांत या पद्धतीचा अवलंब व्हावयास पाहिजे." या बोलण्यांत या सोशॅलिस्ट पंडितानें केवळ गोंधळलेल्या मनाचें प्रदर्शन केलें आहे. लहान शेतकरी भोंवतालच्या प्रचंड उत्पादनाच्या धबडग्यांत निभावणार कसा याचा तर विचार येथें नाहींच, पण कानडा, अमेरिका, ऑस्ट्रेलिया, ब्राझिल, अर्जेंटायना या भांडवली देशांत सहस्रावधि एकर जमीन मशागतीस एकत्र घेतली जात असतांना भांडवलशाही राष्ट्रांत जमिनीचे तुकडे करण्याची पद्धति आहे असें हे निक्षून सांगतात. तेव्हां आमच्या पुढाऱ्यांना आतां शहाणे करावे तरी कोणीं आणि कसे हा प्रश्नच आहे.

लहान शेतीनें नुकसान होतें असें म्हटलें कीं—'म्हणून प्रचंड भांडवलाची मोठी शेती करण्यास आम्हांस मदत करा, एकएका भांडवलवाल्यास मोठमोठ्या जमिनी खरेदी करून व शेतकऱ्यांस त्यांच्याच उन्नतीसाठीं देशोधडीस लावू द्या' असा भांडवलवाल्यांचा सोशॅलिस्टास युक्तिवाद असतो. पण प्रचंड प्रमाणावर उत्पादन करण्याचें सामर्थ्य वाढण्यासाठीं एका काळीं भांडवलशाहीची जरूरी असली तरी आज भांडवलशाहीचें कार्य संपलें आहे इतकेंच नव्हे तर सोशॅलिस्ट पद्धतीच्या सामुदायिक मालकीनें रशियांत शेतींत प्रचंड उत्पादन यशस्वी झालेलें असतांना सोशॅलिस्टांनीं खुपीनें भांडवलशाहीची वाढ होऊं द्यावी असें म्हणणें म्हणजे तरुणपणीं बोंडल्यानें दूध प्यावें असें म्हणण्यासारखेंच आहे. सोशॅलिस्टांना प्रचंड उत्पादन हवेंच. पण, तें जमिनी सार्वजनिक मालकीच्या करून मग करावयाचें आहे. भांडवलशाहीनें बहुसंख्य समाजास पुरेशी संपत्ति वाटली न जाऊन दारिद्र्य व उपासमार वाढते. सोशॅलिस्टांना संपत्ति विपुल उत्पन्न करून ती बहुसंख्य समाजास द्यावयाची आहे.

## भांडवलवाल्यांचा राजकीय स्वातंत्र्यास विरोध

आधीं स्वातंत्र्य मिळवूं व मग आपसांत भांडूं हें राष्ट्रीय पक्षाचें म्हणणें. या म्हणण्याप्रमाणें सोशॅलिझम्‌साठीं आज झगडावयाचें नाहीं असें म्हटलें

म्हणजे स्वातंत्र्य मिळालें कीं भांडवलवाले, जमिनदार, संस्थानिक व जात्यभिमानी यांच्याच हातीं सत्ता जाणार हें 'शुभ्रपत्रिकेंत' पहातां उघड दिसतें. तेव्हां राष्ट्रीय पक्षाचें स्वातंत्र्याचें ध्येय या सर्व पक्षास वास्तवीक प्रथम मान्य असावें. पण राष्ट्रीय पक्षाच्या दुर्दैवानें या प्रत्येक पक्षाचा राष्ट्रीय सभेच्या ध्येयास विरोध आहे. पैकीं सर्व बडचा भांडवलवाल्यांत परस्परांत सर्व प्रकारची चढाओढ चालत असल्यामुळें युरोपीय भांडवलवाल्याशीं यांस संघटितपणें झगडा कधींच करतां येत नाहीं. कोणत्याहि प्रकारच्या ध्येयवादापासून हा वर्ग अलिप्त असल्यामुळें यांना स्वदेश–परदेश, स्वराज्य–परराज्य असला आपपर भाव कांहींच नाहीं. अगदीं नजिकच्या स्वार्थावर यांची दृष्टि असून ज्या मार्गानें स्वार्थ साधेल तिकडे यांचें सुकाणूं चटकन फिरतें. स्वदेशी व बहिष्काराची चळवळ होऊन गरीबांच्या खिशास चट्टा बसला व शेकडों देशभक्त तुरुंगांत गेले; पण यानें या स्वार्थसाधकांची पोळी पिकली. यांनीं मजूरांची स्थिति कधींच इमानानें सुधारली नाहीं. व्हिटले कमिटीच्या निर्णयावरूनहि म्हणतां येतें की हिंदी मजूरांस शुद्ध नरकांत राहावें लागतें. जी कांहीं थोडी सुधारणा मजूरांच्या राहणींत झाली आहे ती सर्व मजूरांनीं पुन्हांपुन्हां संप करून मिळविली आहे. यांच्या धंद्यास यांना जकातीचें संरक्षण हवें असलें म्हणजे यांना लोकपक्षाचा पाठिंबा नको असतो असें नाहीं. पण सरकारी अधिकाऱ्यांच्या कानांशीं लागूनच आपलें कार्य उरकणें यांना सोईचें वाटतें व आपल्या धंद्यांत इंग्रजांचा हात शिरकावून घेतला कीं यांचा धंदा इंग्रजांस आपलासा वाटून त्यास संरक्षण देण्यास इंग्रजांना कांहींच फिकीर वाटत नाहीं. टाटांच्या धंद्यास युद्धसामग्रीसाठीं रेल्वे हवी असल्यामुळें संरक्षण मिळतें तसेंच त्यांत ब्रिटिश भांडवलवाल्यांचा फार मोठा हिस्सा असल्यामुळेंहि मिळतें. स्वातंत्र्य मिळाल्यास हिंदुस्थानांत भांडवलवाल्यास मुखत्यारी मिळेल खरी. पण त्यासाठीं बहुसंख्य समाजाचा पाठिंबा मिळवून व जरूर तर स्वतांच्या संसाराची होळी करून बलिष्ठ परकी भांडवलवाल्याचीं झुंझ करण्याचा जुगार खेळण्यापेक्षां ब्रिटिश भांडवलवाल्यांशीं दुय्यम भागीदारीनें हिंदुस्थानची लूट करणें हें यांना अधिक परवडतें. ब्रिटिशांची सत्ता ढिली करण्यांत बहुसंख्य समाजाची मदत एकदां घेतली म्हणजे आज हाल-

कष्ट सोसूनहि पुन्हां सामान्य जनतेसाठीं उद्यां राजकीय व आर्थिक क्षेत्रांत स्वार्थत्याग करावा लागणारच. त्यापेक्षां कोणतेहि हाल न काढावे लागून ब्रिटिशांच्या भागीदारीनें आज राजसत्तेच्या बळावर धंदा व फायदा वाढीस लागला तर त्यांस स्वाभाविकच तें अधिक इष्ट वाटतें.

इंग्रजांनाहि नेमकें आज हेंच हवें आहे. हिंदुस्थानांत राजकीय सत्ता मजबूत, कच्च्या व पक्क्या मालाचा बाजार मोठा व मजूरीचा दर कमी; यांमुळें भांडवल गुंतविण्यास मुबलक वाव व संरक्षणाची हमी; सरकारची भरपूर मदत व हिंदी पण देशद्रोही अशा भांडवलवाल्यांचा पाठिंबा; यांमुळें अलीकडे हिंदुस्थानांत गुप्तपणें ब्रिटिश भांडवलाचा पूर वाहात आहे. खाजगी भांडवलाचा धंदा म्हटला म्हणजे त्याची जाहीर माहिती लोकांस हक्कानें मिळूं शकत नाही. यामुळें बंगाल्यांत गुप्तपणें पिस्तुलें येतात त्याप्रमाणें या विदेशी भांडवलाचा पूर हल्लीं हिदुस्थानांत अव्याहतपणें वाहात आहे. हें निवळ हिंदी भांडवलवाल्यांनीं विदेशांत काढलेलें कर्ज नसून ही विदेशी मालकशाहीची कटचार हिंदुस्थानच्या छातींत शिरत आहे. सर बेसिल ब्लॅकेट व इतर कांहीं इंग्रज यांनी इंग्लंडांत भांडवल उभारून कोल्हापूर संस्थानांत अॅल्युमिनियम काढण्याची योजना मुक्रर केली आहे. कोल्हापुरचे दिवाण हे एक त्यांत डायरेक्टर आहेत. पण नियंत्रणांत यांचा हात कितीसा असेल हें संस्थानिक व इंग्रज यांच्या नेहमींच्या नात्यावरून कोणींहि ओळखावें. गेल्या मार्चमध्यें 'इंडस्ट्रियल इन्व्हेस्टमेंट ट्रस्ट' या नांवाची एक सावकार कंपनी अडीच कोट भांडवल उभारून काढण्यांत आली असून भांडवल जमा करून तें हिंदी उद्योगधंद्यास पुरवणें हें या कंपनीचें ध्येय आहे. हिंदुस्थानांत ज्या ज्या धंद्यांना या कंपनीकडून भांडवल मिळेल त्या त्या धंद्यांवर सावकार या नात्यानें यांचें नियंत्रण येणार हें अगदीं उघड आहे. ही कंपनी कोणाची? निमे हिंदी व निमे इंग्रज डायरेक्टर या कंपनीवर आहेत. इंग्रज आहेत ते स्टॅन्ले रीड सारखे इंग्लंडचे पक्के पक्षपाती आहेत. आणि हिंदी आहेत ते सर किकाभाई प्रेमचंद, सर अकबर हैदरी यांसारखे 'वसुधैव कुटुंब' झालेले परमहंस आहेत. या कंपनीची गेल्या मार्च महिन्यांत जाहिरात प्रसिद्ध झाली त्या वेळी यांनीं पंचाहत्तर लाखांचे भाग तूर्त काढले असून निमे भाग खपून गेल्याचें जाहिरातींतच जाहीर केलें होतें. हे कोणीं घेतले व

यांतले हिंदी लोकांचे किती याचा पत्ता नाहीं. उरलेल्या साडेसदतीस लक्षांच्या भागांपैकीं सुमारे तीस लक्षांचे भाग गेल्या जुलैमध्यें सर किकाभाईंनीं इंग्लंडांत विकले. निमे डायरेक्टर इंग्रज, बहुतेक भांडवल इंग्रजांचें व हिंदुस्थानांतील अनेक धंद्यांना ही कंपनी भांडवल पुरविणार व अर्थात् त्यावर नियंत्रण ठेवणार. तेव्हां स्वातंत्र्य जवळ येत चाललें आहे कीं या हिंदी भांडवलवाल्यांच्या प्रयत्नांनीं पारतंत्र्याची बेडी अधिकाधिक आवळली जात आहे याचा विचार राष्ट्रीय पक्षानें जरूर करावा. असेंब्लीच्या सभासदांना दिल्ली–सिमल्यास चुरमुरे फाकीत बसविलेलें असतें. त्यांना परकी भांडवलाचा दारूखाना आपल्या राहत्या घराखालीं कसा ठासून भरला जात असतो याची दादहि मिळत नाहीं हिंदुस्थानांतल्या खाणी लुटण्यासाठीं नुकतीच लॉर्ड रेडिंग यांच्या अध्यक्षतेखालीं एक कंपनी निघाल्याची गुप्त बातमी असेंब्लींत कळून सभासदांनीं चौकशीहि केली पण सरकारनें पत्ता लागूं दिला नाही. कलकत्त्यास टाटांशीं चढाओढ करणारी एक लोखंड–पोलादाची कंपनी निघाली तिचा एक 'नॉन–इंडियन्' भागीदार आहे एवढी बातमी अलीकडे प्रसिद्ध आली आहे. अगदीं गुप्तपणें निरनिराळ्या सोंगाखालीं चालणाऱ्या असंख्य उपद्व्यापांपैकीं हे थोडेसे माहीत होतात. यावरून म. गांधी सोशॅलिस्टास थोपवून धरून जें स्वातंत्र्य घरी आणण्याचा खटाटोप करीत आहेत, तें स्वातंत्र्य ज्या हिंदी भांडवलदारांना मिळणार ते उद्यांच्या हिंदी स्वातंत्र्यांत वरिष्ट भागीदार म्हणून इंग्रजांना आजच घरांत घेत आहेत हें स्पष्ट होतें.

हल्लीं ज्या वेगानें ब्रिटिश मालकशाही हिंदुस्थानांत शिरत आहे त्याच वेगानें ती पुढील दहा वर्षांत शिरल्यास तिचें इथल्या कायदेमंडळांत इतकें सामर्थ्य वाढेल व हिंदुस्थानांत त्यांना मालकीचा एवढा मोठा ठेवा उत्पन्न होईल कीं तेच इंग्लंडचें नियंत्रण हिंदुस्थानावर म्हणजे आपणावर नको म्हणून असेंब्लींत 'डोमीनियन स्टेटस'चा ठराव पास करतील व पार्लमेंट त्यास मंजूरीहि देईल; आणि हें अनत्याचारानें हिंदुस्थानास स्वराज्य मिळालें याबद्दल दुर्दैवानें महात्माजींना स्वतःचें कौतुक करण्याचा प्रसंग येईल. हिंदी लोकांस या स्वराज्याचा फायदा इतकाच कीं दक्षिण आफ्रिकेंत परदेशांत राहून जेवढी मानखंडना होते त्यापेक्षां येथें थोडी कमी

होईल. संततिनियमनाचा प्रसार होऊन हिंदी लोकांची संख्या विदेशी भांडवलवाल्यांना व त्यांचे मुनीम हिंदी भांडवलवाले यांना नोकर म्हणून हवी तेवढी बेतशीर राहील व या देशांत सुप्त धन उपसून भांडवलवाले जे भोग भोगतील टेबलाखालीं पडणारे तुकडे शुकमहामुनींप्रमाणें त्यांच्या भारतीय वंशजास पोटभर खावयास मिळतील. त्यासाठीं इंग्लंडांतल्या चर्चांतली घंटा अखंड गर्जत राहील. अशा स्थितींत येथील राज्यकर्ते आमचा सनातन धर्म अस्पृश्यांपासून संरक्षून 'समाजशास्त्रज्ञ' गो. म. जोशांच्या तोंडून असे उद्‌गार काढवितील, कीं 'शाबास! जगांत शूर शूर म्हणविणाऱ्या जाति निर्वंश झाल्या तरी चातुर्वर्ण्याचें जीर्ण पटकूर पांघरून व टेबलाखालचे तुकडे गंगेंत धुवून खाऊनहि ही मनूची पवित्र मेंढरें जगांत टिकून आहेत!' बरोबरच आहे, 'महापुरें झाडें जाती तेथें लव्हाळे वांचती!'

## जातिनिष्ठांचा स्वार्थसाधूपणा

ज्या भांडवलवाल्यांना आधी स्वातंत्र्य द्या मग आपसांत भांडा असें राष्ट्रीय पक्ष कंठशोष करून सांगतो त्यांची कसाबकरणी ही अशी आहे. शुभ्रपत्रिकेंतील घटनेवरून आणखी ज्या दोन पक्षांच्या आडून ब्रिटिश भांडवलशाही हिंदुस्थानवर आपला अंमल गाजविणार ते दोन शिखंडी पक्ष म्हणजे हिंदी जातिनिष्ठ वर्ग व हिंदी संस्थानिक. पैकीं जातिनिष्ठांत दोनतीन वेगवेगळ्या ध्येयाची माणसें आहेत. कांही केवळ वैयक्तिक स्वार्थासाठीं ब्रिटिशांच्या भेदनीतीस बळी पडून देशद्रोह करीत आहेत. दुसरा वर्ग उत्तरेंतील मुसलमान प्रांत–सिंध, सरहद्द व पंजाब मुख्यतः–यांचें ऐक्य करून इंग्रज सरकार पुढें मागें अडचणींत आल्यास लगट करून व एकाद्या विदेशी मुसलमान सत्तेचा पाठिंबा मिळवून मुसलमानास पुन्हां दिल्लीश्वर बनविण्याच्या विचारांत आहे. यांचा अंतिम हेतु आपणासहि उचलून टाकण्याचा आहे हें इंग्रजांना कळत नाहीं असें नाही. पण भांडवलशाही राष्ट्रांचें युद्धकर्तृत्व व राज्यकर्तृत्व मुसलमानासारख्या अजून मागसलेल्या समाजाहून खात्रीनें सरस असल्यानें हिंदुस्थानाबाहेरच्या सगळ्या मुसलमान राष्ट्राशीं झुंझतांना आपण सरस ठरूं हा इंग्रजांना स्वाभाविक विश्वास वाटतो. या दृष्टीनें पौर्वात्य देशांत लष्करी दृष्ट्या नाक्याच्या जागा मजबूत करण्याची इंग्रजांची खटपट चालली आहेच. तेव्हां महत्त्वाकांक्षी मुसलमानांचे चाळे चालू देऊन

आज स्वराज्य मागणाऱ्या हिंदूंचा परभारे पाडाव करतां आला तर बरा अशा बुद्धीनें इंग्रज सरकार मुसलमानाबद्दल पक्षपात दाखवितें. या मुसलमानांना भावी राज्यघटनेंत त्यांच्या प्रमाणाहून फार अधिक सत्ता मिळाली असून हिंदूंच्या स्वराज्याच्या मागणीस मुसलमान इंग्रजांपेक्षांहि कसून विरोध करीत आहेत.

## संस्थानिक हिंदी स्वातंत्र्याचे शत्रू

हिंदी संस्थानिकासारखा प्रतिगामी वर्ग पृथ्वीतलावर दुसरा कोणताहि नसेल. नशिबवंतानें हातांत माती घेतली तरी तिचें सोनें होतें म्हणतात अशा अकल्पित रीतीनें इंग्लिश भांडवलशाहीस हिंदुस्थानांत आपली सत्ता दृढमूल करण्यास या संस्थानिकांचा उपयोग होत आहे. यांचें भौगोलिक स्थानहि असें आहे कीं हिंदी राष्ट्राच्या नखशिखांत देहांत जागजागीं रक्तप्रवाह बंद होऊन साखळलेल्या रक्ताच्या या गांठीच आहेत. कारण हिंदी राष्ट्राच्या एकसंध देहांतील ब्रिटिश हिंदुस्थानांत, जुलमी कां असेना पण, कायद्याची सत्ता आहे; तर या संस्थानांत जुलूम असून शिवाय एकतंत्र व बेजबाबदार सत्ता आहे. अखिल भारतीय राजकारणाचा विचार करतांना या संस्थानिकांचा विचार टाळतांच येत नाहीं. सत्तावन्नच्या बंडाबद्दल आमच्यांतील कांहीं वीरांना अभिमान वाटत असे. पण या बंडाचा परिणाम म्हणून हिंदुस्थानांत शिल्लक असलेल्या संस्थानिकांना चिमटचांत पकडून हिंदी राष्ट्राच्या देहाचे जे हालहाल गोलमेज परिषदेंत इंग्रजांनीं केले त्यामुळें सत्तावन्नचे बंडाचा हा दुष्परिणाम झाला येवढी गोष्ट या वीरांना मान्य झाली असावी. पण या वीरांचे एकदां ठाम झालेलें मत बदलणेंहि कठीणच दिसतें. कारण अजूनहि हिंदुस्थानांत गोळी चालविण्यासाठीं इंग्रजांस जें नेपाळ संस्थान शूर गुरखा सैन्याचा पुरवठा करतें तें द्रौपदीसाठी श्रीकृष्ण धांवला त्याप्रमाणें धांवून हिंदुस्थानचा उद्धार करूं शकेल असें यांना वाटतच आहे.

आमच्या संस्थानिकांसंबंधीं लिहिण्याचा प्रसंग न येईल तितका बरा. यांच्या दुष्कृत्यांच्या दुष्टपणाला कल्पनाशक्तीचीहि मर्यादा अपुरी आहे. पण एकाद्या माणसास जुलुमानें दारू पाजून त्यास वाईट करावें किंवा चांगलें फळ कुबटखान्यांत ठेवून कुजवावें यात्रमाणें त्यांच्या गळचांत बेजबाबदार सत्ता अडकवून ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानच्या सातशें संस्थानिकांची माणुस-

की नासविली आहे. आणि अशा बिघडलेल्या माणसांच्या हातीं सात कोटी प्रजेचें जीवित अडकवून एवढ्या प्रचंड प्रजेची आढि कुजत घातली आहे यांत संस्थानिकांचा तरी काय दोष ? राजा व प्रजा परस्परावलंबी असली म्हणजे प्रजेनें राजास संघटित प्रयत्नानें वठणीवर आणण्याचा थोडा तरी संभव असतो. अशा राजाला इंग्लंडच्या राजाप्रमाणें केव्हांना केव्हां लगाम पडूं शकेल. पण ब्रिटिश सैन्याची मदत प्रजेच्या बंडाविरुद्ध केव्हांहि मिळणें शक्य असल्यामुळें आमचे सारे राजे इतके बेलगाम व म्हणून बेगुमान झाले आहेत कीं त्यांना अवघ्या पृथ्वींत जोडच नाहीं. कारण प्रजेस पिळण्याचा अनियंत्रित हक्क फक्त राजेसाहेबांना, पण त्यांच्यांत शांतता राखण्याची जबाबदारी साम्राज्यसरकारवर हा राज्यप्रकारहि दुनियेंत अद्वितीयच आहे.

या संस्थानिकांच्या बेजबाबदार सत्तेस आळा घालून त्यांच्या अमलांतील प्रजेस निदान ब्रिटिश अमदानींत आहे तेवढें स्वातंत्र्य तरी कसें देतां येईल या फिकिरीत परवापरवांपर्यंत हिंदी राष्ट्रीय पुढारी होते. इतक्यांत कोणा इंग्रजाच्या सुपीक मेंदूतून कल्पना निघून नवीन राज्यघटनेंतील ब्रिटिश हिंदुस्थानच्या कायदे-मंडळांत व कार्यकारी मंडळांतहि या बेजबाबदार संस्थानिकांचा समावेश करण्याचें ठरलें. हिंदुस्थानला कोणत्या तरी प्रकारच्यासंयुक्त घटनेखेरीज सुटकाच नाहीं. हें सर्वांस मान्य होतें. पण संस्थानिकांच्या राज्यकारभारांत ब्रिटिश हिंदुस्थानला हात घालतां येणार नाहीं उलट ब्रिटिश हिंदुस्थानांत मात्र संस्थानिक अधिकारारूढ होणार ही विचित्र योजना पाहून राष्ट्रीय पुढाऱ्यांची मति कुंठित झाली आहे. या संस्थानिकांस प्रजेबद्दल बेगुमान राहतां येण्यासाठीं साम्राज्य सरकारच्या सैन्याचा पाठिंबा पाहिजे म्हणून हे आतां ब्रिटिश हिंदुस्थानच्या मसनदीवर बसून ब्रिटिश हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यास इंग्लिश भांडवलवाले व हिंदी भांडवलवाले यांच्या खांद्यांशीं खांदा लावून विरोध करणार. यामुळें हिंदी स्वातंत्र्याच्या चळवळीस राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या कल्पनेंतहि कधीं न आलेली बिकट अडचण उत्पन्न झाली आहे.

संस्थानांतील सुप्त धन लुटण्यासाठीं ब्रिटिश भांडवलवाले संस्थानिकांचा कसा उपयोग करून घेतात यासंबंधीं कोल्हापुरचें एक उदाहरण मागें दिलेंच आहे. हें धोरण सतत व संघटितपणें चालविण्यासाठीं संस्थानिकांच्या अंतर्गत कारभाराच्या नाड्या संस्थानिकांच्या नांवानें ब्रिटिश अधिकाऱ्यांच्या हातीं देऊन

अप्रत्यक्षपणें ब्रिटिश भांडवलवाल्यांची बेजबाबदार सत्ता संस्थानांत निर्माण करण्यांत येत आहे. निजामावर ब्रिटिश अधिकारी तर लादलेच आहेत. पण, काश्मीर व अलवार येथील ताजें राजकारण याच गोष्टीची साक्ष देत आहे. साखळलेल्या रक्ताच्या गांठींत घर करून रोग जसा बाकीचें शरीर ग्रासतो त्याप्रमाणें हिंदी राष्ट्राच्या शरीरांतर्गत अशा हिंदी संस्थानांत ब्रिटिश भांडवलवाल्यांनीं घर केलें असून तेथून निर्धास्तपणें ते आतां सर्व हिंदुस्थानावर आपली पक्कड घट्ट बसविणार असें दिसतें.

## बंगाली क्रांतिकारकांचा चुकीचा मार्ग

प्रथम एकजुटीनें राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ करून ब्रिटिश भांडवलवाल्यांना येथून हाकून लावूं व मग येथील भांडवलवाल्यांशीं भांडूं असें राष्ट्रीय पक्षाचें म्हणणें मान्य करून नुसतीच राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ केली असतां हिंदी भांडवलदार, जमिनदार, संस्थानिक व जातिनिष्ठ या चार वर्गांस तें स्वातंत्र्य लाभणार. पण ते स्वतां संपूर्ण स्वातंत्र्याचें कट्टे विरोधक असून स्वातंत्र्य अजून दूर आहे तोंवरच ब्रिटिश भांडवलवाल्यांस हिंदुस्थानच्या पोटांत कसें अढळ स्थान देत आहेत हें आपण पाहिलें. आतां एकोप्यानें करावयाची राष्ट्रीय स्वातंत्र्याची चळवळ जी देशांत चालली आहे असें आपण समजतों तिचें तरी स्वरूप कसें आहे तें आतां पाहूं. पैकीं संपूर्ण स्वातंत्र्यासाठीं बंगाल्यांत तरुण स्त्री-पुरुषांनीं आपल्या व दुसऱ्याच्या जिवाची तमा न धरतां माणसें मारण्याचा जो धुमधडाका चालविला आहे तो यशाचे दृष्टीनें निरुपयोगीच नव्हे तर आमच्या सर्वच राजकारणाचा बिघाड करणारा आहे हें सोशॅलिस्टांचें स्पष्ट मत येथें निक्षून करून ठेवितों. भांडवलशाहीपूर्वींच्या राज्यसंस्था व्यक्तिप्रधान होत्या. राजा बदलला कीं राजवट बदले. अधिकारी बदलला कीं कारभार बदले. पण भांडवलशाहीची कोणतीहि घटना व्यक्तिप्रधान नाहीं. विशिष्ट प्रकारच्या बऱ्या वाईट तत्त्वांच्या चौकटींत ही घटना बसविली असून निरनिराळ्या व्यक्तींनीं फक्त ही चौकट संभाळावयाची असते. एक व्यक्ति गेली कीं त्या जागीं दुसरी व्यक्ति येऊन तेंच काम करते. भांडवलशाहींत भांडवलवाल्या वर्गाजवळ कर्तबगार, धाडशी व उलटया काळजाच्या माणसांचें संख्याबळ इतकें प्रचंड असतें व त्यांचें लढाऊ सामर्थ्यंहि इतकें दांडगें असतें कीं अतिशय स्वार्थत्यागपूर्वक व यत्नांची शिकस्त करून

बंगाली तरुणांनीं वर्षांतून चारदोन अधिकारी मारून इंग्रजांना माणसांचा पुरवठा तोडण्याचा हिय्या धरणें हें बाटलीबाटलीनें पाणी काढून समुद्र आटविण्याचा हिय्या धरण्यासारखेंच खुळेपणाचें आहे. या स्वार्थत्यागाचा फायदा तर कांहींच नाहीं. उलट बंगाल्यांतील उत्तम स्त्रीपुरुषांची पिढी तेथें गारद होत आहे. सामान्य जनतेचा सरकारकडून छळ होत असून प्रजा भीतिग्रस्त व हताश होत आहे. आणि सर्वांत वाईट गोष्ट ही कीं अत्याचार व दडपशाही यांनीं वातावरण गजबजून गेलें असल्यानें स्वदेशी व विदेशी भांडवलशाही चोरट्या पावलानें बंगाल्यांचें जीवित सर्व बाजूंनीं कसें जखडून टाकीत आहे याची कोणासच दाद नाहीं. अत्याचार झाले कीं, ब्रिटिश लोक आरडाओरड करितात आणि आमच्यांतील भोळपटांना लगेच वाटतें कीं 'राजा मला भ्याला'. पण भांडवलवाले हे अत्याचारानें अधिक सावध, अधिक दूरदर्शी व अधिक निष्ठुर होत असतात इतकाच याचा अर्थ आहे. अत्याचारी चळवळ ही वरच्या वर्गातील मूठभर तरुणांतच होत असल्यानें अशिक्षित बहुसंख्य समाजास त्याबद्दल उमज पडत नाहीं व आपुलकीहि वाटत नाहीं. ज्या तडफदार तरुण वर्गांतून सामान्य जनतेस पुढारीपण मिळावयाचें तो तरुण वर्ग अत्याचारांत गुंगलेला असल्यामुळें सामान्य जनतेस भांडवलशाहीकडून होणाऱ्या पिळणुकीची कल्पनाच नसते. यामुळें बहुजन समाजांतील फूट, अज्ञान व परधार्जिणेपणा यांवर आधारलेल्या भांडवलशाहीचा संसार सुखानें चालतो. आयर्लंडांत खुनाखुनींनें यश आलें अशी एक समजूत आहे. पण वस्तुस्थिति अशी आहे कीं सातशें वर्षें इंग्लंडशीं आयर्लंडचा झगडा चालला होता, महायुद्धावेळच्या जुलुमानें प्रजा त्रस्त झाली होती, देश लहान, एकसंध असून दक्षिण आयर्लंडांत भांडवलशाही माजली नव्हती, आयर्लंडांतील जमिनींचे मालक व सामान्य जनता ब्रिटिशाविषयींच्या द्वेषानें पेटलेली होती व सर्व ठिकाणीं ब्रिटिशांच्या सत्तेस खणत्या लावून सर्व स्थानिक राज्यकारभार आयरिश जनतेनें अशक्य करून टाकला होता. इंग्लंडवर अखेर बरेंच आंतरराष्ट्रीय दडपणहि आलें. इतक्या अनेक कारणांस्तव इंग्लंडनें १९२१ सालीं शेवटी नमतें घेतलें व आजहि सामान्यतः तेंच धोरण चालविलें आहे. हिंदुस्थानांत यांपैकीं कोणतीहि परिस्थिति अस्तित्वांत नाहीं.

राष्ट्रीय स्वातंत्र्याची दुसरी मोठी चळवळ म्हणजे राष्ट्रीय सभेची.

राष्ट्रीय सभेच्या ध्येयाबद्दल ज्यांचें सामान्यतः एकमत आहे पण इतर कांहीं बाबींत मतभेद आहे असे राष्ट्रीय सभेंतच जे इतर पक्ष आहेत त्यांचेजवळ राजकारणाचा स्वातंत्र्याच्या सीमेवर नेऊन लढविण्यासारखा चढाईचा कार्यक्रम राष्ट्रीय सभेहून भिन्न असा कांहीं नाहीं. तसेंच भांडवलवाल्यांचें द्रव्यबल व बहुसंख्य समाजाचें संख्याबल अथवा उत्साही तरुणांचें कर्तृत्व बळहि यांच्या पाठीस अद्याप उभें नाहीं. गांधींच्यासारखा लोकमतावर अचाट प्रभुत्व ठेवणारा पुरुषहि यांच्यांत नाहीं. यामुळें जनतेच्या दैनंदिन जीवितांत कायदेमंडळांचे द्वारां या पक्षांकडून मदत होणें खात्रीनें शक्य आहे तरी स्वातंत्र्यप्राप्तीसाठीं एकादी जळजळीत स्वरूपाची चळवळ या पक्षांना नजीकच्या भविष्य काळांत करतां येईलसें आज वाटत नाहीं.

## महात्मा गांधींचें राजकारण

ज्या राष्ट्रीय सभेची स्वातंत्र्याची चळवळ जळजळीत स्वरूपाची आहे, निदान होणें शक्य आहे असें मानलें जातें तिच्या धोरणाचें आतां संक्षेपतः परीक्षण करूं. या राष्ट्रीय सभेची चळवळ म्हणजे तिने कुलमुखत्यारी दिलेल्या महात्मा गांधींची चळवळ होय. पं. जवाहरलाल यांनीं गेल्या ५।६ वर्षांत राष्ट्रीय सभेवर संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय लादून, युवकांची चळवळ करून व शेवटीं सोशॅलिझम् पुकारून राष्ट्रीय सभेस गांधीच्या पद्धतीहून थोडें वेगळें वळण लावण्याचा प्रयत्न केला आहे. पण गांधींनीं राष्ट्रीय सभेस घातलेली मर्यादा पं. जवाहरलाल यांस कधींच तोडतां आली नाहीं. पंडितजींच्या वाढत्या वजनाचें गांधींनीं मोठ्या कुशलतेनें वेळोवेळीं कौतुक केलें आहे. मद्रासेस कॉंग्रेसनें पास केलेला स्वातंत्र्याचा ठराव गांधींना साफ नापसंत असतांहि आणि त्यावर यंग इंडियांत गांधींनीं कडाडून हल्ला केला असतांहि जवाहरलाल व तरुणवर्ग यांचें वाढतें बळ व उत्साह पाहून गांधींनीं पुढें एकदम आपला आग्रह सोडला. जवाहरलालांचा गौरव करण्यासाठीं त्यांना लाहोर कॉंग्रेसचे अध्यक्ष केलें व राष्ट्रीय सभेचें ध्येय 'पूर्ण स्वराज्य' आहे हें जाहीर केलें. पण तरुणांस चुचकारून घेण्यासाठीं थोडें सैल सोडलें तरी गांधींनीं आपली भूमिका मुळींच सोडली नाहीं. १९३० सालच्या कायदेभंगाचे चळवळींत तुरुंगांत असतां स्लोकंब यांना दिलेल्या मुलाखतींत 'पूर्ण स्वातंत्र्य' याचा अर्थ 'स्वातंत्र्याचें सार' (सब्स्टन्स ऑफ इंडिपेन्डन्स) असा असल्याचें, जवाहरलाल

अथवा कोणीहि सहकारी यांचा सल्ला न घेतां, गांधींनीं जाहीर केलें. पुढें गांधी–आर्यविन करारानंतर गांधी गोलमेज परिषदेसहि गेले. जवाहरलाल यांस हें सर्व नापसंत असावें असें वाटतें. पण गांधींच्या विरुद्ध ब्र काढण्याचें त्यांनीं कधीं धैर्य दाखविलेंच नाहीं. गेल्या खेपेस तुरुंगांतून आल्यावर गांधी–जवाहरलाल यांचा एक पत्रव्यवहार त्यांनींच आपसांत वाटाघाट करून व ती लिहून काढून प्रसिद्ध केला. त्यांत गांधींनीं अतिशय सहृदयपणें जवाहरलालांचें कौतुक केलें आहे. पण वर्गयुद्ध, समाजवाद हीं तत्त्वें तितक्याच सहृदयतेनें पण निःसंदिग्धतेनें लाथाडलीं ,आहेत. जवाहरलालांनीं आपल्या पत्रांत गांधीची स्तुति करून अनत्याचाराचें तत्त्व शिरसावंद्य मानलें व समाजवाद, वर्गकलह वगैरे तत्त्वांचें चाचरत चाचरत समर्थन केलें आहे. पुढें 'व्हिदर इंडिया' या लेखमालेंत सोशॅलिझम्चें बरेंच चांगलें समर्थन त्यांनीं केलें, पण गांधींनीं त्या पत्रकाची मुळी कधीं ओळखहि दाखविलेली नाहीं. जवाहरलाल यांच्या प्रेरणेनें पूर्वीच्या युवक चळवळींतील तरुणांनीं अलीकडे कॉंग्रेसमध्यें सोशॅलिस्ट पक्ष काढला आहे. पण त्याचें कर्तृत्व तूर्त तरी परिणामकारक होईलसें दिसत नाहीं. जवाहरलाल यांजपासून तरुणांस नवविचाराची थोडी फार स्फूर्ति मिळाली तरी जवाहरलाल गांधींची चाकोरी सोडण्याचें, मतभेद असतांहि, धैर्य दाखवतील असें वाटत नाहीं. यामुळें राष्ट्रीय सभेचें राजकारण म्हणजे गांधींचें राजकारण असेंच अखेर म्हणणें प्राप्त होतें.

आपल्या स्वार्थत्यागानें, उत्कृष्ट लेखणीनें व वाणीनें, कमालीच्या थोर अंतःकरणानें, निग्रहानें व लोकमतावर केव्हांहि छाप बसविण्याच्या अद्वितीय गुणानें श्रेष्ठ असा गांधींएवढा पुरुष हिंदुस्थानांत इतिहासकालांत झाला असेल असें वाटत नाहीं. यांत्रिक व शास्त्रीय उत्पादनाची आणि भौतिक शास्त्रांची छाप ज्या समाजावर बसली असते तेथें केवळ वैयक्तिक सद्गुणांनीं श्रेष्ठ असलेल्या माणसास देव मानून डोक्यावर घेऊन नाचणें व आपली विचारशक्ति त्याच्यापुढें मूढ करून घेणें हे प्रकार फार कमी असतात. हिंदुस्थान यांत्रिक व शास्त्रीय उत्पादनांत मागसलेलें असल्यानें चमत्कारप्रियता, वैयक्तिक श्रेष्ठतेबद्दल एक प्रकारची अत्यादरबुद्धि, अंधश्रद्धा व कांहींसा शारीरिक व बौद्धिक लुलेपणा हे गुण हिंदी लोकांत दृढतेनें वसत आहेत. यामुळें श्रीकृष्ण, शिवाजी, टिळक व गांधी या सर्वांचें त्यांच्या ठिकाणीं ईश्वरत्व

कल्पून कांहींवेळां हिंदी लोकांनीं इतकें स्तोम माजविलें आहे कीं त्यांनाहि तें पुष्कळदां नकोसें वाटलें. पण हें सर्व वजा करूनहि जगांतील सर्व अद्वितीय पुरुषांत गांधींचा दर्जा व्यक्तिगुणांनीं श्रेष्ठ आहे ही गोष्ट सत्य आहे. गांधींच्या मताबद्दल पूर्ण नापसंती असणाऱ्या पुष्कळांना त्यांचेबद्दल निरतिशय प्रेम वाटत असतें तें यामुळेंच.

पण हें अगाध व्यक्तिमाहात्म्य येथेंच थांबवून त्यांच्या राजकारणाची चर्चा करतों. १९२१ सालीं असहकारितेची चळवळ व गेल्या दोन वर्षांपूर्वींच्या कायदेभंगाच्या दोन चळवळी यांमध्यें गांधींनीं तरुणांना स्वार्थ सोडून राष्ट्र-कार्यांत खेचलें ही फार मोठी गोष्ट त्यांनीं केली हें अभिमानानें सांगून सोशॅ-लिस्ट या नात्यानें मला आतां असें म्हणणें भाग वाटतें कीं गांधींच्या राज-कारणांतील बाकीच्या प्रत्येक बाबीनें हिंदी राष्ट्राचें पाऊल राजकारणांत मागें खेचलें आहे. संस्थानिकांबद्दल हळवेपणा, जमिनदार व भांडवलवाले यांना चुचकारणें, सूत कातण्याची चळवळ करणें, बहुसंख्य समाजाचे जे शत्रुवर्ग त्यांच्या अंतःकरणांत पालट करण्याचा खटाटोप करूनच स्वराज्याची आशा धरणें या गांधींच्या राजकारणाच्या महत्त्वाच्या बाबी आहेत. यांतील प्रत्येक बाब देशास नुकसानकारक कशी आहे पहा. संस्थानिकांबद्दल गांधींनीं नुकतेंच जाहीर केलेलें धोरण अत्यंत दुबळें असून स्वातंत्र्यविरोधी आहे. ज्या संस्थानिकांनीं संयुक्त राज्यघटनेंत येऊन ब्रिटिश हिंदुस्थानावर राज्य कर-ण्यास गांधींनी परवानगी दिली, त्या संस्थानिकांच्या प्रजेस राष्ट्रीय सभेनें राजकीय चळवळींत मदत करावी अशी संस्थानी प्रजेनें मागणी केली असतां, संस्थानें अफगाणिस्थान, पॉंडेचरी यांसारखें परदेश आहेत, कॉंग्रेस त्यांना मदत करणार नाही असें गांधींनीं बिनदिक्कत सांगितलें. मजूरांची प्रत्यक्ष प्रति-काराची चळवळ गांधी राजकीय दृष्ट्या करण्यास कधीहि तयार नसतात. जमिनदारी मोडून टाकिली पाहिजे असें जवाहरलाल यांचें स्पष्ट मत असतांहि जमिनदार कुळांचें कल्याण करतील तर जवाहरलाल जमिनदारीस विरोध करणार नाहींत असें गांधींनीं जवाहरलालांच्या पश्चात् जमिनदारांना आश्वा-सन दिलें. सोशॅलिस्ट कार्यक्रम कॉंग्रेसच्या ध्येयास विरुद्ध असल्यानें आपलें सोशॅ-लिस्टांशीं खास जमणार नाहीं, कॉंग्रेसनें सोशॅलिस्ट कार्यक्रम पत्करला तर आपण कॉंग्रेस सोडून जाऊं असा त्यांनीं हल्लीं धाक घातला आहे. सुताची चळवळ

म्हणजे तर एक शुद्ध खूळ झालें आहे. त्यांत फायदा तर नाहींच. आज त्याचा दुष्परिणाम मात्र असा होणार आहे कीं राष्ट्रप्रेमानें प्रेरित होऊन जीं शेंकडा २-२॥ माणसें अर्थशास्त्राचा, समाजवादाचा अभ्यास करतील, लोकांस प्रतिकारास प्रवृत्त करतील, राष्ट्राचें बळ वाढवितील तींच माणसें नेमकीं गांधींच्या उपदेशाप्रमाणें सूत काढीत बसतील. मग घर राखणाऱ्या कुत्र्यास भाकरी खात ठेवून चोर घराची लूट करतात त्याप्रमाणें भांडवलशाही—स्वदेशी व विदेशी—आपले पाश हिंदुस्थानच्या मानेभोंवतीं आवळत राहणार आहे. गांधी क्रांतिकारक आहेत ही जवाहिरलालांची चुकीची समजूत आहे. पुणें परिषदेनंतरची व्हाइसरॉयांच्याभेटीसाठी केलेली मागणी हें याचें उत्तम निदर्शक आहे. 'आय वुइल नॉट एंबरॅस गव्हर्मेंट' मी सरकारला अडचणीत पाडणार नाहीं असें सरकारला त्यांनी अनेकवार आश्वासन दिलें आहे. या सर्व गोष्टींचा विचार करतां म. गांधी व म्हणून राष्ट्रीय सभा यांच्या चळवळी संपूर्ण स्वातंत्र्यास विरोधी होतात इतकेंच नव्हे तर ब्रिटिश भांडवलशाहीची पक्कड सर्व बाजूंनीं हिंदुस्थानच्या मानेभोंवतीं बसत असतां गांधींच्या वर्तनानें, अनिच्छेनें कां होईना, पण त्यास विरोध होत नसून हिंदी भांडवलवाले, जमिनदार, जातिनिष्ठ व संस्थानिक यांच्या ब्रिटिश भांडवलवाल्यांना घरांत घेण्याच्या प्रयत्नांस पर्यायानें मदतच होणार आहे.

## गांधींच्या अनत्याचाराची मीमांसा

या सर्वांस कारण काय, तर गांधींचें अनत्याचाराचें धोरण. मुसलमानांबद्दल यांना विशेष प्रेम आहे असें नव्हे. मग ते मुसलमानांना विशेष सवलती कां देतात तर त्यांचें मन आज दुखवण्यापेक्षां त्यांनाचा आज ना उद्यां आपला अजाणपणा पटेल हा यांच्या मनांतील हेतु. कॅांग्रेसच्या चळवळीनें सरकारचें डोकें बिथरलें तर इंग्रज लोकांची शांततेनें राज्य करण्याची संस्कृति नष्ट होईल एवढीच यांना काळजी. लोकांना सरकारविरुद्ध, कुळांना जमिनदारांविरुद्ध व मजूरांना भांडवलदाराविरुद्ध चिथवायचें नाहीं; कां? तर अत्याचार होईल. सरकारास विरोध करावयाचा तर इतका बेतशीर हवा कीं त्यांना आपली चूक कळून यावी, पण त्यांनीं बिथरून जाऊं नये. सोशॅलिस्टांस गांधी म्हणतात कीं हे अत्याचारी आहेत. पण उद्यां भुलाभाई देसाई 'प्राइम मिनिस्टर' झाले तर पोलीस व लष्कर वापरतील कीं नाहीं? व

ही शस्त्रें प्रसंगीं गांधींना व भुलाभाईंना पसंत नसणाऱ्या त्या वेळच्या एकाद्या कायदेभंगाविरुद्ध वापरलीं जातील असेंच ना? म्हणजे या सर्वांचा अर्थ असा कीं इंग्रजांच्या कायद्यानें झालेला 'अत्याचार' गांधींना 'अनत्याचार' वाटतो. पण उद्यां सोशॅलिस्टसरकारनें आपल्या कायद्याप्रमाणें जमिनदारांच्या जमिनी काढून घेतल्या तर त्यांत मात्र त्यांना 'अत्याचार' दिसतो.

या अनत्याचारशास्त्रांतलें मर्म असें आहे कीं हें इंग्लंडांतलें जुनें लिबरल मत गांधींनीं 'सत्याग्रहा'ची भर घालून लोकांपुढें मांडलें आहे. खाजगी मिळकतीचा हक्क सरकारला रद्द करतां येत नाही, एकानें दुसऱ्यास मारलें तर दुसऱ्यानें तो बलिष्ठ असला तरी आत्मनिग्रहपूर्वक मॅजिस्ट्रेटकडे दाद घ्यावी पण बळी तो कान पिळी हा न्याय वापरूं नये, कायद्यानें चालावें, पण मानवी नीतिधर्मास एकादा कायदा विरोधक असल्यास त्याविरुद्ध सनदशीरपणें चळवळ करावी व जरूर तर शेवटीं तो कायदा व्यक्तिशः मोडून त्याबद्दलचें शासन स्वतां शांतपणें व समाजाचा आपल्यासाठीं क्षोभ होऊं न देतां विनयशीलपणें पत्करावें, हीं सर्व 'लिबरल' पक्षाची राजनीतिशास्त्रविषयक मतें बेंथॅम, काब्डेन, ब्राइट, मोर्ले, सिज्विक, डाइसी, कीन्स व अगदीं अलीकडे सोशॅलिझमचे पांघरूण घेतलेले लिबरल प्रो. लास्की यांनी आपल्या लेखनांतून प्रतिपादिलीं असून गांधींनी ती अधिक उजळ व मूर्त करून त्याला 'सत्याग्रह' असें मोठें उमदें नांव दिलें आहे. याचा स्पष्ट व बोधप्रद अर्थ दुसरा कांहीं नसून 'कॉन्स्टिटयूशनल' ऊर्फ सनदशीर असा आहे. याचा अर्थ कायदेशीर असा नव्हे. कारण एकादा अन्यायी कायदा मोडणें हें बेकायदेशीर कृत्य होतें, पण सनदशीरहि होऊं शकतें. माणसाचे कांहीं जन्मसिद्ध न्याय्य हक्क असतात. ते कायद्यानें निर्माण होत नसून त्यानें फक्त त्यास मान्यता द्यावयाची व रक्षण करावयाचें हें मत फ्रान्सच्या राज्यक्रांतींत प्रतिपादिलें गेलें होतें. त्यांतच जन्मसिद्ध हक्काविरुद्ध झालेला कायदा मोडणें हाहि हक्क गर्भित होताच. पण तसें करतांना 'कॉन्स्टिटयूटेड ॲथॉरिटी'स—'कायद्यानें स्थापिलेल्या राज्यास' मोडून पाडं नये हाहि दृढ संकेत होता. कायदेभंग विनयशीलपणें करण्याचें व शिक्षा निमूटपणें भोगण्याचें हें कारण आहे. गांधींच्या राजकारणाचीं माझ्या मतें ही अशी उपपत्ति आहे. लिबरॅलिझम् व बुद्धिझम् याचें एका थोर पुरुषानें केलेलें मिश्रण म्हणजे गांधीझम् होय. त्यांत यंत्रास विरोध करणारा थोडा टॉल-

स्टॉय आहे, कधींहि कठोर न बोलणाराच ख्रिस्त आहे, निष्काम कर्मवाला कृष्ण आहे व हिंदुस्थानला स्वराज्य मागणारा टिळक आहे. पण लिबरॅलिझम् व बुद्धिझम् हीं यांतलीं मुख्य द्रव्यें. गांधींच्या राजकारणाचें हें स्वरूप समजून घेतल्याशिवाय त्यांच्याशीं सहकार्य केलें किंवा विरोध केला तरी माणसांची फसगत होते. आजपर्यंत माझ्या मतें हा अनुभव राजगोपाळ, जवाहरलाल व अणे अशा सर्व प्रकारच्या त्यांच्याशी निकट संबंध आलेल्यां गृहस्थांना आलेला आहे.

मजूर विरुद्ध भांडवलवाले, शेतकरी विरुद्ध जमिनदार अशा आर्थिक वर्गतत्त्वावर हिंदी राजकारण नेल्यास राष्ट्रीय स्वातंत्र्याचा प्रश्न मागे पडून आपल्या दुहीमुळें पूर्वी घडलें त्याप्रमाणें पारतंत्र्याची मेख आणखीच खोल घुसेल, तेव्हां सर्वजण प्रथम राजकीय स्वातंत्र्यार्थ झगडून मगच वर्गतत्त्वावर जरूर तर झगडूं हें राष्ट्रीय पक्षाचें एकंदरींत म्हणणें. पण असें करण्यानें इंग्रजांचे हातून राज्यसत्ता काढून घेऊन हिंदी भांडवलवाले, जातिनिष्ठ पुढारी, हिंदी जमिनदार व संस्थानिक या ज्या चार वर्गांचे हातीं राष्ट्रीय पक्ष स्वातंत्र्य देऊं चाहतो ते चारहि वर्ग इंग्लिश भांडवलवाल्यांना आगाऊच हिंदुस्थानांत मालक करून बसवीत आहेत आणि स्वातंत्र्यासाठीं झगडूं म्हणणाऱ्या राष्ट्रीय सभेचें म्हणजे गांधीचें राजकारण आतांच आपण पाहिल्याप्रमाणें वरच्या चार वर्गांना व ब्रिटिशांना न दुखवतां चालणार आहे. म्हणून राष्ट्रीय सभेचें राजकारण राजकीय स्वातंत्र्यास निरुपयोगीच नव्हे तर अपायकारकहि आहे असें सोशॅलिस्टांस वाटतें.

## मध्यम वर्गाचा उपयोग

जो ज्या वेळीं बलिष्ठ असेल त्या वेळीं त्याची निरनिराळ्या प्रकारें नोकरी करणारे अगर त्याच्या आश्रयानें राहणारे कारकून, मास्तर, प्रोफेसर, एंजिनियर, डॉक्टर, वकील व लहान कारागीर यांना सर्वसाधारण असें सुखदुःख कांहींच नसल्यानें यांच्यांत वर्गभावनाच नाहीं. या वर्गांतून जी थोडी अभ्यासी, हुषार व देशभक्त माणसें निघतात, त्यांचा पुढारीपणाच्या कामासाटीं पुष्कळ उपयोग असतो. पण वर्गभावनाहीन अशा या वर्गाची बहुसंख्य समाजास राजकीय दृष्टचा उपयोगी होईल अशी एकजूट होणें अशक्य असल्यानें राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या चळवळीच्या दृष्टीनें या वर्गाचा कांहींच उपयोग नाहीं.

## कामकरी–शेतकरी वर्ग व सोशॅलिस्ट चळवळ

राहता राहिला कामकरी व शेतकरी यांनीं भरलेला बहुसंख्य समाज. या सर्वांचें सुखदु:ख साधारण असल्यानें यांच्यांत वर्गभावना वाढूं शकते. म्हणून संपूर्ण स्वातंत्र्याची चळवळ करण्यास हा वर्गच यापुढें पात्र आहे. भांडवलवाले, जमिनदार व संस्थानिक इत्यादि वर्गांजवळ जोंपर्यंत संपत्ति—साधनें आहेत, तोंपर्यंत ते बलिष्ठ असून बहुसंख्य समाजास तीं साधनें मिळूं नयेत म्हणून परकी सरकारचें बळ यांना अवश्य वाटणारच व म्हणून राष्ट्रीय स्वातंत्र्यास हे वर्ग आपल्या सर्व बळानें विरोध करणारच. तेव्हां राष्ट्रीय स्वातंत्र्यास यांचा होत असलेला विरोध काढून टाकण्यासाठीं यांचीं संपत्तिसाधनें हळूहळू सार्वजनिक करून यांना दुर्बल करणें जरूर आहे, ही गोष्ट आतां सोशॅलिस्टांनीं बहुजनसमाजापुढें स्पष्टपणें मांडिली पाहिजे. गांधी सोशॅलिस्टांना अत्याचारी म्हणतात. सोशॅलिस्टांनीं गांधीना असें विचारलें पाहिजे कीं तुम्ही राज्यसंस्था काबीज करून पोलीस व लष्कर यांच्या साहृयानें राज्य करतांना जर अनत्याचारी राहूं शकतां तर सोशॅलिस्टांनीं सरकारी मार्गानें समाजसत्ता स्थापन केल्यास ते मात्र अत्याचारी कसे ?

गांधीच्या मतें अनत्याचारानें वर्गयुद्ध होऊंच शकत नाहीं. इंग्रजांशीं अनत्याचार, मुसलमानाशीं अनत्याचार, जमिनदाराशीं, भांडवलदाराशीं अनत्याचार याचा गांधीचा अर्थ स्पष्ट आहे. ते त्यांचें अंत:करण मतपरिवर्तनानें व आत्मक्लेशानें बदलूं इच्छितात. उलट सोशॅलिस्टांना या सर्व वर्गांशीं वर्ग-विरोधाच्या तत्त्वावर झगडून समाजाची आर्थिक लूट थांबवावयाची आहे. हा झगडा 'अनत्याचारी' मार्गानें खास होऊं शकतो असें त्यांस वाटतें. सरकारासहि खाजगी मालकी रद्द करता येत नाहीं हें गांधीचें मत सोशॅलिस्टास मान्य नाहीं. अनंत कालपर्यंत वरिष्ठ वर्गांची फक्त आर्जवेंच (मतपरिवर्तन!) करीत रहावें हा अनत्याचाराचा अर्थ सोशॅलिस्टांना समजतच नाही. पण सरकारी कायद्यानें होणारी सक्ति जर गांधींच्या 'अनत्याचारांत' बसते तर या अर्थानें आपणहि 'अनत्याचारी' आहों असें सोशॅलिस्ट हे प्रामाणिकपणें म्हणूं शकतात. पण सोशॅलिस्ट हे 'अनत्याचारी' मार्गांनीं जात असतांहि काँग्रेसनें त्यांना 'अत्याचारी' ठरवून काँग्रेसच्या बाहेर काढलें तर बाहेर

पडून स्वतंत्रपणें चळवळ करण्याचें धैर्य त्यांनीं दाखविलें पाहिजे. गांधी अथवा भांडवलवाल्यांचे पक्षपाती यांचे हाती कॉंग्रेस आहे तोंपर्यंत कॉंग्रेसचें ध्येय व धोरण असें राहणारच की ज्याचे योगानें श्रमजीवी वर्गास संपूर्ण राजकीय व आर्थिक स्वातंत्र्य मिळणारच नाहीं. अशा संस्थेंत कुचंबत राहण्यापेक्षां सोशॅलिस्टांनीं 'हिंदी सोशॅलिस्ट कॉंग्रेस' स्थापन करून स्वतंत्रपणें सोशॅलिस्ट मताचा प्रसार सुरू करावा.

## कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीचा नाद सोडा

कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीचा कॉंग्रेसनें ज्या प्रकारें पुरस्कार चालविला आहे त्यापासून सोशॅलिस्टांनीं दूर राहिले पाहिजे. आज हिंदी भांडवलवाले, जमिनदार व संस्थानिक स्वातंत्र्यास विरोध करूं शकतात याचें कारण संपत्तिसाधनें त्यांचे हाती आहेत हे होय. उद्यां स्वातंत्र्य आलें असें मानलें तरी ही साधनें यांचे हाती असेपर्यंत बहुसंख्य समाजाची आर्थिक वेसण यांचेच हाती असणार. असे पराधीन नागरिक आपली राज्यघटना कॉन्स्टिटयुअंट असेंब्ली द्वारा बहुसंख्य समाजास हितकारक अशी कशी करणार हेंच कळत नाही.

कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीची कल्पना मूळ अमेरिका व फ्रान्स येथें अमलांत आली. पैकीं अमेरिकेंत जमिनदारांनीं इंग्लंडकडून स्वतां स्वातंत्र्य मिळविलें पण निग्रोंची गुलामगिरी पुढें नव्वद वर्षेपर्यंत घालविली नाही. फ्रान्सचा पहिला नेपोलियन व तिसरा नेपोलियन यांच्या इतिहासावरून तर कॉन्स्टिटयुअंट असेंब्लीमुळें लोकांची अखेर फसगत होते हाच अनुभव आला. सर्व जगांत स्वातंत्र्य, समता व बंधुभाव पुकारणाऱ्या फरान्सच्या कॉन्स्टिटयुअंट ऊर्फ नॅशनल असेंब्लीनें नेपोलियनच्या एकटयाच्या हवाली राज्यसूत्रें केली आणि या उपकाराची फेड म्हणून नेपोलियननें नॅशनल असेंब्ली बुडवून स्वत:सच राज्याभिषेक करून घेतला.

तिसरा नेपोलियन पहिल्यापेक्षांहि धूर्त निघाला. त्यानें एक ग्रंथ लिहून आपण सोशॅलिस्ट आहों असेंच जवळजवळ जाहीर केलें. आणि लोकमतास झुलवून १८४८ च्या पॅरिसमधील क्रांतीनंतर वयांत आलेल्या मतदारांच्या बहुमतावर तिसरा नेपोलियन फ्रान्सचा अध्यक्ष म्हणून निवडून आला. पुढें अनन्वित दुष्कृत्यांची परिसीमा गाठून त्यानें आपणास बादशहातीवरहि स्थापन केलें. अठराव्या शतकांतील जगांतील नीच राजांचा शिरोमणी

अशी या नेपोलियनची ख्याति आहे. कॉंग्रेस सोशॅलिस्ट यांनीं लक्षांत ठेवावें कीं हा नेपोलियन 'सोशॅलिस्ट' ( ! ) मतदारांच्या बहुमतानें निवडून आला होता.

पं. जवाहरलाल यांनीं कॉन्स्टिट्युअंट असेंब्लीची घोषणा केली खरी. पण कामकरी व शेतकरी वर्गाच्या हातीं राज्यसूत्रें गेल्यावर मग कॉन्स्टिटयुअंट असेंब्ली बोलवावी अशी त्यांची कल्पना असावी. सध्या जवाहरलालांच्या कल्पनेची चर्चा करण्याचें कारणच नाहीं. मात्र आजच्या स्थितींत कॉन्स्टिटयुअंट असेंब्ली बोलाविली गेली तर ती कदाचित् एकाद्या संस्थानिकासहि अध्यक्ष निवडील व मग कॉंग्रेस पुढाऱ्यांचे डोळे उघडतील. मला हें फारच संभवनीय वाटतें. चोर, भुरटे व गुंड यांचा उपयोग करून व लोकशाहींत हुल्लड करून तिसऱ्या नेपोलियननें फ्रान्सचें अध्यक्षपद घसघशीत बहुमताच्या जोरावर कसें बळकावलें हा घडलेल्या इतिहासांतला दाखला आहे.

## सोशॅलिस्ट चळवळीचें सामान्य धोरण

सारांश, कॉन्स्टिटयुअंट असेंब्ली मागण्याच्या फंदांत सोशॅलिस्टांनीं आज पडूं नये. संपत्तिसाधनें अधिकाधिक सार्वजनिक मालकीचीं करण्यासाठीं व सर्व प्रतिगामी पक्षांचा पाडाव करण्यासाठीं सोशॅलिस्ट पक्षानें आपल्या नेतृत्वाखाली कामकरी व शेतकरी यांची दृढ संघटना करावी व जनतेच्या दैनंदिन गाऱ्हाण्यांसाठीं त्यांना झगडण्यास शिकवून एकएक पाऊल प्रतिपक्षास हटवीत राहावें. शेतकरी व कामकरी यांच्या पाठबळावर सोशॅलिस्ट पक्षाच्या हातीं राज्यसूत्रें येतील, अशा योजनेखेरीज कोणतीहि योजना तडजोडीसाठींहि आपली म्हणणें म्हणजे आपल्याच हातानें सोशॅलिस्ट तत्त्वास मूठमाती देणें आहे.

जातिनिष्ठतेविरुद्ध चळवळ करणें हें सोशॅलिस्टांचें महत्त्वाचें कर्तव्य आहे. हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती यांतील बहुसंख्य समाजाचे आर्थिक हितसंबंध धर्मप्रमाणें विभागले नसून एकच असतांना जातिनिष्ठ पुढाऱ्यांकडून जनतेचा जो गैरसमज केला जात आहे तो चालू दिल्यास कामकरी व शेतकरी यांची अखिल भारतीय संघटना कधींहि होणें शक्य नाहीं. यासाठीं सोशॅलिस्टांचें पहिलें कर्तव्य हें आहे कीं त्यांनीं जनतेंत जे लोक जातीच्या नांवावर पुढारी होऊन स्वार्थ साधतात त्यांच्याविरुद्ध व जातितत्त्वाविरुद्ध चळवळ केली पाहिजे. एकाद्या जातीस चारदोन नोकऱ्या मिळाल्यानें बहुसंख्य समाजास पोटभर भाकरी मिळत नाहीं, बहुसंख्य समाजानें आपलें आर्थिक भांडण धार्मिक भेदभाव विसरून

व आपणास पिळणाऱ्या वरिष्ठ वर्गाविरुद्ध झगडून चालविलें पाहिजे, हा संदेश सर्व जातींच्या व धर्मांच्या कामकऱ्यांना व शेतकऱ्यांना पोंचविणें सोशॅलिस्टांचेंच काम आहे. सोशॅलिस्ट वक्ते मुसलमान समाजांत या मताचा प्रसार करूं लागल्यास श्रद्धानंदांप्रमाणें सोशॅलिस्टांवर भयंकर प्रसंगहि येऊं लागतील. पण सोशॅलिझम्मध्यें याहूनहि भयंकर संकटें आहेत हें सर्वांपेक्षां सोशॅलिस्टांनाच ठाऊक असलें पाहिजे.

संस्थानी प्रजेची चळवळहि सोशॅलिस्ट अंगाबाहेर टाकूं शकत नाही. परिस्थिति वेगवेगळी असेल त्याप्रमाणें कमी अधिक ताठर व्हावें लागेल इतकेंच.

जनतेस 'सोशॅलिझम्'हें ध्येय त्यांच्या दैनंदिन अडचणींसाठीं झगडतां झगडनाच समजणार. म्हणून या अडचणीच्या झगड्यासच सोशॅलिझमकडे खेचतां येईल असें स्वरूप देणें व लोकमतास तसें शिक्षण देणें जरूर आहे. या दृष्टीनें कॉंग्रेस सोशॅलिस्टांनीं आंखलेला कार्यक्रम पुष्कळ उपयुक्त आहे यांत शंका नाहीं. सोशॅलिस्टांना खरें बळ जनतेच्या पाठिंब्यापासूनच मिळणार आहे. जनतेंत शिरून जनतेस आपल्या अडचणींसाठीं झगडण्यास न शिकवतां सोशॅलिस्टांनीं कॉंग्रेसच्या सर्वाधिकाऱ्यांची कितीहि मनधरणी केली तरी त्यापासून अपमान, व उपहास यांखेरीज कांहींहि मिळणार नाहीं. उलट प्रत्यक्ष लोकसेवा करून सोशॅलिस्टांनीं लोकांचें पुढारीपण मिळविल्यास त्यांना कॉंग्रेसचीहि पर्वा करण्याची जरूरी नाहीं. म्हणून गांधींना अथवा राष्ट्रीय सभेस सोशॅलिस्ट कार्यक्रम पसंत नसल्यास सोशॅलिस्टांनीं फिकीर न करतां जनतेपुढें तो कार्यक्रम मांडून त्यासाठी चळवळ केली पाहिजे. त्याबरोबरच सर्व संपत्तिसाधनें सार्वजनिक मालकीचीं करणें व कामकरी व शेतकरी या बहुसंख्य समाजाचें राज्य स्थापणें हेंच खरें स्वातंत्र्य आहे, आणि सोशॅलिझम् ऊर्फ समाजवाद हाच एक उपाय यापुढील वाढत्या भांडवलशाहीच्या गुलामगिरींतून जनतेस वांचवूं शकेल हें स्पष्टपणें जनतेच्या मनावर समाजवाद्यांनीं बिंबविलें पाहिजे.

---